# संत बहिणाबाईचा गाथा.



संग्राहक,

विश्वनाथ नारायण कोल्हारकर.

आवृत्ति पहिली.

शके १८४८.

किंमत १२ आणे.

# प्रस्तावना.



आज आपल्या भरतखंडांत ज्या थोर संतस्त्री विभूति होऊन गेल्या त्यांत संत बहिणाबाईचीही गणना प्रामुख्यानें केल्यास वावगें होणार नाहीं. अशा ह्या स्त्री-संत महात्म्याचें—पुण्यमय देवीचें—नांव सर्व महाराष्ट्रभर सर्वतोमुखीं व्हावयास पाहिजे होतें. परंतु आजपर्यंत ह्या बाईचें नांवही चांगल्या थोर मंडळीस ऐकून माहीत नव्हतें असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. परंतु गेल्या ८–१० वर्षांपूर्वी नागपुरकडील पोस्ट खात्यांतील एका व्यक्ती-कडून सदरहू बाईचा गाथा प्रथमतःच प्रसिद्ध झाला व तेव्हांपासून संत-मंडळांत व वारकरी लोकांत या बाईसंबंधींची चर्चा ऐकू येऊं लागली. असो. सदरहू बाईचें कुलवृत्त लिहिण्याचें हें स्थळ नसल्यामुळें आज आम्ही वाचकांस इतकेंच सांगतों कीं, त्यांचें चरित्र आम्ही स्वतंत्र पुस्तक-रूपानें लवकरच प्रसिद्ध करणार आहों.

संत श्रीबहिणाबाई ह्या कसबा बारापाडाशूर तालुके वैजापूर येथील राह-णाऱ्या होत. यांचें माहेर शूरपासूनच बारा तेरा मैल अंतरावर असलेलें रंगाऱ्याचें देवगांव म्हणून आहे तेथें होतें व अजूनही ह्या बाईच्या माहेरच्या घराण्याचा वंश तेथें नांदत आहे. बाईच्या वडिलांचें नांव आवजी कुलकर्णी. हे कुलकर्णी घराण्यांतले असून तत्कालीन प्रमुख घराण्यांपैकीं एक असत. ह्यांस पुष्कळ दिवस संतति झाली नाहीं, तेव्हां तत्प्रीत्यर्थ यांनीं जवळच्या एका वनांत असलेल्या पांडुरंगाचें देवालयांत तपश्चर्या केली असें सांगतात. पुढें परमेश्वर प्रसन्न होऊन त्यास एक मुलगी व एक मुलगा अशीं दोन अपत्यें झालीं. पैकीं प्रथमतःच हें स्त्री-संतरत्न त्यांचें उदरीं जन्मास आलें व दुसरा मुलगा झाला. त्याचें नांव पुष्कळ तपास केला परंतु कळलें नाहीं. जें स्त्री-संतरत्न तीच ही आमच्या प्रस्तावनेची नाइका होय. सदरहू बाईचा जन्म कोणत्या सालांत झाला हें आम्हांस पुष्कळ शोधाअंतींही कळलें नाहीं. आतां स्त्रीरत्न ज्या कुलांत निर्माण झालें त्या घराण्यापाशीं अथवा ज्या महा-राष्ट्रीय वारकरी सांप्रदायी संत

त्यांच्यापैकीं कोणाजवळही त्यांच्या जन्मकाळाविषयीं निश्चित माहिती असूं नये ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे.

बाईच्या नवऱ्याचें नांव गंगाधरपंत. हे भिक्षुक घराण्यांतले असून बाईचे हे बिजवरी वर होत. म्हणजे गंगाधरपंताचें बाई ह्या द्वितीय कुटुंब होत. गंगाधरपंताचा मुख्य धंदा भिक्षुकीचा असून आर्यवैद्यकीचाही उपधंदा होता. ह्या दुसऱ्या धंद्यांत त्यांची चांगली ख्याति होती. बाईचें लग्न फारच लहानपणीं झालें होतें. गंगाधरपंत अतिशय तापट स्वभावाचे असून त्यांनीं बाईस फारच गांजिलें. त्यांच्या तापट स्वभावाच्याच अग्नींतून व छळवादाच्या नळींतून संत बहिणाबाई हें शंभर नंबरी सोनें कसोटीस उतरून जगाच्या निदर्शनास आलें. बाईनीं आपलें आत्मवृत्त निवेदन करून रोजच्या व्यवहारांत घडलेल्या बारीकसारीक गोष्टीही जगापुढें अभंग रूपानें मांडिल्या आहेत. बाईचा गाथा वाचला असतां 'चणेखावे लोखंडाचे । तेव्हां ब्रह्मपदीं नाचे ॥' या तुकाराम महाराजांच्या म्हणीप्रमाणें बाई किती तावून सुलाखून निघाल्या होत्या हें निदर्शनास येईल. तेव्हां तें विस्तारानें येथें सांगत बसण्याचें कारण नाहीं.

संत बहिणाबाई ह्यांना एक मुलगा व मुलगी अशीं दोन अपत्यें झालीं. पैकीं मुलाचें नांव विठोबा असें होतें, मुलीचें नांव उपलब्ध नाहीं.

संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांच्या नऊ टाळकऱ्यांपैकींच संत बहिणाबाई ह्या एक होत्या, हें सदर गाथा वाचणाऱ्या प्रत्येक वाचकांस कळून येईल; शिवाय आम्हीही तें संत बहिणाबाईच्या चरित्रांत स्वतंत्र रीतीनें विशद करूं. श्री संत तुकाराम महाराजांचा पूर्ण कृपाहस्त संत बहिणाबाईच्या मस्तकांवर होता. व त्या त्यांच्या एकनिष्ठ शिष्यीण होत्या. अर्वाचीन प्रसिद्ध नाटककार श्री. 'अनंत वामन बर्वे' यांनीं आपल्या 'संत तुकाराम' नाटकांतून जी रंभा मंबाजीची इस्तकी म्हणून दाखविली आहे, ती दुसरी तिसरी कोणी नसून संत बहिणाबाई ह्याच होत. सदर गाथ्यांतलें बाईचें 'आत्मनिवेदन' हें प्रकरण वाचतांच आमच्या म्हणण्याची प्रतीति सर्वांस येईल.

संत बहिणाबाई यांनीं 'एक लक्ष चौपन हजार' अभंग केले असावेत, असें अनुमान करण्यास एक सबळ पुरावा आहे; तो असा कीं, 'संतश्रेष्ठ निळोबा महाराज पिंपळनेरकर ( हे बाईचे समकालीन व तुकाराम महाराजांचे शिष्य

यांत 'प्रसाद लक्ष चौपन हजार'

असा उघड खुलासा केला आहे. ही आरती मुद्दाम बाईच्या आरत्यांच्या प्रकरणांत आम्हीं सामील केली आहे ! ती वाचल्यावर कोणासही शंका उरणार नाहीं.

बाईचा काल ' शिवपूर ऊर्फ शिऊर–' बाराषाडा ' येथें शके सोळाशें बावीस आश्विन शु।। १ बुधवारीं झाला, ह्यांसही सबळ पुरावा बाईचे चिरंजीव ' संत विठोबा ' यांनीं बाईची आरती केली आहे त्यांत आहे ! असो; अशा संत स्त्री–रत्न संत बहिणाबाईच्या अभंगाचा गाथा आम्ही वाचकांपुढें व वारकरी सांप्रदायांपुढें ठेविला आहे. हा सर्वांस पसंत पडून जर वारकरी सांप्रदाय बाईचे अभंगाबद्दल उदार वृत्ति दाखवून फडावर व कीर्तनांतून बाईचे अभंगाचा पुरस्कार करतील तर हा लेखकही त्यांचा मोठा ऋणी होईल. शिवाय त्यांनीं जर आम्हांस ह्या अभंगासंबंधीं कांहीं चर्चा अगर विचारणा (पाहिजे असल्यास) केल्यास आम्ही अगदीं मनमोकळेपणानें त्यांच्या सहकारित्वानें करूं ! इतकें सांगून व तो परात्पर परमेश्वर आमचे हातून असेंच संत बहिणाबाईचें चरित्रही लवकरच पुरें करो, अशी प्रार्थना करून ही लहानशी प्रस्तावना पुरी करतों.

सर्वांचा कृपाभिलाषी

मु॰ कुंभारी पो॰ कोपरगांव
जि॰ अहमदनगर १९–४–२६ } विश्वनाथ नारायण कोल्हारकर.

# अनुक्रमणिका.



## ३ निर्याणपर.

## १६ श्री क्षेत्र पंढरी–पंढरीनाथ-पर अभंग.



## १७ (हरिभक्त–महिमा) पंढरी–महात्म्य.



## १८ पतिव्रताधर्मपर.



## १९ करुणापर.

## २२ नाच.



## २३ पाळणा. (पंचतत्त्वाचा)



## २३ पाळणा. (जोगी)

## ४७ प्रार्थना.



## ४८ शेवटचें मागणें.





# अभंगाचा अकारादि वर्णक्रम.



अभंगांक.



अभंगांक.



अभंगांक.



---

* हें दोन अभंग थोड्याशा शब्दफरकाशिवाय एकच आहेत असें वाचकांना वाटेल. परंतु मूळ प्रतींत २ ठिकाणीं असल्यानें तसेच घेतले आहेत.
सं. ‘दास-विठू’

अभंगांक.



अभंगांक.



अभंगांक.

* हे दोन्ही अभंग एकच आहेत परंतु मूळ प्रतींत दोन ठिकाणीं असल्यामुळें तसेंच येथें घेतले आहेत. सं. 'दास–विठु' कोल्हारकर.

# अनुक्रमणिका परिशिष्ट ‘ अ ’

# नजरचुकीनें झालेलीं कांहीं अशुद्धें.

| अ. | क. | अशुद्ध | शुद्ध | अ. | क. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १४ | १३ | दोघा | दोहा | ,, | ३ | वाढविला | वाढवी |
| ,, | २६ | हेचि तळमळी | हितु तळमळी | १४३ | १ | विधात्या | विधाता |
| २८ | ५ | गायीस मोरविली | गायीस गौरविली | १४७ | ३ | रे सोटा | दसवटा |
| ४१ | ५ | टाकियेली | वाटियेली | १७८ | १ | गुणाची नागूरा | गुणाची वाघूर |
| ५० | ५ | त्याची शिक्षा | त्यासी शिक्षा | १९८ | ४ | लाळा | लाळ |
| ५१ | ६ | विप्र हें | विप्रें हें | २३९ | ३ | मद्यपर | मद्यपी |
| ५२ | १७ | धांवा केला। | धांवा केला माझा | २४४ | ४ | तीर्थाटनें | तीर्थाटणें |
| ७१ | ४ | काये कवणावरीं | पाहे कवण वारीं | ३०१ | ५ | यापुढील 'परेचे परतें' हा अभंग ३०९ असून यांतच चुकून पडला आहे. | |
| ७२ | ३ | निवारीन कोणा | निवारें न कोणा | | | | |
| ७४ | ३ | तुकारामा | तुकाराम | | | | |
| ,, | ,, | मृत्युरूप | गुप्तरूपें | ३०७ | ३ | अध | अर्ध्व |
| ७९ | २ | करूं आलें इंद्रायणी | करूं आले स्नान इंद्रायणी | ३४९ | ४ | घरीं | घरीं |
| | | | | ३९८ | २ | मावार्थेसी | भावार्थेसी |
| ८२ | ८ | * ही टीप खाली पहा. | | ४१७ | ५ | कोण ऐसे | कोण कैसें |
| ८३ | ५ | गरुडटके | गरुडटकें | ४२२ | ३ | ब्राह्मणावांचाना | ब्राह्मणावांचोनी |
| ८५ | ४ | सांगती | सांगातीं | ४४६ | ३ | झटाटले | झगटले |
| ८७ | १ | आत्मज्ञान | आत्मज्ञाना | ४४९ | २ | सांगती। | सांगातीं। |
| ८७ | ९ | संस्था | संक्षा | ४५० | ३ | आर्षा | आर्षी |
| ८९ | १ | * | * | ४५४ | २ | विटे | विटों |
| ९१ | २ | महाउग्र अनुष्ठान | अनुष्ठान महा-उग्र। | ४५८ | ४ | हां ना | हीना |
| | | | | ,, | ६ | साधिजेला। | साधिजेल। |
| ,, | १४ | देऊन | देउळीं | ४६० | ७ | कुंकुमाचं | कुंकुमाचे |
| ९२ | ३ | 'कुम-चक्र' नाम | 'कूर्म-चक्र-ग्राम' | ४६६ | २८ | सावनें | साधनें |
| ९३ | ११ | धर्म कला | धर्म केला | ,, | ३३ | दाखिलें | देखिलें |
| ,, | १७ | वर्तातलें | वर्तोनलें | ,, | ३९ | व्याकपणें | व्यापकपणे |
| ९९ | २ | लेख प्रवीण | लेखक प्रवीण | ,, | ५६ | मौनमांडित | मौनमंडित |
| ,, | १५ | स्थळीं | स्थळां | ४७० | २ | मनाभावें | मनोभावें |
| ११० | २ | द्वैतें हारपलीं | द्वैत हरपलें | ४८८ | ५ | कोठील | कोंडीन |
| ११६ | ० | हा अभंग दुबार आहे | अभंग ८२ पहा | ४४९ | ३ | बंदे | बंदी (मूळ प्रतींत हाच शब्द आहे व तोच युक्त आहे. सं 'दास-विठू'; कोल्हारकर. |
| ११७ | ५ | समार्पिन | समर्पिन | | | | |
| १२३ | २ | निवाडा | निवाड | | | | |
| १३९ | ३ | पाहे | पाहे। | | | | |
| ,, | ६ | धारणा | धारणा। | | | | |
| १४० | १ | सुख दुःख | सुखदुःख ॥१॥ | | | | |

टीप:—१ चित्त.

* यांत ८ वें चरण चुकून छापणें राहिलें तें पुढें दिलें आहे. बहिणी म्हणे आतां विचारिजे बाळा। साशंकता प्रबळा नको ठेवा ॥ ८ ॥

* हा अभंग विठोबाकृत आहे.

| अ. | क. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४९० | २ | शेट | शठ |
| ४९६ | २ | होसी | होंती |
| ५२१ | १ | टीप ३ ‡ | |
| ५३० | ६ | सकर | संकर |
| ५५० | १ | ऐसें तो सांगतां | सांगतां तो ऐसे |
| ५६१ | हा अभंग दुबार पडला आहे, अभंग २४४ पहा. | | |
| ५६५ | ४ | पप्राहि | पश्चाहि |
| ५६७ | ५ | केहि है | ओहि है |
| ५६९ | ४ | बाक्रो साच | बांक्रो माच |
| ५७० | २ | करमे गावन | करतेगावत |
| ,, | ३ | कोउ न जाने | कोइ न जाने |
| ५८३ | २ | गाव रतन | नरतन |
| ५८८ | १ | हे तिसेह (?) लोळू देता खेह झोळू | |
| ,, | ७ | मेखला मस्तकीं | मखला। मस्त- |
| | | झुळझुळ | कीं झुळझुळा |
| ५८९ | १ | पाग | रंग |
| ५९८ | ३ | हताशस्त्र | धारतां शस्त्र |
| ६०० | २ | मन न धरां डोहो | मन न धरों डोहो |
| ६१५ | १ | आश्रयाची | आश्रमाची |
| ६२८ | २ | विवेश अर्थान्वय | विवेक अर्थान्वय |
| ६३९ | २ | निजपक्षीं | निजपंथीं |
| ६७५ | २ | नेघे नेदी | न नेघे न नेदी |
| ६८९ | ४ | येथीला | येथिल |
| ६९९ | ४ | करुणार्णव | करुणार्णवा |
| ७०७ | २ | शेषरोजा | शेषसेजा |
| ७३८ | २ | सांगुनि | मांडुनि |

टीप:—मूळांत 'होती' हाच शब्द आहे व तो बरोबर आहे.

‡ 'वर सांगितल्याप्रमाणें' याचे जागी 'गहनतत्त्व' प्रौढविचार असें पाहिजे.

# संत बहिणाबाईंचा गाथा.

## ॥ श्रीविठ्ठल ॥

### १ आदि परंपरा.

१ आदिनाथें उपदेश पार्वतीसी केला । मत्स्येंद्रें ऐकिला मच्छगर्भी ॥१॥ शिव-हृदयींचा मंत्र पै अगाध । जालासे प्रसिद्ध भक्तियोगें ॥ २ ॥ तेणें त्या गोरक्षा केलें कृपादान । तेथोनि प्रकट जाण । गहिनीप्रती ॥ ३ ॥ गहिनीनें दया केली निवृत्तिनाथा । बाळक असतां योगरूप ॥ ४ ॥ तेथोनी ज्ञानेश पावले प्रसाद । जाले ते प्रसिद्ध सिद्धासनीं ॥ ५ ॥ 'सच्चिदानंद बाबा' भक्तीचा आगरू । त्यासी अभयवरू 'ज्ञानें' केला ॥ ६ ॥ पुढें विश्वंभर शिवरूप सुंदर । तेणें राघवीं विचार ठेविलासे ॥ ७ ॥ केशव चैतन्य बाबाजी चैतन्य । झालेसे प्रसन्न 'तुकोबासी' ॥ ८ ॥ एकनिष्ठ भाव तुकोबा-चरणीं । म्हणोनी 'बहिणी' लाधलीसे ॥ ९ ॥

### २ आत्मनिवेदन.

२ देवगांव माझें माहेर साजणी । वेरुळ तेथोनी पूर्व भागीं ॥१॥ देवांचा समूह सर्व जया ठायीं । मिळालासे पाहीं 'देव-गांव' ॥ २ ॥ हिमाचलाहुनी चालला अगस्ती । चतुर्मास वस्ती केली जेथें ॥ ३ ॥ तेथोनी पश्चिमीं शिवनदी वाहात । तीर्थ हें अद्भुत तीर्थांमाजीं ॥ ४ ॥ लक्ष तीर्थ जेथें मज्जनीं सर्वदा । लाक्षायणी सदा वास जेथें ॥ ५ ॥ स्थळ तें पवित्र देखोनी अगस्ती । अनुष्ठाना येती सूर्योदयीं ॥ ६ ॥ वर दिधलासे ऋषी अगस्तीतें । जाणे लक्ष तीर्थें 'लाक्षा ग्रामा' ॥ ७ ॥ स्नान दान करीं जप अनुष्ठान । सिद्धि तेथें जाण होय नरा ॥ ८ ॥ अगस्ती राहोनी देवगांवीं जाण । शिवनदीस्नान करी सदा ॥ ९ ॥ बहिणी म्हणे ऐसें स्थळ देवग्राम । तेथें माझा जन्म झाला असे ॥ १० ॥

३ 'आऊजी कुळकर्णी लेखक ते स्थळीं । तयाचिये कुळीं जन्म माझा ॥ १ ॥ जननी 'जानकी' पिता 'आऊदेव' । देवगांव नांव स्थळ त्यांचें ॥ २ ॥ तया-चिये कुळीं नाहीं जी संतान । करित जीं रुतां न कांहीं वाही ॥ ३ ॥ लक्ष तीर्थीं

नित्य करूनिया स्नान । शिव-अनुष्ठान आरंभीलें ॥ ४ ॥ किती येक दिवशीं झालें स्वप्न तया । माझीया पितया आऊजीसी ॥ ५ ॥ होईल संतान कन्या दोन पुत्र । ब्राह्मणें पवित्र सांगितलें ॥ ६ ॥ बहिणी म्हणे एका वरुषीं मी उत्पन्न । नवमास पूर्ण कन्या झालें ॥ ७ ॥

४ करिती उत्साह बारशा ब्राह्मण । करूनी ब्राह्मण घरां गेले ॥ १ ॥ पिता आऊदेव गेला अरण्यांत । तंव अकस्मात लाभ झाला ॥ २ ॥ मोहर बांधिली पितांबरी गांठीं । सांपडली वाटीं वेरुळाच्या ॥ ३ ॥ घरां येउनीया आनंदें बोलती । कन्या आम्हांप्रती लाभाईत ॥ ४ ॥ विश्वेश्वर ब्राह्मण ज्योतिषी नेटका । तयानें पत्रिका संपादिली ॥ ५ ॥ होईल कल्याण इचेनी तुमचें । ऐसें पत्रिकेचें फळ वाची ॥ ६ ॥ बोलती देवलसी भाग्याची होईल । आयुष्याचें बळ फार आहे ॥ ७ ॥ बाहिणी म्हणे ऐसें द्विजें सांगितलें । तयासी दीधलें वस्त्र गायी ॥ ८ ॥

५ कन्यादान घडो हा अर्थ पाहोन । करावया लग्न द्विज आले ॥ १ ॥ तंव आकस्मात प्राक्तनासारिखा । 'शिऊराचा' सखा एक आला ॥ २ ॥ पूर्वील सोयरा लग्नाचा इच्छिक । विवेक पाठक रत्न नामीं ॥ ३ ॥ लाउनी मागणें केलें वाक्-प्रदान । नेमुनीया लग्न संपादीलें ॥ ४ ॥ तंव बंधू झाला माझे पाठीवरी । अनुष्ठाना करी पूर्वीचिया ॥ ५ ॥ म्हणतां हें सभाग्य बंधू पाठीवरी । झाला हे निर्धारी गुण इचे ॥ ६ ॥ बाहिणी म्हणे ऐसे झाले वर्षे तीन । त्यापुढें जें होणें तेंही बोले ॥ ७ ॥

६ मोनस गोत्र माझ्या पित्याचें वरिष्ठ । भ्रतारही श्रेष्ठ गौतम तो ॥ १ ॥ शिवपूर नाम तेथील ज्योतिषी । मायबापें त्याशीं समर्पिलें ॥ २ ॥ द्वितीय संबंधीं वरुषा तिसाचा । नोवरा भाग्याचा ज्ञानवंत ॥ ३ ॥ बाहिणी म्हणे त्याशीं कन्यादान केलें । आंदण दिधलें सर्व कांहीं ॥ ४ ॥

७ लग्न संपादोनी जाले वरुष चारी । गोत्रजाचा वैरी पिता जाला ॥ १ ॥ वृत्तीच्या संबंधें कलह मांडला । माझा बोलाविला भ्रतार हा ॥ २ ॥ गोत्रजाची फेडा बाकीसाकी ऋण । मागती लेहून शेतमळा ॥ ३ ॥ आतां येथोनिया जावें परदेशीं । तरीच आम्हांसी सुख प्राप्त ॥ ४ ॥ तूं सखा सोईरा मित्र तूंचि जामात । आमुचा हा अंत पाहूं नको ॥ ५ ॥ वातलसे बंदीं सोडवील कोण । सखा तूं होऊन सोडवावें ॥ ६ ॥ मग त्या भ्रतारें काढिले बाहेरी । निशिचिया भरीं मध्य रात्रीं ॥ ७ ॥ पिता माता बंधू मजही समवेत । गेले रातोरात गंगा-तीरा ॥ ८ ॥ प्रवरा-संगमीं केलें गंगास्नान । घेतलें दर्शन सिद्धनाथें ॥ ९ ॥ बहिणी म्हणे पुढें चालिलों तेथोनी । पाय वो संतुनी महादेवा ॥ १० ॥

८ गंगा देखोनिया सिद्धेश्वर देव । तेथोनिया जीव निघो नेणें ॥ १ ॥ आव-

डीचा हेत पूर्वील संस्कार । श्रवणीं आदर कीर्तनाचा ॥ २ ॥ पुराण-श्रवण पुजा देवस्थान । ब्राह्मणपूजन प्रीति याची ॥ ३ ॥ संन्यासी सज्जन संत महानुभाव । यांचे पायीं जीव लागलासे ॥ ५ ॥ निघतां तेथून थोर वाटे दुःख । करेंदें अदृष्ट काय कीजे ॥ ५ ॥ बहिणी म्हणे पुढें महादेवा जावें । भ्रतार गौरवें नेत आम्हां ॥ ६ ॥

९ मागोनी भिक्षेसी क्रमीतसों वाट । सोसुनीया कष्ट नानापरी ॥ १ ॥ माय बाप बंधू भ्रतारेसीं जाण । महादेववन पहावया ॥ २ ॥ नरसिंहदर्शन घेउनी संपूर्ण । पांडुरंगस्थान देखीयेलें ॥ ३ ॥ भीमाचंद्रभागा पुंडलीक भक्त । वेणूनादीं मुक्त प्राणीमात्र ॥ ४ ॥ पद्मालयीं स्नान देवाचें दर्शन । नामसंकीर्तन आयकीयेलें ॥ ५ ॥ राही रुख्मुमाबाई सत्यभामा सर्व । देखियेले पूर्वद्वारयुक्त ॥ ६ ॥ महाद्वारां तुनी करितां प्रवेश । वाटलें मनास महासौख्य ॥ ७ ॥ पांडुरंग मूर्ती देखोनी पवित्र । संतोषले नेत्र इंद्रियेसीं ॥ ८ ॥ केली प्रदक्षिणा महा हर्षयुक्त । चित्त हें विरक्त करोनिया ॥ ९ ॥ वाटे मनामाजीं रहावें येथेंची । परी प्राक्तनाची दशा नाहीं ॥ १० ॥ जीव जावो परी पंढरीचें स्थळ । न संडावें जळ ऐसें वाटे ॥ ११ ॥ बहिणी म्हणे पंच रात्री पंढरीस । केला आम्हीं वास पुण्ययोगें ॥ १२ ॥

१० चैत्रपौर्णिमेस गेलों महादेवा । देव-यात्रा सर्वा पाहवीलें ॥ १ ॥ जालें समाधान देखोनी शंकर । मागें अभयकर भक्तियोगें ॥ २ ॥ पंचरात्री तेथें क्रमोनिया, जाण । सिंगणापुरस्थान तेथें आलों ॥३॥ कोराळीचें कण सहज मेळवूं । तेणें सुखी जीवू होय माझा ॥ ४ ॥ अमृताचे परी वाटे गोड अन्न । पाप जळे जाण भक्षिलीया ॥ ५ ॥ बहिणी म्हणे माझे वय वर्षें नव । जालें अंतर्भाव सांगितला ॥ ६ ॥

११ भ्रतार विचारी सर्वांस विचार । रहावया थार एथें नाहीं ॥ १ ॥ ब्राह्मणाचे गांवीं जाउनी रहावें । ऐसें मनोभावें वाटतसें ॥ २ ॥ रहिमतपुरीं आहे ब्राह्मण समुदाय । तेथें वस्ती ठाव सर्व करूं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे पूर्व प्राक्तनाचे योग न सोडी स्थळ त्याग केलीयाही ॥ ४ ॥

१२ रहिमतपुरीं सर्व जाउनी राहिलों । आवघीच लागलों भिक्षा करूं ॥ १ ॥ भ्रतार तो थोर स्नानसंध्या करी । देव तयावरी कृपावंत ॥ २ ॥ तेथील उपाध्य ग्रामीचा ग्रामस्थ । जावया उदीत वाराणसीं ॥ ३ ॥ ग्रामीचा व्यवहार चालावया लागीं । भ्रतार विभागी केला तेणें ॥ ४ ॥ देखोनी नेटका ज्ञानी विद्यावंत । सर्वही गृहस्थ तया पुसे ॥ ५ ॥ आपण काशीस जाऊनी तुम्हांसी । उपाध्या ज्योतिषं 'रत्नाकर' ॥ ६ ॥ तेंही केलें मान्य मग राहो तेथें । निर्वाह जाला येथें वरुषाचा ॥ ७ ॥ यावरी तो जाणा आलीया ग्रामासीं । रक्षिलें आम्हांसी वर्ष एक ॥ ८ ॥ ऐसें वर्ष अकरी जालें मजलागीं । वाटे संतसंगीं असावेसें ॥ ९ ॥ कथा आयकावी

पुराण-श्रवणीं । ब्राह्मण-पूजनीं चित्त रिझे ॥ १० ॥ तेथोनी प्राक्तनें वोढोनिया जाण । स्थळ तें त्यागून चालविलें ॥ ११ ॥ उदास अंतर नावडेचि कांहीं । प्राक्तनासीं नाहीं उपाय तो ॥ १२ ॥ बहिणी म्हणे पुढें कोल्हापुर क्षेत्र । जें अति पवित्र तेथें गेलों ॥ १३ ॥

१३ हिरंभट एक ब्राह्मण वेदांती । दोहीं शास्त्रगती यजुर्वेदी ॥ १ ॥ थोर भाग्यवंत पवित्र अग्निहोत्र । विद्यार्थी सर्वत्र पठण करिती ॥ २ ॥ तयाचिये गृहीं पाहोनिया स्थळ । राहोनी निश्चळ श्रवण होय ॥ ३ ॥ 'जयराम गोसावी' त्यांची हरिकथा । नित्य भागवता श्रवण करूं ॥ ४ ॥ बहिणी म्हणे तेथें करोनिया वास । सदा निजध्यास आत्मचर्चा ॥ ५ ॥

१४ कोणे एके वेळी आकराव्या वरुषांत । सोमवारीं वृत्त थोर झालें ॥ १ ॥ हिरंभट यासीं गोदान दिधलें । द्विमुखी पाहिलें यजमान ॥ २ ॥ काळी ते कपिला काळें तिचें वस्त्र । प्रदक्षणें पुच्छ निवेदिलें ॥ ३ ॥ सुवर्णाचीं शिंगें रुपीयाचे खूर । वरी पितांबर पांघुरीला ॥ ४ ॥ सर्व उपचारें गोदान दिधलें । पहावया आले सर्वजण ॥ ५ ॥ उपजोनी वत्स गाय नेली घरां । वत्स पीत क्षीरा दोहाचिया ॥६॥ जाले दिवस दहा अकराव्या दिनीं । हिरंभटा स्वप्नीं द्विज बोले ॥७॥ ब्राह्मण हा तुझे आहे ओसरीस । कपिला तयांस निवेदिजे ॥ ८ ॥ स्वप्नापरि साच केलें हिरंभटें । भ्रतारासी निष्ठें गाय दिल्ही ॥ ९ ॥ आनंदलें मन सर्वांचेंही जाण । गायी-सुश्रूषण घडे आम्हां ॥ १० ॥ नित्य मायबाप जाती तृणालागीं । पाळिती प्रयोगी जाण तोषें ॥ ११ ॥ गायीचें तें वत्स तेंही असें कपिला । माझे ठायीं तिला हेत बहु ॥ १२ ॥ मीच सोडीं तरी वत्स रिघे दोघा । करितां दोहावा सवे माझी ॥ १३ ॥ पाणी मीच पाजीं तृण घालीं मीच । मजविण काच मनीं वाहे ॥ १४ ॥ मी जाय पाणीया ओरडे तें वत्स । गाय वाग्र पुच्छ सवें चाले ॥१५॥ कहनीया लोक नवलची राहाती । उगेच पहाती वत्स गायी ॥ १६ ॥ मोकळेंचि वत्स असोनिया जाण । न वजे आपण गायीपाशीं ॥ १७ ॥ तृण घालीं तरी भक्षिती आपण । पाजिल्या जीवन तेव्हां पीती ॥ १८ ॥ रात्रीचे अवसरीं वत्स निजे सेजें । पुराणीं तें कुंजे श्रवणकाळीं ॥ १९ ॥ कथेपाशीं जाय सवें तेंहि येत । उभयेची निवांत कथा परिसे ॥ २० ॥ गाय गोठा घरीं आपण कथेसी । जातां मी स्नानासी सवें चाले ॥२१॥ करिती अपूर्व हे तुझें संबंधी । लोक नाना शब्दीं बोलताती ॥ २२ ॥ कोणी म्हणे वत्स आहे योगभ्रष्ट । कोणी म्हणे नष्ट सवे इची ॥२३॥ कोणी म्हणती जन रिणाइत इचे । रीण फिटे तिचें तैंच तुटे ॥ २४ ॥ ऐसे नानापरी वत्स तें न सोडी । मजही आवडी तयापाशीं ॥ २५ ॥ न देखतां वत्स होय तळमळी । जलाविण मासोळी तैसें वाटे ॥ २६ ॥ दाळितां कांडितां वाहातांही

पाणी । वत्साविण जनीं नावडे हो ॥ २७ ॥ भ्रतार रागीट नावडेची तया । परी त्यांसी माया उपजली ॥ २८ ॥ म्हणे असो तुज नाहीं मुलबाळ । हाची तुझा खेळ जाण मनीं ॥ २९ ॥ तुजही आवडी कथा-पुराणाची । संगती कुकाची तुज जाली ॥ ३० ॥ तंव तये वेळीं जयराम गोसावी । तेथें तो स्वभावीं सहज आले ॥ ३१ ॥ कथा घरोघरीं ब्राह्मणाची पुजा । संतर्पण द्वीजां आरंभिलीं ॥ ३२ ॥ रात्रीं कथा होती दिवसांही करिती । मायबापें प्रीती पाहाती तें ॥ ३३ ॥ तेथें तया संगें मीही जाय कथे । वत्सही तें तेथें सवें चाले ॥ ३४ ॥ जेथें बैसे माय तेथें मी आपण । वत्सही धांवोन सवें उभे ॥ ३५ ॥ हागेना मुतेना उभेंचि श्रवण । करित कीर्तन नामघोष ॥ ३६ ॥ आरती जालीया नमस्कार होती । आपणही क्षितीं ठेवी डोकें ॥ ३७ ॥ देखोनिया जन हांसती सकळ । परि ते प्रेमळ आल्हादची ॥ ३८ ॥ म्हणती योगभ्रष्ट पूर्वील हरिभक्त । गोवेषें विरक्त पहा कैसे ॥ ३९ ॥ तंव येके दिवशीं मोरोपंत कथा । करावया भक्तां पाचारलें ॥ ४० ॥ दिवस एकादशी प्रहरा दों कथा । मांडिली तत्वतां महानंदें ॥ ४१॥ जयराम गोसावी शिष्य समुहासीं । बैसले सभेसीं आसनीं ते ॥ ४२ ॥ टाळ मृदंगेसीं होतसे गायन । मिळालेसे जन सर्व तेथें ॥ ४३ ॥ तेथें आपणही माय बाप बंधू । कथा परमानंदू पहातसें ॥ ४४ ॥ समागमें वत्स मजपाशीं बैसलें । लोकीं त्याशीं नेलें दारवंटा ॥ ४५ ॥

म्हणती स्थळ नाहीं बैसावया जनां । पशू हे श्रवणा काय योग्य ॥ ४६ ॥ मी रडों लागलें वत्सालागीं तेथें । तंव जालें श्रुत गोसावीया ॥ ४७ ॥ ओरडतां वत्स मज ये रडतां । सांगती अवस्था स्वामीपासीं ॥ ४८ ॥ म्हणती एक मुली हिरंभटाघरीं । आली ते श्रीहरी-कीर्तनासी ॥ ४९ ॥ तिजसवें एक वत्स असें त्याशीं । सांगातें दिननिशीं हिंडवीतें ॥ ५० ॥ तें वत्स बाहेरी घातिलें अडचणीं । यालागीं ती स्फुंदुनी रडतसे ॥ ५१ ॥ वत्स तें ओरडे बाहेरीं तिष्टतें । रडत ही येथें गलबला ॥ ५२ ॥ साक्ष अंतरींचा तो स्वामी जयराम । वत्स-अंतर्याम ओळखीलें ॥ ५३ ॥ म्हणे आणा त्याशी वत्साचें अंतरीं । काय नाहीं हरी आत्मवेत्ता ॥५४॥ कथेलागीं जीव होतो कासावीस । पशू कीं तयास म्हणों नये ॥ ५५ ॥ आणाविलें वत्स बैसविलें आसनीं । पाहोनी नयनीं तोष वाटे ॥ ५६ ॥ मजही कृपावंत कृपेचिये शब्दें । बोलावी प्रारब्धें पूर्व पुण्य ॥ ५७ ॥ कुर्वाळोनी दोघां पाहे पूर्ण दृष्टी । न मानेचि गोष्टी जनांलागीं ॥ ५८ ॥ कथा होत असे गजरें महाथोर । चित्त हें निर्भर वैष्णवाचें ॥ ५९ ॥ जयराम गोसावी याचें मनोगत । पुण्यशील सत्य उभय वर्गी ॥ ६० ॥ कथेमाजीं वत्स उभेंचि तिष्टत । रूपीं सर्व चित्त आणुनीया ॥ ६१ ॥ मुली हे लहान वय इचें थोडें । श्रवण हें आवडे नवल मोठें ॥ ६२ ॥ म्हणे इचे कोणी आहे ये कथेसी । मायबाप तिशीं सांगितला ॥६३॥ भ्रतार इयेचा आहे बहुयोग्य । परि

हिचें वैराग्य थोर दिसे ॥ ६४ ॥ मायबापासवें येतसे पुराणीं । वत्सही घेऊनी समागमें ॥ ६५ ॥ मग म्यां आपुलें आपण पाहिलें । चरणीं घातलें लोटांगण ॥ ६६ ॥ वत्सही तैसेंची पायांवरी पडे । अपूर्वता घडे सर्व जनीं ॥ ६७ ॥ याम सध्य दोनी होते दोघे जणे । वत्सा मज तेणें उठविलें ॥ ६८ ॥ कथा संपलीया लोक गेले सर्व । परि हें अपूर्व म्हणती जन ॥६९॥ हिरंभट आणि आणिकही जन । म्हणती हें चिन्ह कोणां कळे ॥७०॥ बहिणी म्हणे ऐसें कोल्हापुरीं होय । पुढीलहि सोय तुम्हां सांगों ॥ ७१ ॥

१५ पिता-माता-बंधू-समवेत बिऱ्हाडीं । पावले ते घडी वत्सयुक्त ॥ १ ॥ दोन घडी रात्र होती ते समयीं । वत्स तयीं गायीं पाजीयेलें ॥ २ ॥ हिरंभटीं स्नान केलें अग्नीसेवें । कार्तीकाचे दिवे आकाशांत ॥ ३ ॥ सडे संमार्जन केलें स्नान तेथें । गायी वत्स हातें कुर्वाळीलें ॥ ४ ॥ भ्रतारानें स्नान केलें आपुलिया । दक्षिणेची गया कोल्हापूर ॥ ५ ॥ तंव कोणी एक मिराबाई होती । तिनें कथास्थिति सांगितली ॥ ६ ॥ भ्रताराचें कानीं कथेंतील सर्व । सांगाया अपूर्व म्हणोनिया ॥ ७ ॥ वत्साचें वृत्तांत माझेंही रुदन । भ्रताराचे कान तृप्त केले ॥ ८ जयराम गोसावी विदेही अवस्था । तेणें हात माथां ठेवियेला ॥ ९ ॥ थोर याचें भाग्य तो यांशीं बोलीला । आशिर्वाद दिला योग्य तेणें ॥ १० ॥ जातीचा भिक्षुक अंतरीं बहु राग । धावला सवेग गेहाप्रती ॥ ११ ॥ धरुनीया वेणी मारिलें यथेष्ट । हिरंभटा कष्ट फार झाले ॥ १२ ॥ नावरे मारितां गायही ओरडे । वत्स तेंही रडें कांसाविसीं ॥ १३ ॥ अकरावें वरुष मज होतें तेव्हां । काय पतिसेवा अंतरलें ॥ १४ ॥ मायबाप बंधू बोलती न कांहीं । भ्रतारें क्रोधही आवरिला ॥ १५ ॥ शांत झालीया पुसत तयांस । स्त्रियेवरी त्रास कासयाचा ॥ १६ ॥ येरु म्हणे रात्रीं कथेंत प्रतिष्ठा[१] । काय यांची निष्ठा देखियेली ॥ १७ ॥ कैचें तें पुराण कैची हरिकथा । मारीन अन्यथा नव्हे येथ ॥ १८ ॥ इतुकें बोलोनिया भ्रतार पुनरपी । क्रोध तो साटोपी अग्नि-ऐसा ॥ १९ ॥ बहिणी म्हणे तेव्हां देह संकल्पिलें । प्राक्तनाचें केलें कोण वारी ॥ २० ॥

१६ आलें मना तंवें मारिलें बळकट । बांधोनिया मोट टाकियेली ॥ १ ॥ हिरंभट म्हणे व्हा तुम्ही बाहेरी । हा दिसे हत्यारी चांडाळ कीं ॥२॥ मग मातापिता हिरंभटालागीं । प्रार्थुनीया वेगीं स्थीर केलें ॥ ३ ॥ म्हणती कृपा करा आजि दिसभरी । प्रातःकाळीं दुरी ठाव पाहों ॥ ४ ॥ तयावरी वत्स गाय दोघे जण । न खाती तृण जळासहीं ॥ ५ ॥ देखोनी वत्सासी गायींचा वृत्तांत । मोट तो सोडीत ते वेळीं ॥ ६ ॥ आणीलें जवळी गाय वत्सापाशीं । हुंबरली जैसी पुत्र माता ॥ ७ ॥

---

१ पाठभेद:--गोंच शृगें. २ आतां.

आपण देखीलें वत्स आणि गाय । म्हणे प्राण जाय तरी बरा ॥ ८ ॥ बहिणी म्हणे तया तृण-पाणी पाजी । न घेती ते माझी थोर माया ॥ ९ ॥

१७ न खाती तृण न घेती जीवन । आपणही अन्न टाकियेलें ॥ १ ॥ नुठती सर्वथा स्वस्थळापासून । येती सर्वजण पाहावया ॥ २ ॥ जयराम स्वामीस सांगितलें जनीं । पहावया निर्वाणीं तेही आले ॥ ३ ॥ भ्रतारें तयासीं केला नमस्कार । आपुलें अंतर एकानिष्ठ ॥ ४ ॥ घातिलें आसन जयराम स्वामीस । हिरंभटीं त्यांस पूजियेलें ॥ ५ ॥ मिळोनिया लोक पाहाती लोचनीं । स्वामीही ते क्षणीं आनंदले ॥ ६ ॥ म्हणतां ब्राह्मण तूं इचा भ्रतार । सांगतों निर्धार ऐक आतां ॥ ७ ॥ योगभ्रष्ट इचीं साधनें बळकट । तूं इसीं कष्ट करूं नको ॥ ८ ॥ स्वधर्मैंची तुझी करील ही सेवा । उद्धराल जीवा आपुलीया ॥ ९ ॥ तुझें पदरीं कांहीं पूर्वील सुकृत । तेणें ही सांगात प्राप्त जाली ॥ १० ॥ गायी आणि वत्स हें इचें सांगाती । अनुष्ठानीं होती ऐक्यभाव ॥११॥ हेंच इचें गुरु हें इचें साधन । तोडील बंधन आपुलें हें ॥ १२ ॥ इचे समागमें करिती जे वास । तेही भक्तिरस घेती सुखें ॥ १३ ॥ आयकसी तरी बरें होय तुझें । येथें काय माझें बळ आहे ॥ १४ ॥ बहिणी म्हणे ऐसें बोलोनी जयराम । पाहे मनोरम सर्व चिन्हें ॥ १५ ॥

१८ स्वस्थाना आपण चालीले जयराम । शिष्यांचा संभ्रम फार होता ॥ १ ॥ म्हणती जयराम अनुष्ठानी तिघे । पूर्वींच्या प्रसंगें एकानिष्ठ ॥ २ ॥ अंतराय कांहीं अनुष्ठानीं राहिल्या । गायी या जन्मल्या पुण्यवेगें ॥ ३ ॥ ह मुली संपूर्ण आहे अनुष्ठान । चित्तशुद्धि जाण इस आहे ॥ ४ ॥ ऐसें परस्परें बोलतां उत्तरें । हे कानीं सादरें ऐकीयेलों ॥ ५ ॥ बहिणी म्हणे गेले स्वामी स्वस्थानासी । मागील वृत्तांसी जाण सांगो ॥ ६ ॥

१९ द्वादशी क्रमोनी त्रयोदशी अंत । वत्सासी देहांत-समय आला ॥ १ ॥ तेथ हिरंभट बोलियला श्लोक । सहज स्वाभाविक ' मूकं ' करोति ॥ २ ॥ पूर्वार्ध श्लोकाचा सरताची जाण । बोलिलें आपण वत्स तेव्हां ॥ ३ ॥ यत्कृपा तमहं वंदे बोले शब्द । श्लोकउत्तरार्ध वत्स बोले ॥४॥ आयकीला सर्व लोकीं ता श्लोकार्ध । करिती संवाद परस्परें ॥ ५ ॥ तंव त्या वत्सें टाकियेला प्राण । आले मी धांवोन तयापाशीं ॥ ६ ॥ प्राणासवें प्राण जाऊं पाहे माझा । प्राक्तनासी दुजा यत्न नाहीं ॥ ७ ॥ गाय हंबरडे दोहींवरी मान । टाकी परी जाण शब्द कैचा ॥ ८ ॥ बहिणी म्हणे देह प्राक्तनें राखिलें । पुढें काय झालें कोण जाणें ॥ ९ ॥

२० जयराम स्वामीस कळला वृत्तांत । वत्सासी त्या अंतकाळ आला ॥ १ ॥ श्लोकार्ध म्हणोनी प्राण वत्स त्यजी । योग साजला जी तयापुढें ॥ २ ॥ मग सर्व श्रेष्ठ संत साधुजन । करीत कीर्तन वत्स नेलें ॥ ३ ॥ दिंडी पताकानें मिरविलें

वत्स । गायसर्वे तुच्छ यार्णी देहें ॥ ४ ॥ हुंबरे ह्मणोनी चालें मागें मागें । गाय अंतरंगें महा दुःखी ॥ ५ ॥ पुरुनिया वत्स आले सर्व जन । करुनीया स्नान गृहां गेले ॥ ६ ॥ गाय वत्सापाशीं जाऊनी हुंबरे । मागुती ते फिरे गृहासी ये ॥ ७ ॥ मज विलोकितां मी तों अचेतन । माझ्या देहीं प्राण आढळेना ॥ ८ ॥ ऐसे दिन चारी लोटलीयावरी । प्रतिपदेमाझारीं मध्यरातीं ॥ ९ ॥ बोलीला ब्राह्मण येऊनी सन्मुख । सावध विवेक धरीं बाई ॥ १० ॥ सावध सावध सावध तूं मनीं । श्रवणीं ऐकोनी देह कांपे ॥ ११ ॥ तंव गाय नाहीं वत्स ना ते लोक । माय ते सन्मुख बैसलीसे ॥ १२ ॥ बंधू पिता आणि भ्रतार बैसला । सोज्वल लागला दीप असे ॥ १३ ॥ तेथोनीया मन करोनी सावध । स्मरणीं स्वतां सिद्ध चित्त केलें ॥ १४ ॥ बहिणी म्हणे देह सर्वही विकळ । परि तें निश्चळ चित्त माझें ॥ १५ ॥

२१ उघडोनी नेत्र पाहे जंव पुढें । तंव दृष्टी पडे पांडुरंग ॥ १ ॥ देखीली पंढरी ध्याना तेची येत । जयराम दिसत दृष्टीपुढें ॥ २ ॥ ब्राह्मण स्वप्नांत देखिला तो जाण । त्याची आठवण मनीं वाहे ॥ ३ ॥ न दिसे आणिक नेत्रांपुढें जाण । नामाचें स्मरण मनीं राहे ॥ ४ ॥ पूर्वील हरिकथा आयकिल्या होत्या । त्या मनीं मागुत्या आठवती ॥ ५ ॥ तुकोबाचीं पदें अद्वैत प्रसिद्ध । त्यांचा अनुवाद चित्त स्फुरवी ॥ ६ ॥ ऐसीं ज्याचीं पदें तो मज भेटतां । जीवास या होतां तोष बहू ॥ ७ ॥ तुकोबाचा छंद लागला मनासी । ऐकतां पदांसी कथेमाजीं ॥ ८ ॥ तुकोबाची भेटी होईल तो क्षण । वैकुंठासमान होय मज ॥ ९ ॥ तुकोबाची ऐकेन कानीं हरिकथा । होय तैसें चित्ता समाधान ॥ १० ॥ तुकोबाचें ध्यान करोनि अंतरीं । राहे त्याभीतरीं देहामाजीं ॥ ११ ॥ बहिणी म्हणे तुका सद्गुरु सहोदर । भेटतां अपार सुख होय ॥ १२ ॥

२२ मच्छ जैसा जळावांचोनी तडफडी । तैसीच आवडी तुकोबाची ॥ १ ॥ अंतरीचा साक्षी असेल जो प्राणी । अनुभवें मनीं जाणेल तो ॥ २ ॥ तृषितांसी जैसें आवडे जीवन । तैसा पिंड प्राणावीण तया ॥ ३ ॥ बहिणी म्हणे हेत तुकोबांचें पायीं । ऐकोनिया देहीं पदें त्यांचीं ॥ ४ ॥

२३ संचितासी दग्ध करी ऐसा कोण । सद्गुरूवांचोन जाण मना ॥ १ ॥ यालागीं सद्गुरु असावा उत्तम । जेणें निमे श्रम संसाराचा ॥ २ ॥ त्रिविध तापासी कोण करी शांत । सद्गुरु एकांत न जोडतां ॥ ३ ॥ जन्ममरणाची कथा कैं निवार । सद्गुरु निर्धारें न भेटतां ॥ ४ ॥ वासना निःशेष निवारेल तेव्हां । भेटेल तुकोबा सद्गुरु तो ॥५॥ बहिणी म्हणे माझा जाऊं पाहे जीव । कां हो न ये कींव तुकोबा ॥ ६ ॥

२४ न बोलवे शब्द अंतरींचा धावा । नायके तुकोबा काय कीजे ॥ १ ॥ अदृष्ट करंटें साह्य न हो देव । अंतरींची हांव काय करूं ।। २ ।। तेरा दिवस ज्यानें वह्या उदकांत । घालोनीया सत्य वांचविल्या ॥३॥ महाराष्ट्रीं शब्दांत वेदांतांचा अर्थ । बोलीला लोकांत सर्वद्रष्टा ॥ ४ ॥ अंतर साक्ष आहे निरोपणीं हेत । जड परी चित्त चोळखेना ।। ५ ।। बहिणी म्हणे मीच असेन अपराधी । अन्याय त्रिशुद्धी काय त्यांचा ॥ ६ ॥

२५ बहुत अंतरीं शोक आरंभीला । कां मज विठ्ठला मोकलीलें ॥ १ ॥ त्रिविध तापानें तापलें मी बहू । जाइना कां जीऊ प्राण माझा ॥ २ ॥ तंव अकस्मात सातविया दिनीं । नामसंकीर्तनीं घोषयुक्त ॥ ३ ॥ तुकाराम रूपें येवोनी प्रत्यक्ष म्हणे पूर्वपक्ष सांभाळींजे ॥ ४ ॥ नको करूं चिंता असें मी तुजपाशीं । घेईं अमृताशी हातींचीया ।। ५ ।। गाय केले वत्स मुखीं निघे धार । अमृत हें सार सेवीं हेंची ।। ६ ।। ठेवोनीया कर मस्तकीं बोलीला । मंत्र सांगीतला कर्णरंध्रीं ॥ ७ ॥ म्यांही पायांवरी ठेविलें मस्तक । दिधलें पुस्तक मंत्र गीता ॥ ८ ॥ कार्तिकांत वद्य पंचमी रविवार । स्वप्नींचा विचार गुरु-कृपा ॥ ९ ॥ आनंदलें मन चिद्रूपीं कोंदलें । उठोनी बैसलें चमत्कारें ॥ १० ॥ मंत्र आठविती तुकोबास्वरूपा । स्वप्नामाजीं कृपा पूर्ण केली ।। ११ ।। अमृत पाजीलें चवीं अनारिसीं । साक्ष ज्याची त्यासी मनामाजीं ॥ १२ ॥ बहिणी म्हणे ऐसी कृपा सद्गुरूची । तुकारामें साची पूर्ण केली ।। १३ ।।

२६ जालें समाधान ब्राह्मणाच्या शब्दें । स्वप्नामाजीं पदें आठविती ॥ १ ॥ परी अंतरींच तुकाबाचें ध्यान । दर्शनावांचोन करितसें ।। २ ।। जयाचिया पदें होतसे विश्रांती । तेचि देहाकृति विठ्ठलाची ॥ ३ ॥ विठ्ठलासी तया नाहीं भेदभाव । ऐसें माझें मन साक्ष आहे ॥ ४ ॥ पांडुरंग-तुका पांडुरंग-तुका । वेगळीक देखा होय केवीं ॥ ५ ॥ कलियुगीं बौद्धरूप धरी हरी । तुकोबा शरीरीं प्रवेशला ॥ ६॥ तुकोबाची बुद्धि पांडुरंग रूप । मन तें स्वरूप तुकोबाचें ॥ ७ ॥ तुकोबाचें सर्व इंद्रिय-चालक । पांडुरंग देख सत्य आहे ॥ ८ ॥ तुकोबाचे नेत्र तेही पांडुरंग । श्रोत्र ते अभंगरूप त्याचे ॥ ९ ॥ तुकोबाचे हात लिहिताती जें जें । तेंचि तें सहजें पांडुरग ।। १० ।। सर्वही व्यापार तुकोबाचे हरी । आपणचि करी अद्वयत्वें ॥११॥ बहिणी म्हणे रूपें व्यापक 'तुका' वा । ध्यान माझ्या जीवा हेंचि पाहे ॥१२॥

२७ भ्रतारें टाकिलें मोट बांधोनिया । न सोसी ते तया क्लेशावस्था ॥ १ ॥ चतुर्थ दिवशीं जीव टाकियेला । विठ्ठलें दाविला चमत्कारु ।। २ ।। ब्राह्मणाच्या रूपें येवोनी सांगत । सावधान चित्त करीं पुढें ॥ ३ ॥ अंतरीं सावध होउनी राहिलें । चित्त म्यां गोविलें तुकोबासी ।। ४ ।। वत्स गेलीयासी दिवस

सातवा । येवोनी तुकोबा स्वप्नामाजीं ॥ ५ ॥ केलें समाधान पाजिलें अमृत । वत्सासीं करीत-गाय भेटी ॥ ६ ॥ अमृता पाजोनी सांगीतला मंत्र । जो कां हा सर्वत्र लोक जपती ॥ ७ ॥ मस्तकीं हस्तक ठेवोनिया कृपा । केली त्या स्वरूपा तोची जाणे ॥ ८ ॥ कृपेचा महिमा आहे तो अपार । वत्स बोले सार श्लोक-अर्ध ॥ ९ ॥ आठवे दिवशीं सावध इंद्रियें । अमृतें घालिये तुकोबाच्या ॥ १० ॥ तंधवां ती गाय देखिली सन्मुख । मिमालीसे देख वत्स कळे ॥ ११ ॥ म्हणे या वत्सातें पाजीलें अमृतु । तयासी तो मृत्यू कदां नोहे ॥ १२ ॥ अमर तें वत्स आहे मजपासीं । चित्त अमृतासी घेत गोडी ॥ १३ ॥ बहिणी म्हणे इतुकें वर्तलीयावरी । पुढेंही विस्तारीं सांगिजेल ॥ १४ ॥

२८ जयराम समर्थ ज्ञानाचा सागर । साक्ष तें अंतर त्याचें तया ॥ १ ॥ बोलाविलें तेणें हिरंभटाप्रती । माझी तया स्थिती पुसीयेली ॥ २ ॥ सांगितला तेणें वृत्तांत सर्वही । वर्तला जो कांहीं गृहीं त्याचें ॥ ३ ॥ स्वप्नागत गुरु तुकोबाचें रूपें । स्वप्नींचिये कृपें बोध केला ॥ ४ ॥ सावध होउनी ते मुली बैसली । गायीस मारविली कुर्वाळूनी ॥ ५ ॥ दुग्ध दोहोनिया घेतलें तिथेनें । पाणी आणि तृणें भक्षीतसे ॥ ६ ॥ परी तें मुलीचें रूप पालटलें । पूर्ण ते दाटलें हृदय तिचें ॥ ७ ॥ तुकोबाचा छंद अंतरीं लागला । मायबापें तिला सांगताती ॥ ८ ॥ भ्रतार हा तिचा वेडावला राहे । उगाची तो पाहे तियेकडे ॥९॥ छांदिष्ट होउनी बैसली घरांत । तुकोबासी चित्त लावुनीया ॥१०॥ ऐसा हा वृत्तांत हिरंभट सांगे । जयराम निजांगें संतोषला ॥ ११ ॥ बहिणी म्हणे ऐसा निर्धार ऐकोनी । जयराम स्वामीनीं कृपा केली ॥ १२ ॥

२९ कृपा उपजली जयराम स्वामीसी । आले पाहायासी भाव माझा ॥ १ ॥ देखोनी तयासी आनंद वाटला । कंठ कोंदटला आनंदानें ॥ २ ॥ मनेंचि आरती केला नमस्कार । पूजिला साचार मनामाजीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे त्याचे मनांतील हेत । ओळखे निश्चित पांडुरंगा ॥ ४ ॥

३० मजवरी दृष्टी कृपेची ओतिली । प्रेमाची गुंतली माय जैसी ॥ १ ॥ अंतरींची पूजा घेऊनी जयराम । गेला तो सप्रेम स्वस्थाना ॥ २ ॥ उगाची बैसला आसनीं नेमस्त । करोनिया स्वस्थ चित्तवृत्ति ॥३॥ तंव कांहीं एक अपूर्व वर्तलें । तुकारामें दिलें दर्शनासी ॥ ४ ॥ केला नमस्कार भेटुनी आनंदें । अत्यंत आल्हादें स्वामी सखा ॥ ५ ॥ मजही दर्शन दिधलें अळुमाळ । घातला कवळ मुखामाजीं ॥ ६ ॥ मज म्हणे आलों जयराम-भेटीसी । तुजही मानसीं ओळखीलें ॥७॥ तुम्ही आतां येथें नका राहों कदा । आत्मज्ञान-बोधा न संडीं वो ॥ ८ ॥ बहिणी म्हणे दर्शन दुसरें । मनाच्या व्यापारें तुकोबाचें ॥ ९ ॥

३१ नवल जनांसीं वाटलें म्हणोनी । येती ते धांवोनी पहावया ॥ १ ॥ भ्रतार हा माझा देखोनी तयासी । माझीया देहासी पीडा करी ॥ २ ॥ न देखवे तया द्वेषी जनाप्रती । क्षणक्षणा चित्तीं द्वेष वाढे ॥ ३ ॥ म्हणे ही बाईल मरे तरी बरें। इस कां पामरें भेटताती ॥ ४ ॥ काय आतां घुमारें येईल अंगासी । देव इचें पोषी पोट कैसें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसी भ्रतारासी चिंता । जाणोनी अनंता कळों आलें ॥ ६ ॥

३२ भ्रतार म्हणतसे आम्ही कीं ब्राह्मण । वेदाचें पठण सदा करूं ॥ १ ॥ कैचा शूद्र तुका स्वप्नींचे दर्शनीं । बिघडली पत्नी काय करूं ॥ २ ॥ कैचा जयराम कैचा पांडुरंग । माझा झाला भंग आश्रमाचा ॥ ३ ॥ आम्ही काय जाणो नाम हरिकथा । भक्ति हे तत्त्वतां नसे स्वप्नीं ॥ ४ ॥ कैचे संत साधू कैची भाव भक्ती । भिक्षुकाचें पंक्तीं वसा सदा ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसें चित्तांत भ्रतारें । चिंतोनी निर्धारें विचारिलें ॥ ६ ॥

३३ विचारिलें मनीं भ्रतारें आपण । आतां हें त्यागोन वना जावें ॥ १ ॥ इसी नमस्कार कारितील जन । आम्ही इसी तृण वाटों परी ॥ २ ॥ स्त्रियेशीं बोलती अनुवाद कथेचा । आम्हीं इशी नीचापरी वाटों ॥ ३ ॥ पुसतची यती इशी पहा जन । आम्हीं कीं ब्राह्मण मूर्ख जालों ॥ ४ ॥ इचें नांव घेती गोसाविण ऐसें । आम्हां कोण पुसे इजपुढें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसें भ्रतार मानसीं । चिंतुनी चित्तासी बोध करी ॥ ६ ॥

३४ म्हणे आतां मना स्त्रियेची हे दशा । आतां तूं सहसा राहों नको ॥१॥ चाल वेगीं जाऊं तीर्थासी वैराग्य । आमचें हें भाग्य वोढवलें ॥ २ ॥ सासु-सासऱ्यांशीं केला नमस्कार । आहे स्त्री गरोदर मास तीन ॥ ३ ॥ आम्ही जातों तीर्थयात्रा करावया । देवलसी स्त्रिया यत्न कीजे ॥ ४ ॥ न पाहे मी मुख सर्वथा इयेचें । हीनत्व आमुचें कोण फेडी ॥ ५ ॥ भंडीमा सोसून कोण राहे येथें । ऐसीया स्त्रियेतें कोण पाळी ॥ ६ ॥ बहिणी म्हणे ऐसें बोलिला भ्रतार । मज पडे विचार मनामाजीं ॥ ७ ॥

३५ काय म्यां अदृष्टा करावें आपण । आलें जें टाकून सोसी जेथें ॥ १ ॥ नाहीं येत वारें अंगासी माझीया । घुमारीन काया नव्हे माझी ॥ २ ॥ स्वधर्म आपुला रक्षुनिया मनें । शास्त्राच्या श्रवणें देव साधू ॥ ३ ॥ भ्रताराची सेवा तोचि आम्हां देव । भ्रतार स्वयमेव परब्रह्म ॥ ४ ॥ तीर्थ भ्रताराचें सर्व-तीर्थ जाणा । तया तीर्थाविणा निरर्थक ॥ ५ ॥ भ्रतारवचनासीं उल्लंघीन जरी । पापें माझ्या शिरीं पृथ्वीचीं ॥ ६ ॥ धर्म अर्थ काम मोक्षासी अधिकारी । भ्रतार साचारी वेद बोले ॥ ७ ॥ हा माझा निश्चय मनांतील हेत । भ्रतारेसी चित्त लाविंयेलें ॥ ८॥ भ्रतार-

सेवेनें सांग हा परमार्थ । भ्रतारेंच स्वार्थ सर्व आहे ॥ ९ ॥ भ्रतारावांचोनी अन्य देव जरी । येईल अंतरीं ब्रह्महत्या ॥ १० ॥ सद्गुरु भ्रतार साधन भ्रतार । सत्य हा निर्धार अंतरींचा ॥ ११ ॥ बहिणी म्हणे देवा भ्रताराचें मनीं । तुवां प्रवेशोनी स्थिर केलें ॥ १२ ॥

३६ भ्रतार गेलीया वैराग्य घेऊनी । पांडुरंगा जनीं जिणें काय ॥ १ ॥ प्राणाचीण देह काय पावे शोभा । रात्रीविण प्रभा चंद्राचिये ॥ २ ॥ भ्रतार तो जीव देह मी आपण । भ्रतार कल्याण सर्व माझें ॥ ३ ॥ भ्रतार जीवन मी मीन तयांत । कैसेनी वांचत जीव माझा ॥ ४ ॥ भ्रतार तो रवी मी प्रभा तयासी । वियोग हा त्यासी केवीं घडे ॥ ५ ॥ बहिणी म्हणे माझा जीवाचा निर्धार । बोलें पै विचार हरी जाणे ॥ ६ ॥

३७ भ्रतारें वैराग्य घेतलीया वरी । जीव हा निर्धारीं देईन मी ॥ १ ॥ वत्सासाठीं देह अचेतन पडे । हें तंव रोकडें परब्रह्म ॥ २ ॥ भ्रताराचें तीर्थ न सांपडे जरी । अन्न खाय तरी मांस आम्हां ॥ ३ ॥ भ्रताराचें धोंव न सांपडे तरी । पापें माझ्या शिरीं त्रैलोक्याचीं ॥ ४ ॥ चित्त हें भ्रताराविण जरी जाये । तरी वास होय नरकीं आम्हां ॥ ५ ॥ भ्रतारदर्शनाविण जाय दीस । तरी तेचि रास पातकांची ॥६॥ बहिणी म्हणे मज आज्ञाची प्रमाण । ब्रह्म सनातन स्वामी माझा॥७॥

३८ पाषाण विठ्ठल स्वप्नांतील तुका । प्रत्यक्ष कां सुखा अंतरावें ॥ १ ॥ घेईन उदंड सेवासुख देहीं । साक्ष या विदेही आहे मज ॥ २ ॥ भ्रताराची सेवा पतिव्रता करी । तरी ती उद्धरी उभय कुळें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे माझ्या जीवाची विश्रांती । भ्रतारें समाप्ती जन्ममृत्यू ॥ ४ ॥

३९ भ्रतारें निश्चय केला मनामाजीं । जावें उद्यां आजि टाकोनीया ॥ १ ॥ तंव त्यासी व्यथा जाली शरिरास । झाला सात दिवस ज्वाळ देहीं ॥ २ ॥ ओळखीचे जन नायके उत्तर । आपण अहोरात्र तयापासीं ॥ ३ ॥ दिधल्या औषध नेदी तया मान । जीव व्यथा फार पूर्ण सोसी ॥ ४ ॥ एक मासवरी अन्न विवर्जीत । व्यथा हे अद्भुत सोसीतसे ॥ ५ ॥ नाना देव कुळें देवतांची भाष । ठेविल्या विशेष बहु कांहीं ॥ ६ ॥ परी तया व्यथेलागीं न ये गुण । म्हणे तो मरण आलें मज ॥ ७ ॥ काय पांडुरंगा तुकोबासी निंदी । व्यथा तेचि संधीं आली मज ॥ ८ ॥ जरी तुकाराम निंदिला त्यागुणें । असेल दुखणें व्यथा मज ॥ ९ ॥ तरी चमत्कार दाखवावा सध्या । जीवीं विश्ववंद्या तुकारामा ॥ १० ॥ बहिणी म्हणे झाला अनुताप भ्रतारा । पांडुरंग पुरा अंतरसाक्ष ॥ ११ ॥

४० वृद्धसा ब्राह्मण येऊनी बोलतु । म्हणे कां रे मृत्यू इच्छितोसी ॥ १ ॥ वैराग्य कां तुज आलें असें मना । स्त्रीचा त्याग कोणा गुणें केला ॥ २ ॥ आधीं

इचा विचारीं अपराध अंतरीं । मग कोपा करीं प्रवर्तावें ॥ ३ ॥ वांचण्याची इच्छा असलिया मानसीं । तरी तूं इयेसी अंगिकारीं ॥ ४ ॥ स्वधर्माविरहित वर्तेल ही जरी । तरी तिचा करीं त्याग वेळ्या ॥ ५ ॥ ही आहे विरक्त निश्चित हरिभक्त । तुवां पाहीं सत्य तैसें व्हावें ॥ ६ ॥ होईल कल्याण बोलत ब्राह्मण । भ्रतारें चरण वंदियेले ॥ ७ ॥ सांगितलें सर्व कारण आपण । देई जीवदान आजी मज ॥ ८ ॥ ये व्यथेपासोनी वांचवीं स्वामीया । जिव तुझ्या पायां वाहीन मी ॥ ९ ॥ स्त्रियेसी सर्वथा न बोले आपण । हरीसी शरण जीवेंभावें ॥ १० ॥ केला नमस्कार प्रत्यक्ष उठोन । होईल कल्याण म्हणे द्विज ॥ ११ ॥ ऐकतें मीही दोघांचें बोलणें । घालीं लोटांगणें भ्रतारासी ॥ १२ ॥ झाला तो अदृश्य ब्राह्मण तात्काळ । आरोग्य कुशल देह झाला ॥ १३ ॥ बहिणी म्हणे देव कृपा करी तरी । सर्व सिद्धी द्वारीं तिष्ठतील ॥ १४ ॥

४१ आरोग्य तात्काळ व्यथेचा हारास । झाला दिसंदीस भ्रताराचा ॥ १ ॥ मग करी कृपा बोले समाधानें । द्वेषाचें हें ठाणें दूर केलें ॥ २ ॥ म्हणे आतां सर्व जावें येथुनीया । आपुलीया ठाया स्वस्थानां ॥ ३ ॥ देवें आपणासीं ब्राह्मणाच्या वेषें । सांगितला शेष प्राक्तनाचा ॥ ४ ॥ तेचि आतां करूं हरिची वो भक्ती । मिरासींची खंती टाकियेली ॥ ५ ॥ माझी माय-बापें तयांसी सांगत । तुम्ही जा निवांत देवगांवा ॥ ६ ॥ आपण अरण्यांत दोघे करूं वास । देवाच्या बोलास धरोनीया ॥ ७ ॥ होवो आतां कल्याण किंवा अकल्याण । आम्ही तो संपूर्ण भक्ती करूं ॥ ८ ॥ तुकोबाचे गांवां जाऊनीया राहों । मनींचा दृढावो धरोनीया ॥ ९ ॥ ऐसी पालटली भ्रताराची बुद्धी । स्वामी कृपानिधी अंतरसाक्ष ॥ १० ॥ काय एक देव करील तें नव्हे । प्रत्यक्ष अनुभवें सर्वजनां ॥ ११ ॥ बहिणी म्हणे आवघीं घेउनी चालीलों । तुकोबाच्या आलों दर्शनासी ॥ १२ ॥

४२ वत्साचीये माय कपिला सांगातें । धांवे एकचित्तें आम्हांपुढें ॥ १ ॥ माय बाप बंधू भ्रतारासहीत । इंद्रायणी जेथ तेथें आलों ॥ २ ॥ करोनीया स्नान पांडुरंग-भेटी । आनंदली सृष्टी अंतरंगें ॥ ३ ॥ तुकोबा आरती करित होते तेथ । नमस्कारें स्वस्थ चित्त केलें ॥ ४ ॥ स्वप्नीं जो देखीला तेंच ध्यान तेथें । देखीलें नेमस्त पूर्ण दृष्टी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तेथ भ्रतारें साष्टांग । केला अंतरंग भावयुक्त ॥ ६ ॥

४३ माध्यान्ह जालीया पाहिजे तें अन्न । भ्रतार जाऊन ग्राम हिंडे ॥ १ ॥ तंव तेथ एक ब्राह्मण कोंडाजी । म्हणे तुम्ही याजीं भोजनासी ॥ २ ॥ भ्रतार बोलीला आहों पांचजण । इतुकीया अन्न कोण घाली ॥ ३ ॥ येरू म्हणे तुम्ही अवघींच भोजना । यावें नारायणा काय चिंता ॥ ४ ॥ जावें स्थळ तुम्ही पाहोनी राहिजे ।

माझ्यान्हीं येईजे गृहाप्रती ॥ ५ ॥ बहिणी म्हणे आला भ्रतार अम्हासी । मेळविलें त्यासी सांगितलें ॥ ६ ॥

४४ मंबाजी गोसावी त्या स्थळीं भांडतां । गृह प्रवेशतां देखीयेले ॥ १ ॥ जाऊनी तयासी मागीतलें स्थळ । तो अति चंचळ क्रोध तया ॥ २ ॥ मारावया उठे घातलें बाहेरी । आनंदें वो वरी प्रार्थीयेले ॥ ३ ॥ तेथें राहोनीया भोजनासी गेलों । बहुत पावलों समाधान ॥४॥ वृत्तांत पुसीला कोठोनी आलांत । चालतसा पंथ कवण कार्या ॥ ५ ॥ कांहींवाही तया सांगितलें पूर्व । म्हणे रहा सर्व पर्वणीसी ॥ ६ ॥ सोमवारीं आहे अमावास्या पुढें । रहा भक्तिकोडें सुख घ्यावें ॥ ७ ॥ नित्य हरिकथा होतसे देऊळीं । तुकोबा माऊली वैष्णवाची ॥ ८ ॥ रहा येथें तुम्हां भक्षावया धान्य । देऊं हेंही पुण्य आम्हां घडे ॥ ९ ॥ बहिणी म्हणे मग राहीलों देहूस । धरुनी हव्यास तुकोबाचा ॥ १० ॥

४५ देऊळांत कथा सर्व काळ होत । श्रवण करीत दिनरात्रीं ॥ १ ॥ तुकोबाची कथा वेदांतील अर्थ । पावे माझें चित्त समाधान ॥ २ ॥ तुकोबाचें ध्यान पूर्वीं कोल्हापुरीं । जें स्वप्नामाझारीं देखीयेलें ॥ ३ ॥ तेंचि ध्यान डोळां प्रत्यक्ष देखोनी । आनंद लोचनीं हेलावत ॥ ४ ॥ रात्रंदिन निद्रा न ये तिळभरी । तुकोबा अंतरीं प्रवेशला ॥ ५ ॥ बहिणी म्हणे येती सुखाचे डोलावे । जाणती अनुभवें जाणते जे ॥ ६ ॥

४६ मंबाजी गोसावी भ्रतारासी म्हणे । तुम्ही शिष्य होणें क्रियायुक्त ॥ १ ॥ माझा हेत आहे तुम्हीही हरिभक्त । दिसतां विरक्त उभय वर्गें ॥ २ ॥ ऐकोनी ते गोष्टी दोनचार वेळां । मग त्या प्रांजळा सांगितलें ॥ ३ ॥ आम्ही अनुग्रही आहों जी पूर्वींच । न वाटे त्या सत्य गोष्ट कांहीं ॥ ४ ॥ भ्रतारें त्याप्रती सांगीतलें सर्व । कोल्हापुरीं पूर्व वर्तलें जें ॥ ५ ॥ ऐकोनीया द्वेष संचरला मनीं । म्हणे काय स्वप्नीं समाधान ॥ ६ ॥ नाहीं गुरुसेवा घडली जोंवरी । हस्तक हा शिरीं सद्गुरूचा ॥ ७ ॥ तोंवरी तो गुरू कासयाचा खरा । शुद्राचीया अंतरा ज्ञान कैचें ॥ ८ ॥ स्वप्नींचा अनुग्रह गुरू केला शुद्र । तोही बळीभद्र ज्ञानहीन ॥ ९ ॥ तुम्हांसी वाळीस ब्राह्मणाचे पंक्ती । तुम्ही गुरुभक्ती नका सांगू ॥ १० ॥ बहिणी म्हणे ऐसें मंबाजी बोलीला । द्वेषही मांडीला तेच क्षणीं ॥ ११ ॥

४७ एके दिवशीं वाटे देखीलें आपण । मंबाजीसी पूर्ण हेतयुक्त ॥ १ ॥ नमस्कार करावया गेले जवें । येरू हा न शिवे दुरी पळे ॥ २ ॥ म्हणे तुम्ही काय कोण याती नेणें । मी तो शुद्र म्हणे तुम्हांलागीं ॥ ३ ॥ सोनार कीं तुम्ही गोळक यातीचीं । तुम्हां ब्राह्मणाची क्रिया नाहीं ॥ ४ ॥ तुम्ही कोठें जाल भोजनासी

जरी । दिवाणांत तरी घालीन मी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसें ऐकोनी आपण । भ्रतारासी पूर्ण सांगीतलें ॥ ६ ॥

४८ महादाजी कुळकर्णी कोंडाजीपंतासी । सांगीतली कैसी गोष्टी तया ॥ १ ॥ मग तींहीं नेले आपुल्या गृहासी । म्हणे कीं तयासी काम काय ? ॥ २ ॥ परंतु तो द्वेष चालवी अत्यंत । मारूं पाहे घात चिंतोनिया ॥ ३ ॥ म्हणे हे ब्राह्मण तरी गुरु शुद्र । हींचे तरी छिद्र सांपडलें ॥ ४ ॥ द्वेष हा वाढला अत्यंत अद्भुत । सर्वही लोकांत कळों आलें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे देव छळी नानापरी । निश्चय निर्धारीं पहातसे ॥ ६ ॥

४९ आपाजी गोसावी पुण्यांत रहात । जो अति विख्यात राजयोगी ॥ १ ॥ तयाप्रती पत्र मंबाजी पाठवी । तुकोबा गोसावी शुद्र वाणी ॥ २ ॥ कथा करितसे देऊळीं सर्वदा । द्विज त्याच्या पदा लागताती ॥ ३ ॥ रामेश्वर भट अति योगी थोर । तेही नमस्कार त्यासी करिती ॥ ४ ॥ आम्हांसी अन्याय हाची थोर वाटे । होत असे खोटें वेदशास्त्र ॥ ४ ॥ तुम्ही थोर अहां दंड करावया । बांधोनीया तया न्यावे तेथें ॥ ६ ॥ आणीक ही एक स्त्री-पुरुष आहेती । तेही म्हणवीती शिष्य त्याचे ॥ ७ ॥ म्हणविती ब्राह्मण आहेती सोनार । कुळकर्णी ही फार मान्य केलें ॥ ८ ॥ स्वधर्माचा लोप होतसे देखोन । धाडिलें लिहोन म्हणोनीया ॥ ९ ॥ याचा कीं अपमान न करितां जाण । राज्यही बुडोन जाय तरी ॥ १० ॥ डोंबाळें मांडून स्वधर्म लोपला । पाहिजे रक्षिला स्वामीराजें ॥११॥ बहिणी म्हणे ऐसें पत्र पाठविलें । चोरोनी लिहीलें घरामाजीं ॥ १२ ॥

५० आपाजी गोसावी वाचोनीया पत्र । क्रोधें फार नत्र भोवंडीत ॥ १ ॥ शुद्र होवोनीया नमस्कार घेत । पाप हें अद्भुत होत असे ॥ २ ॥ सोनाराच्या जाती म्हणविती ब्राह्मण । तयाचें दर्शन घेऊं नये ॥३॥ शुद्राचा अनुग्रह घेताती ब्राह्मण । भ्रष्टाकार पूर्ण होत असे ॥ ४ ॥ त्याची शिक्षा द्यावी दोष नाहीं यासी । ऐसा निश्चयेसीं नेम केला ॥ ५ ॥ बहिणी म्हणे याचें प्रत्युत्तर लिहीलें । होय यथाकालें कार्यसिद्धी ॥ ६ ॥

५१ मंबाजी गोसावी द्वेष करी जीवें । म्हणे तुम्हां जावें येथोनिया ॥ १ ॥ तेणें फार चिंता वाटतसे मनीं । विघ्न कां भजनीं ओढवलें ॥ २ ॥ कोणाचें न घेतां न बोलतांही कांहीं । नसोनि अन्यायी द्वेष कांहीं ॥ ३ ॥ देवासी आठवी चिंतोनी मानसीं । साक्ष तूंचि यासी पांडुरंगा ॥ ४ ॥ माझें अंतरींचें जाणतोसी तूंचि । चित्तीं या द्वेषाची थार नाहीं ॥ ५ ॥ विघ्न हें आणिलें त्यासी तूं निवारीं । तुकोबाचें शिरीं आहेस तूं ॥ ६ ॥ भक्ति करी त्यासी पिडीसी अंतरीं । निष्ठा नानापरी

लक्ष्मीसी तूं ॥ ७ ॥ बहिणी म्हणे देवा संचितासारिखें । नाना सुखदुःखें प्राप्त होती ॥ ८ ॥

५२ कोल्हापुरीं गाय होती जे सांगातें । कांहीं ते दुग्धातें देत होती ॥ १ ॥ गाय ते बांधोनी घातली घरांत । सोटेही मारीत तयेलागीं ॥ २ ॥ पाहों गाय तंव न दिसे पहातां । तुकोबासी व्यथा तेचि झाली ॥ ३ ॥ पाहातोसी काय होत असे कष्टी । तीन रात्रीं खुंटी बांधलीसे ॥ ४ ॥ नाहीं तृण पाणी मारिलेंसे फार । धांवण्यासी थार नाहीं दिसे ॥ ५ ॥ तुकोबा जागृत झाले तंव पाठ । सुजेली ती नीट होयेची ना ॥ ६ ॥ सोटे अंगावरी दिसती तुकोबा । आठवी विठोबा नानापरी ॥ ७ ॥ देखोनि तयासी कष्ट होती जनां । सांगितलें स्वप्नांतील सर्व ॥ ८ ॥ तुकोबा अंतरीं आठवुनी देवा । धांव रे माधवा सोड म्हणे ॥ ९ ॥ कोणें गाय कोठें बांधिली कळेना । धांव नारायणा गाय रक्षीं ॥ १० ॥ तंव अकस्मात तयाचिये गृहीं । अग्नि लागे तोहि महाथोर ॥ ११ ॥ धांवोनिया लोक विझविती अग्नि । गाय ते निकुर्शी बैसलीसे ॥ १२ ॥ जे गाय पहाती आजी तीन दिवस । चांडाळें तियेस बांधिलेंसें ॥ १३ ॥ गाय सोडोनिया आणिली बाहेरी । तंव पाठीवरी मारिलेंसें ॥ १४ ॥ भ्रतार आपुला बोलावोनी पाहे । गाय सांभाळीं हें ब्राह्मणा तूं ॥ १५ ॥ तुकोबा धांवोनी करी प्रदक्षिणा । नमस्कारी गुणा धन्य तुझे ॥ १६ ॥ दाखविलें स्वप्न मज माय तुवां । न कळेचि धावा केला ॥ १७ ॥ तुझा माझा एक आत्मा सर्वांगत । ते साक्ष निश्चित आली मज ॥ १८ ॥ ऐसा तुकोबानें केला फार धावा । तंव माझ्या जीवा दुःख झालें ॥ १९ ॥ मजही तैसेची क्लेश झाले फार । साक्ष हें अंतर विठ्ठलाचें ॥ २० ॥ तुकोबाचे पाठी पहाताती जन । गायही देखोन थोर कष्टी ॥ २१ ॥ बहिणी म्हणे ऐसें वर्तलें हें जाण । गायीचें निर्वाण हरी जाणे ॥ २२ ॥

५३ रामेश्वरभट्टें ऐकिला वृत्तांत । धांवोनि त्वरित तेथ आला ॥ १ ॥ तुकोबाचें तींहीं घेतलें दर्शन । गाय तेंहि पूर्ण पाहियेली ॥ २ ॥ दोहींचें पाठीचा दिसे एक भाव । रुदनीं ते सर्व प्रवर्तले ॥ ३ ॥ तुकोबाचा पार वर्णिलसा कोण । कलियुगीं जाण प्रल्हाद हा ॥ ४ ॥ सर्वांतर साक्षी करोनिया स्तुती । स्वसुखें रमती आपुलिया ॥ ५ ॥ बहिणी म्हणे लोक बोलती सकळ । तुकोबा केवळ पांडुरंग ॥ ६ ॥

५४ महादाजी कुळकर्णी तयाचीये घरीं । असोनि निर्धारीं काळ क्रमूं ॥ १ ॥ बेसाती हेलावे दुःखाचे अनेक । लक्ष्मीनायक जाणतसे ॥ २ ॥ घालोनी संकटीं देवावरी भार । असों निर्विकार एकनिष्ठ ॥ ३ ॥ तंव तये काळीं झाली ये प्रसूत । कन्या झाली तेथ आपणासी ॥ ४ ॥ काशीबाई तिचें ठेवियेलें नांव । दाखविला भाव पूर्ण कांहीं ॥ बहिणी म्हणे वत्स मेलें कोल्हापुरीं । तेंचि आलें उदरीं ऐसें वाटे ॥ ५ ॥

---

१ कोल्हापुरास जी गाय बरोबर होती ती. २ ही.

५५ देवगांव माझें माहेर साजणी । शाखा वाजेसनी मौनस गोत्र ॥ १ ॥ तयाचीये कुळीं घेतलें शरीर । स्त्रीरूपें व्यवहार दावावया ॥ २ ॥ जयाचीये कुळीं गुरुपरंपरा । नाहींच सादरा श्रवण कांहीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जन्म अंतरींचा नेम । हें तो जाणे वर्म नारायण ॥ ४ ॥

५६ लोकांचीया मुली खेळती बोळकीं । वाटे घ्यावें मुखीं मज नाम ॥ १ ॥ आणिक नावडे खेळ ते बालीश । नेणें तो विश्वास प्रगटला ॥ २ ॥ नावडे फुगडी टिपरीयाचा खेळ । असावें निश्चळ वाटे मना ॥ ३ ॥ बहिणी म्हणे पूर्वीं होतें जें पदरीं । तेंची या संसारीं प्रगटलें ॥ ४ ॥

५७ मातापितयानें लग्न संपादिलें । कन्यादान केलें गौतमगोत्रीं ॥ १ ॥ झाला चार दीस लग्नाचा सोहळा । न कळे देवाचा हेत आतु ॥ २ ॥ मायबापें माझीं दरिद्री पिडीलीं । उपद्व्यापें जालीं कासावीस ॥ ३ ॥ देशत्याग झाला मिरासीच्या भयें । तव गंगा जाय दोही थड्या ॥ ४ ॥ सांगातें घेतलें माझिया स्वामीस । आले परदेशास महादेवीं ॥ ५ ॥ मायबाप बंधु भ्रतारासहित । बहिणी म्हणे तेथ स्थिर जाले ॥ ६ ॥

५८ चालले पंढरीं महादेवाहूनी । संताचे दरुषणीं सुख वाटे ॥ १ ॥ संतसमागम जिवाहुनी गोड । परि भय दृढ भ्रताराचें[1] ॥ २ ॥ जमदग्नीचा क्रोध ऐकीयला कानीं । भ्रतार तो जनीं तेची रूप ॥ ३ ॥ बहिणी म्हणे झालें वरुषें एकादश । क्षणही जिवास सुख नाहीं ॥ ४ ॥

५९ वैदिक व्यवहार स्वामी उदरार्थ । करितसे तेथ देव कैंचा ॥ १ ॥ वेद पाठ कांहीं नावडेची भक्ती । पराधीन युक्ती न चले माझी ॥ २ ॥ वय तो लहान लौकीक तो वेडा । वेदाचिया भिडा उभी राहे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे माझें चित्त कासावीस । संसाराचा त्रास बहु झाला ॥ ४ ॥

६० स्त्रियेचें शरीर पराधीन देह । न चाले उपाव विरक्तीचा ॥ १ ॥ पडिलें अंतर विवेकाचें बळें । काय निर्मियेलें राघोबानें ॥ २ ॥ तापलें शरीर त्रिविध तापानें । वाटतसे मनें प्राण द्यावा ॥ ३ ॥ न घडे हरीची भक्ति अणुमात्र । शत्रु दृष्टमित्र संसाराचे ॥ ४ ॥ शरीराचे भोग वाटताती वैरी । माझी कोण करी चिंता आतां ॥ ५ ॥ बहिणी म्हणे जैसा वोकीयला वोक । तैसें हे मायीक वाटे मना ॥५॥

६१ हरण सांपडे जैसें वाघुरेंत । अंध अरण्यांत पडे जैसा ॥ १ ॥ तैसें मज झालें पुसूं कोणा हित । होय माझें चित्त कासावीस ॥ २ ॥ जलावीण मत्स्य

१ पति; नवरा.

गाईविण वत्स । मृगीवीण पाडस जयापरी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देवा ऐसीया संकटीं । करीं कृपादृष्टी दीनावरी ॥ ४ ॥

६२ विरक्तीचें मूळ प्रपंचाचा त्याग । पहातांची एक ग्रहशैल ॥ १ ॥ संकट मांडिलें धांव तूं झडकरीं । विवेक-उत्तरीं बोधीं चित्त ॥ २ ॥ भ्रतार त्यागितां वेदासी विरुद्ध । परमार्थ तो शुद्ध सांपडेना ॥ ३ ॥ द्वाराशीं भुजंग प्रहजळे अंगीं । जीव त्या प्रसंगीं कैवीं राहे ॥ ४ ॥ वेदाचें वचन त्यागूं नये धर्म । माझें तंव प्रेम हरिभक्ती ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसीं संकटें दाटती । क्लेश ते वाढती काय सांगू ॥ ६ ॥

६३ वेद हांका देती पुराणे गर्जती । स्त्रियेच्या संगतीं हित नोहे ॥ १ ॥ मी तों सहज स्त्रीयेचाची देह । परमार्थाची सोय आतां कैंची ॥ २ ॥ मूर्खत्व ममता मोहन मायीक । संगची घातक स्त्रियेचा तो ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसा स्त्रीदेह घातकी । परमार्थ या लोकीं केवीं साधे ॥ ४ ॥

६४ काय पाप केलें पूर्वील ये जन्मीं । आतां पुरुषोत्तमीं अंतरलें ॥ १ ॥ लाधलें नरदेह स्त्रियेचेनी रूपें । असंख्यात पापें फळा आलीं ॥ २ ॥ आधिकार नाहीं वेदार्थ श्रवणीं । गायत्री ब्राह्मणीं गुप्त केली ॥ ३ ॥ करूं नये मुखें प्रणवाचा उच्चार । बीजाचा संचार ऐकों नये ॥ ४ ॥ बोलों नये बोल पराचिया संगें । भ्रतार तो अंगें जमदग्नी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे होतो जीव कासावीस । नये देवाजीस करुणा माझी ॥ ६ ॥

६५ नामाचा विटाळ आमुचीये घरीं । गीताशास्त्र वैरी कुळीं आम्हां ॥ १ ॥ देव तीर्थ यात्रा नावडती हरी । ऐसीयांचे घरीं संग दिला ॥ २ ॥ संतसमागम राघवाची भक्ति । नावडती श्रुती शास्त्र कथा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे माझ्या पापाचा संग्रहो । तुटोनीया राहो चित्त स्थिर ॥ ४ ॥

६६ अनुतापें तापलें बहुत मानसीं । नये देवाजीसी करुणा कैसी ॥ १ ॥ वाटे देह आतां घालूं अग्नि-आंत । किंवा हा करवत घालूं माथा ॥ २ ॥ वाटे जीव द्यावा नदीचे प्रवाहीं । किंवा दिशा दाही उलंघाव्या ॥ ३ ॥ वाटे अरण्यांत घेऊनी धरणें । बैसावें; पारणें करूं नये ॥ ४ ॥ बहिणी म्हणे माझा जीव हा तळमळी । कारे वनमाळी मोकलीसी ॥ ५ ॥

६७ गांजविसी देह भ्रताराचे हातें । माझीया तों चित्तें नेम केला ॥ १ ॥ न सोडी भजन प्राणही गेलीया । आतां देवराया दीनबंधु ॥ २ ॥ पहातोसी काय आतां माझा अंत । होतसे देहान्त पती-हातें ॥ ३ ॥ करूं काय मज मांडलें सांकडें । नाहीं देहाकडे हेत माझा ॥ ४ ॥ पडो देह परी राहतसे हेत । पहावा अनंत

ज्ञानदृष्टी ॥ ५ ॥ करावी हे भक्ति स्वधर्म-आचारें । तुज ज्ञानद्वारें ओळखावें ॥ ६ ॥ राहिल हें काय शरीर पिडेनें । का रे हें वचन नायकसी ॥ ७ ॥ हेत राहे तया जन्म घडे पुनः । वेदाच्या वचना आयकीलें ॥ ८ ॥ आतां या संकटीं तुझें शिरीं हत्या । राखावी आपत्या आपुलीया ॥ ९ ॥ बहिणी म्हणे हरी बहिरा आंधळा । का रे विश्वपाळा झालासी तूं ॥ १० ॥

६८ सखा सहोदर तूंची एक हरी । दीनांचा कैवारी पांडुरंग ॥ १ ॥ तुझी भक्ती घडे पतिव्रताधर्म । ऐसें मेघश्याम विचारावें ॥ २ ॥ वेदासी विरुद्ध नव्हे तो परमार्थ । म्हणोनी हा अर्थ विचारावे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे दोन्ही घडतील हरी । हेत हा झडकरीं विचारावा ॥ ४ ॥

६९ मातापिता बंधु प्रपंचाचे सखे । होती महा दुःखें माझ्या संगें ॥ १ ॥ देवासी सांगता जाणसी अंतर । सांगावया थार नाहीं मज ॥ २ ॥ सांगती न कोणी स्वहितविचार । नाहीं तो शेजार सज्जनाचा ॥ ३ ॥ एकली एकट पडियलें वनीं । क्षुधा तृषा मनीं आठवेना ॥ ४ ॥ बोलावें न ऐसें वाटे कोणासवें । विचार केशवें करावा हा ॥ ५ ॥ बहिणी म्हणे नाम तुझें जाणें एक । कोणासी आणीक सांगूं हरी ॥ ६ ॥

७० सोसियले क्लेश जिवें बहू फार । जाली हे अपार दीन सख्या ॥ १ चित्तीं समाधान केलें असें एक । प्रारब्धें हें दुःख आलें भागा ॥ २ ॥ भोगणें न चुके ब्रह्मादिकां दुःख । इतर हे रंक कोण तेथें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे माझ्या देहाचें प्रारब्ध । ऐसिया गोविंद काय करी ॥ ४ ॥

७१ देहाचिया माथां सुखदुःख आलें । पाहिजे भोगिलें आवश्यक ॥ १ ॥ परिहार माझा होतसे पापाचा । लाभ हाचि साचा मानियला ॥ २ ॥ अंतरींचा हेत नामसंकीर्तनीं । शरीर पीडेनें पीडीयलें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे माझ्या संचितीं जें आहे । तंव पीडा काये कवणावरी ॥ ४ ॥

७२ प्रारब्धाची गती न संडी सर्वथा । व्यर्थ आतां चिंता कोण वाहे ॥ १ ॥ निश्चय निर्धारीं धरियला मनीं । आतां चक्रपाणी पांडुरंग ॥ २ ॥ शरीराचे क्लेश निवारी न कोण । अगा नारायणा कळों आलें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे आतां केशवा शरण । नको माझें मन पाहूं हरि ॥ ४ ॥

७३ तुटलें संचीत जालें शुद्ध चित्त । अंतरींचा हेत ओळखीला ॥ १ ॥ कृपा केली देवें इंद्रायणीतीरीं । देहुग्रामीं थोर भक्तिपंथ ॥ २ ॥ तेथें पांडुरंग देवाचें देऊळ । रहावया स्थळ प्राप्त झालें ॥ ३ ॥ तुकाराम संत संताचें कीर्तन । तिन्ही काळ तीन दृष्टीपुढें ॥ ४ ॥ नमस्कार तया न घडे पतिभयें । परि चित्त राहे सदा

पायीं ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसे मास झाले सात । अवघेंची संचीत सरों आलें ॥ ६ ॥

७४ आनंदवोवरी होती तये ठायीं । वाटे तेथें कांहीं बसावेंसें ॥ १ ॥ करूनिया ध्यान लावावे लोचन । करावें स्मरण विठोबाचें ॥ २ ॥ तुकारामा तंव देखतां देखत । आलें अकस्मात मृत्युरूप ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तेथ पुसोनी मातेसी । क्रमीयल्या निशी तीन तेथें ॥ ४ ॥

७५ नेणें जप तप नेणें अनुष्ठान । घालावें आसन कळेना तें ॥ १ ॥ ध्यानाचें लक्षण इंद्रियांचा रोध । नाहीं याचा बोध ऐकीयला ॥ २ ॥ पाषाणप्रतीमा विठोबाचें ध्यान । हृदयीं चिंतन राममुद्रा ॥ ३ ॥ तुकारामकथा करावी ती द्वारीं । ऐसा हा अंतरीं हेत होता ॥ ४ ॥

७६ टाळया चिपोळयांचा ध्वनी आयकतां । आनंद हा चित्तां समावेना ॥ ५ ॥ लावियले नेत्र निद्रेंत जागृती । तुकाराममूर्ति देखीयली ॥ ६ ॥ ठेवियला हस्त मस्तकीं बोलून । दिधलें वरदान कवित्वाचें ॥ ८ ॥ बहिणी म्हणे नेणें स्वप्न कीं जागृती । इंद्रियांच्या वृत्ती वोसरल्या ॥ ९ ॥

७७ आनंदें सगद्गद जाहलीं इंद्रियें । तुकाराम-पाय आठवले ॥ १ ॥ होऊनी सावध उघडीले नेत्र । आठवला मंत्र षडक्षरी ॥ २ ॥ ठसावला ध्यानीं । मनाचीये ठायीं । आणिक तें कांहीं आठवेना ॥ ३ ॥ बहिणी म्हणे हात घातला मस्तकीं । देह तो या लोकीं आढळेना ॥ ४ ॥

७८ तें सुख सांगतां वाचे पडे मौन । जाणता तें धन्य गुरुभक्त । झालासे आनंद इंद्रियाचे द्वारीं । बैसलें शेजारीं चैतन्याचे ॥ २ ॥ घट हा बुडाला जैसा डोहा-आंत । न फुटतां ओतप्रोत पाणी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तैसें झालें माझें मन । तुकाराम खुणा ओळखी त्या ॥ ४ ॥

७९ वाटे उठों नये जीव जाय तरी । सुख तें अंतरीं हेलावलें ॥ १ ॥ आनंदें निर्भर होऊनीया मन । करूं आलें इंद्रायणी ॥ २ ॥ घेतलें दर्शन पांडुरंगमूर्ती । तंव झाली स्फुर्ति वदावया ॥ ३ ॥ तुकोबासी तेथें करुनि नमस्कार । आलें मी सत्वर बिऱ्हाडासी ॥ ४ ॥ बहिणी म्हणे जैसा लोटला समुद्र । हृदयकाशीं इंद्र बोले वाचा ॥ ५ ॥



## ३ निर्याणपर.

८० रुक्मीणीची आम्हीं केली बोळवण । आम्हांसी प्रयाण त्याच मार्गें ॥ १ ॥ पाठवावें पत्र गोदेसी सत्वर । पडेल अंतर पुत्रपणा ॥ २ ॥ टाकोनी सकळ काम धाम धंदा । मरण मर्यादा वाट पाहे ॥ ३ ॥ म्हणोनीया पत्र लिहीत तांतडी । मरणाची गुढी उभी पुढें ॥ ४ ॥ तेराविया दीशीं ब्राह्मणभोजन । निघणें करोन अति त्वरें ॥ ५ ॥ पडेल आक्षेप वांटेसी खोळंबा । टाकोनी विठोबा[1] त्वरें येई ॥ ६ ॥ पांच दिवस पुढें देहान्तसमये । रोधोनिया पाहे वाट वायू ॥ ७ ॥ अश्विनाची शुद्ध जाणावी प्रतिपदा । मरणमर्यादा सांगितली ॥ ८ ॥ बहिणी म्हणे पुत्रपणाचें उत्तीर्ण । होसील म्हणोन त्वरा करीं ॥ ९ ॥

८१ * बैसलो समस्त शुक्लेश्वरापासीं । देखीलें पत्रासी अकस्मात ॥१॥ वाचिलें सत्वर निघालों तांतडी । केली घडामोडी मनामाजीं ॥ २ ॥ आणावी जाऊन गोदातीरां माय । ऐसा ये उपाय करूं आतां ॥ ३ ॥ पाहोनिया स्थल समाधी-कारण । आलों मी धांवून दर्शनासीं ॥ ४ ॥

८२ ऐकोनिया पत्र आलासी तांतडी । घालोनिया उडी पुत्रराया ॥ १ ॥ तेरावा दिवस केला रुक्मीणिचा । सद्गदीत वाचा कंठ दाटे ॥२॥ झालासी उत्तीर्ण तूंचि गा सर्वांचा । मनें काया वाचा सर्वभावें ॥ ३ ॥ देखोनीया तूज संतोष वाटला । प्रेमें दाटियला कंठ माझा ॥ ४ ॥ मृत्यूचा संकल्प अश्विन शुद्ध प्रतिपदा । ऐक बा प्रसिद्धा सांगितला ॥ ५ ॥ खेद तो अंतरीं न धरावा कदा । सांगतां मर्यादा नुलं-घावी ॥ ६ ॥ पुत्रपण तुझें आलें आजी फळा । माझें अंतकाळा पावलासी ॥ ७ ॥

८३ * अंतरींची साक्ष जाणीजें अंतरीं । माय तूं निर्धारी सद्गुरुही ॥१॥ देखी-येलें स्वप्न कचेश्वरीं माये । विमान हें पाहे तुज आलें ॥ २ ॥ शंख भेरी नाना वाजताती वाद्यें । गर्जती आनंदें नामघोषें ॥ ३ ॥ शंख चक्र गदा अंकित वैडूर्य । करिती उत्सव नाना परी ॥ ४ ॥ मृदंग वाजती टाळघोळ कथा । पताका अनंता गरुडटक्के ॥५॥ ब्राह्मणाचा थाट पुढें मागे लोक । माळा गळां देख तुळसीच्या ॥६॥ मिरवती विमान देखीयलें स्वप्नीं । आनंद हा मनीं थोर वाटे ॥ ७ ॥ उदबत्ती बुका गंधाक्षता होती । ब्राह्मणाच्या पंक्ती नाना परी ॥ ८ ॥ देखीयले जन्म उत्सव या मना । थोर झाला स्वप्नामाजीं पाहे ॥ ९ ॥ उठुनी प्रातःकाळीं आली मना साक्ष । स्वप्न हें प्रत्यक्ष नव्हे मिथ्या ॥ १० ॥ बैसलों समस्त कचेश्वरापासीं । देखीलें पत्रासी अकस्मात ॥ ११ ॥ वांचोनी सत्वर निघालों तांतडी । केली घडामोडी

---

१ विठोबा हे बाईच्या मुलाचें नांव असावें असें वाटतें. वंशावळ पहा. * हे अभंग. बहुतेक बहिणाबाईच्या मुलाचे असावेत असें वाटतें.

मनामाजीं ॥ ११ ॥ आणावी जाउनी गोदातीरा माय । ऐसाची उपाय करूं आतां ॥ १३ ॥ वंदुनी चरण उभा असें पुढें । मनांतील कोडें जाणसी तूं ॥ १४ ॥ शुक्लेश्वरापाशीं मागीतलें स्थळ । आज्ञा ते केवळ तुझी आतां ॥ १५ ॥

८४ ऐकीयलें तुझें वचन सादर । तुवां जो निर्धार केला असे ॥ १ ॥ मानलें माझीया स्थळ जाण चित्तां । परि ऐक पां आतां एक माझें ॥ २ ॥ नाहीं गा अवकाश तें स्थळीं जावया । मृत्यूच्या समया लागीं पाहें ॥ ३ ॥ प्रतिपदीं आम्हां टाकणें शरीर । अजि तों साचार त्रयोदशी ॥ ४ ॥ यालागीं निश्चय सांगतसें एक । तीर्थ आम्हां देख प्राणित असे ॥ ५ ॥ रावणेंही एथें केलें अनुष्टान । शंकर प्रसन्न येथं झाला ॥ ६ ॥ वाहियेलीं शिरें नवही पुजेसी । सहस्र अठ्यायसी ऋषी आले ॥ ७ ॥ ब्रह्मादिक देव यज्ञाच्या सन्निध । तीर्थ हें प्रसिद्ध शिवपूर ॥ ८ ॥ अवभृतस्नानीं वरद तयाचा । समूह तीर्थांचा असे येथें ॥ ९ ॥ प्रणिता तीर्थाऐसें तीर्थ भूमंडळीं । नाहीं चंद्रमौळी बोलीलासे ॥ १० ॥ काशी, गया तीर्थ सर्व याचि स्थळीं । मानोनी सकळीं स्नान कीजे ॥ ११ ॥ आमुचें मनींचा निर्धार हा खरा । माझीया अंतरा साक्ष आली ॥ १२ ॥ तुंवा हें वचन वंदुनी मस्तकीं । असावें स्वस्थ कीं होवोनीया ॥ १३ ॥ बहिणी म्हणे पुत्रा सांगितलें मनीं । धरोनी वचनीं सिद्ध राहे ॥ १४ ॥

८५ तीर्थ देव यात्रा वर्तता स्वधर्म । तुझे माझे जन्म गेले बारा ॥ १ ॥ तेरावा हा जन्म पुत्रपणें झाला । नाहीं तुझी तुला आठवण ॥ २ ॥ तेरा जन्म तुझा माझा असें संग । अद्वय अभंग एकनिष्ठ ॥ ३ ॥ पतिव्रता धर्म आमुचा सांगती । बोलतां ते गति ग्रंथ वाढे ॥ ४ ॥ ज्ञानेश्वरी पूर्ण पहावी हे झाली । आतां ते उरली दशा थोडी ॥ ५ ॥ संभवतां तुज मज जाली कृपा । वोळखी ते बापा सांगितली ॥ ६ ॥ बहिणी म्हणे आतां नाहीं जन्म घेणें । उठलें धरणें वासनेचें ॥ ७ ॥

८६ गोदा भागीरथी यमुना सरस्वती । तापी भोगावती सर्व तीर्थें ॥ १ ॥ येती प्रणितेसीं माझें अंतःकाळीं । अंतरीं निश्चळी राहे पुत्रा ॥ २ ॥ कृष्णा, तुंगभद्रा, भीमा, फल्गु रेवा । पुष्करें हीं सर्वां पृथ्वीवीची ॥ ३ ॥ देव तेही सर्व येती तिये वेळीं । मृत्यु अनुभवेल तूं त तेव्हां ॥ ४ ॥ ऋषीगण सर्व पांडुरंग उभा । जेव्हां मृत्युसभा येईल तें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तुज वाटेल असत्य । सांगेन तें तथ्य ऐक आतां ॥ ६ ॥

८७ आत्मज्ञान ऐसें कोण तीर्थ दुजें । ज्ञानिया उमजे पूर्व पुण्यें ॥ १ ॥ जेथें मानस केलें असें शुद्ध । तीर्थ हें प्रसिद्ध वेदशास्त्रीं ॥ २ ॥ तयाच्या मज्जनें जन्म

गेले बारा । शुद्ध तें अंतरां करावया ॥ ३ ॥ तेरावा हा जन्म लाधलें साधनें । तथा तीर्थीं स्नानें जन्म नाहीं ॥ ४ ॥ केले वो प्रयास साधनाचे कष्ट । होतें योगभ्रष्ट म्हणोनिया ॥ ५ ॥ वासना मलीन शुद्ध जाली येथं । ज्ञानीयासी तीर्थ तेंची सत्य ॥ ६ ॥ वृत्ति शुन्य होय मानस तें ज्ञानी । तीर्थ सर्वांहूनी श्रेष्ठ तेंची ॥ ७ ॥ विचारोनी बरें पाहे तूं अंतरीं । बाह्य तीर्थांतरीं हेत नाहीं ॥ ८ ॥ बहिणी म्हणे वृत्ति जालीया निमग्न । तीर्थाची ते संस्था तेची खरी ॥ ९ ॥

८८ अंतकाळ वेळ होईल निरभ्र । दिशा होती शुभ्र पाहे बाळा ॥ १ ॥ घेई याची साक्ष आपुले अंतरीं । राहोनी निर्धारीं आपुलीया ॥ २ ॥ देव निघालेती तीर्थासी विमान । हेलावें तें जाण तीन येती ॥३॥ दग्ध जालीयानें अस्तीगत देह । पुत्रा तूंची पाहे मनामाजीं ॥ ४ ॥ बहिणी म्हणे तुम्ही धरोनी विश्वास । पहा साक्ष यांस तुकाराम ॥ ५ ॥

८९ ऐक एक माते संदेह मानसीं । वाटला तयासी कोण फेडी ॥ १ ॥ गण-गोत आम्हां मायही सद्‌गुरू । मनींचा निर्धारू जाणसी तूं ॥२॥ बारा जन्म मागें साधलीया ज्ञान । आतां माझें मन स्थिरावलें ॥ ३ ॥ याचें मज कांहीं नकळेचि सर्वथा । आशंका हे आतां फेडीं माझी ॥४॥ जाणसी अंतर मानसींचा हेत । असेंचि या चित्त साक्ष तुझें ॥ ५ ॥ पूर्वानुक्रमेंशीं जन्म ते सांगीजे । माते कृपा-कीजे एक वेळा ॥ ६ ॥

९० ऐक सावधान पुत्रा तूं वचन । बोलों नये मौन सांगतसें ॥ १ ॥ न बोलावें कोणा न सांगावें गुज । साक्ष माझी मज जाण आली ॥ २ ॥ न सांगतां तुज खेद हो वाटेल । हेतही तुटेल अंतरींचा ॥३॥ बहिणी म्हणे कदा न सांगावें जनां । ऐकोनीया मनां हेत फेडी ॥ ४ ॥

९१ वेटाऊद तापी-तिरीं एक वैश्य । सांभवाचा दास केदार होता ॥१॥ त्यासी नसे पुत्र कन्येचें संतान । केलें महाउग्र अनुष्ठान ॥ २ ॥ शंकरा प्रसन्न करोनिया तेणें । स्वप्नगत येणें जालें हरा ॥ ३ ॥ पुत्र नाहीं तुज होईल संतान । एक कन्या जाण रूपवंती ॥ ४ ॥ वारुणी हें नाम ठेवावें तियेसी । वांचेल सायासीं वर्षें तेरा ॥ ५ ॥ केदार वैश्यस्त्री रुपवंती नाम । स्त्रिया ती उत्तम पतिव्रता ॥ ६ ॥ पतीचें वचन तियेसी प्रमाण । शांभवी तें जाण दीक्षा तीची ॥ ७ ॥ रूपवंती गर्भ धरी तिये वेळां । जन्म मज दिला महारुद्रें ॥ ८ ॥ पूर्वील संस्कार होतां कांहीं शुद्ध । जन्मतां प्रसिद्ध कळों आला ॥ ९ ॥ जन्मलीया मज वर्षांचिया पोटीं । पहातांची दृष्टी वदन माझें ॥ १० ॥ आणिला सद्‌गुरु केदारें आपुला । तयातें दाविला भाव माझा ॥ ११ ॥ नाहीं लग्न करूं दिधलें आपण । माझा सहज गुण ओळखीला

॥ १२ ॥ दिधली ते दीक्षा शंकराचा मंत्र । जपे अहोरात्र खेळतांही ॥ १३ ॥ खेळतां देऊनि शंकराची मूर्ती । करितसे भक्ति प्रेमरसें ॥ १४ ॥ नावडेची कांहीं आणीक सर्वथा । चित्ता अखंडता लागलीसे ॥ १५ ॥ ऐसीं तेरा वर्षें होतांची संपूर्ण । जालें तें दर्शन तुझें तेथें ॥ १६ ॥ सद्गुरु आमुचा तेथें तूं सेवक । जैसे एक रंक पोटासाठीं ॥ १७ ॥ माझे मुखें पुत्र घेतलें रे तुज । अंत देख मज जाला तेव्हां ॥ १८ ॥ त्यापुढें दुसरा जन्म म्यां घेतला । एक बा वाहिला एक चित्तें ॥ १९ ॥ बहिणी म्हणे पहिल्या जन्माचें हें मूळ । आणीक केवळ सांगतसें ॥ २० ॥

९२ आणीक सांगेन पूर्वील वृत्तांत । सावधान चित्त असो तुझें ॥ १ ॥ एक जन्म तुज सांगितला आतां । पुढिला व्यवस्था सांगेन तें ॥ २ ॥ 'कुम-चक्र' नाम फल्गुचिये तीरीं । सात्वीकाचे घरीं जन्म आम्हां ॥ ३ ॥ स्वधर्मीं तो वैश्य शंकराचा भक्त । अत्यंत विरक्त आत्मवेत्ता ॥ ४ ॥ तयाचा सद्गुरु सुवर्मा ब्राह्मण । आगमीचें पूर्ण ज्ञान तया ॥ ५ ॥ मंत्रविद्येमाजीं असोनि प्रविण । आत्मज्ञानीं पूर्ण हेत तया ॥ ६ ॥ तयाचा तूं शिष्य सात्वीकसा भोळा । पुत्र ते तयाला सात होते ॥ ७ ॥ कन्येसाठीं थोर उद्विग्न मानसीं । सद्गुरूनें तयासी सांगितलें ॥ ८ ॥ अनुष्ठान विधि मंत्र उपासना । सांगेन ते धारणा वैष्णवीची ॥ ९॥ ते वेळीं स्वप्न होवोनी तात्काळ । कन्या ते सुशील सदैव घेई ॥ १० ॥ तिचे हातें तुज सांपडेल धन । न करोनी लग्न जाईल ते ॥ ११ ॥ अठ्ठाविस वर्षें क्रमील तुजपासीं । आगर भक्तिसी करोनिया ॥ १२ ॥ मग तेथें जन्म घेतला आपण । तुझा संग जाण तेथें होतां ॥ १३ ॥ गुरुबंधु मज तेथं जोडलासी । सहवासें असती निरंतर ॥ १४ ॥ बहिणी म्हणे ऐसा जन्म हा दुसरा । आणीक तिसरा पुढें सांगे ॥ १५ ॥

९३ सांगेन ते एक जन्मांतर कथा । जेणें तुज चित्ता सुख वाटे ॥१॥ गोदावरी जेथें प्रगट ब्रह्मगिरि । वैश्य तो अवधारीं तेथं होता ॥ २ ॥ नाम हें तयाचें वर्धमान शेटी । धनवंत कोटी दान पुरुष ॥ ३ ॥ तयाची हे भाजा भामिनी सुंदरा । पति-व्रता खरा धर्म तिचा ॥ ४ ॥ तीन पुत्र तिशीं चौथा तूं पालक । होउनी बालक असती तेथं ॥ ५ ॥ धन धान्य द्रव्य गायींचीं गोठणें । नसें कांहीं उणें घरीं तया ॥ ६ ॥ वर्धमान शेटी सर्वांमाजीं श्रेष्ठ । जाला स्थानभ्रष्ट एक वेळा ॥ ७ ॥ येवोनी पंचाळीं करी अनुष्ठान । यज्ञ तो संपूर्ण वाड केला ॥ ८ ॥ तयाचा हा हेत कन्या व्हावी मज । भामिनी सहज रूपवंती ॥ ९ ॥ तियेचिया पोटीं जालें मी निर्माण । माझें नाम जाण हेमकला ॥१०॥ तयासी संतोष देखोन वाढला । दान धर्म केला यथाक्रमें ॥ ११ ॥ लग्न विवंचना करी वर्धमान । तंव जालें स्वप्न भामिनीसी

॥१२॥ करूं नको लग्न इथें कन्यकेचें । रूप विरक्तीचें हेमवंती ॥१३॥ राग कला नाम ब्राह्मणाची सेवा । आठवी केशवा सर्व काळ ॥ १४ ॥ तेथेंही संगती जाली तुह्मी मज । अंतरींचें गूज तुज सांगे ॥ १५ ॥ वर्ष तें चोवीस आयुष्य मर्यादा । सारोनी स्वानंदा देह गेला ॥ १६ ॥ ऐसें तीन जन्म वैश्याचीये याती । घेंवोनी विरक्ति वर्तीतलें ॥ १७ ॥ बहिणी ह्मणे आतां चौथा जन्म ऐक । करोनी विवेक सुखें राहे ॥ १८ ॥

९४ चौथा जन्म सांगेन पांचवा सहावा । आणिक सातवा योगभ्रष्ट ॥ १ ॥ गौळीयांचें घरीं कन्याची होऊनी । गाई-संरक्षणीं वर्ततसें ॥ २ ॥ नाम संकीर्तनीं काळाची क्रमणा । संगती ते जाणा वैष्णवाची ॥ ३ ॥ आवडती देव तीर्थ क्षेत्र यात्रा । ब्राह्मणां सर्वत्रां पूजीतसें ॥ ४ ॥ गायीचें रक्षण अरण्यांत वास । जाला सहवास संन्याशाचा ॥ ५ ॥ देखोनी तयासी करी नमस्कार । जाणोनी संस्कार कृपा केली ॥ ६ ॥ सातवे जन्मीचा सांगेन वृत्तांत । मागिलाचा प्रांत सांडियेला ॥ ७ ॥ गौळीयांचें घरीं गायींचें रक्षण । करोनी कीर्तन देह पोषीं ॥ ८ ॥ मग भेटलें ते सिद्ध आत्मज्ञानी । तींहीं वोळखोनी नेलें मज ॥ ९ ॥ ह्मणती योगभ्रष्ट आहे हीं विरक्त । दासत्वें सारीत बहुकाळ ॥ १० ॥ विरक्तीचें अंग ज्ञानाचा अभ्यास । करि रात्रंदिस एकनिष्ठ ॥ ११ ॥ सासष्ट वरुषें सातविये जन्मीं । क्रमोनिया धर्मी प्रवर्तलें ॥ १२ ॥ अभ्यास करोनी टाकिलें शरीर । तुज हा प्रकार सांगीतला ॥ १३ ॥ बहिणी ह्मणे जन्म पुढें उरले साही । प्रसंगेंची तेही सांगतसें ॥ १४ ॥

९५ सांगेन तो जन्म आठवा रे ऐक । धरोनी विवेक निश्चयाचा ॥ १ ॥ वेरुळ तें तीर्थ शिवालय क्षेत्र । शास्त्रज्ञ समर्थ ब्रह्मवेत्ता ॥ २ ॥ तयाचें तें नाम धर्मदत्त क्षेत्रीं । पुज्य तो सर्वत्रीं जनांमाजीं ॥ ३ ॥ तयाची सुंदरा पतिव्रता भली । कीर्ति फार केली पातिव्रत्यें ॥ ४ ॥ तयाचिये पोटीं जाला मज जन्म । कन्येचा उत्तम शांतिरूप ॥ ५ ॥ अठरा वर्षें क्रमिलीं आपण । करुनी श्रवण भागवत ॥ ६ ॥ लग्न केलें परी भ्रतार नासला । हितावह झाला तोही मज ॥ ७ ॥ नववे ये जन्मीं तेथेंची जन्मलें । नववरुषें केलें स्थान तेंची ॥ ८ ॥ तेंचि मातापिता तेचि बंधु वर्ग । अनुष्ठान सांग तेंचि आम्हां ॥ ९ ॥ दहावेया जन्मीं कौशिक ब्राह्मण । अग्नीचें सेवन त्याचे घरीं ॥ १० ॥ नित्य हरिकथा वेदांतश्रवण । नित्य करीं स्नान शिवालयीं ॥ ११ ॥ देवाचें दर्शन नित्य सेवा विधी । आत्मज्ञान बोधीं शांत देह ॥ १२ ॥ कन्येचिया रूपें जन्म ग्यां घेतला । क्रमिलीया काला कांहीं तेथें ॥ १३ ॥ पितयानें लग्न केलें कन्यादान । पाहोनी ब्राह्मण शुक्ल दीक्षा ॥ १४ ॥

ब्राह्मणाची भिक्षा करितां कोरान्न । गायींचें पालन घरीं तया ॥ १५ ॥ बेचाळीस वर्षें आयुष्य घातलें । तेथें पुत्र जाले तीन मज ॥ १६ ॥ पाहिला पुत्र तेथें तूंचि गा जालासी । आणीक विशेषीं दोन पुत्र ॥ १७ ॥ तुझा माझा गुरू संन्यासी केशव । तेणें विद्या सर्व प्रबोधिली ॥ १८ ॥ तयावरी तेथें ठेविलें शरीर । दहा जन्म-सार सांगितलें ॥ १९ ॥ बहिणी म्हणे आतां तीन जन्म शेष । सांगेन परीस ज्ञानवंता ॥ २० ॥

९६ आणीक आईक अकरावा जन्म । प्रवरासंगम गंगातीर ॥ १ ॥ तेथें माध्यंदीन ब्राह्मण तो भला । तेणें वास केला गंगातीरीं ॥ २ ॥ अयाचित वृत्ति आलीयासी अन्न । घालीतसे जाण यथाकाळीं ॥ ३ ॥ गोकर्ण हें नाम तयाचें उत्तम । शांति दया धर्म क्षमादीक ॥ ४ ॥ तयाची वल्लभा भली पतिव्रता । सगुणाद्भूता नाम तीचें ॥ ५ ॥ तयांचियें पोटीं होऊनी मी कन्या । नाम हें सौजन्या ठेवियेलें ॥ ६ ॥ साता वर्षांतरीं केलें कन्यादान । पाहोनी निधान अति ज्ञानी ॥ ७ ॥ अत्यंत विरक्त योगाभ्यासी पूर्ण । घालोनी आसन योग साधी ॥ ८ ॥ नाम तयाचें कीं योगेश्वर ऐसें । सिद्धि त्या मानसें वोळगल्या ॥ ९ ॥ सेवेनें तयासी तोषविलें बहू । त्याचा माझा जीऊ एक झाला ॥ १० ॥ सांगीतलें मज योगाचें आसन । धरोनी ध्यान खेचरीचें ॥ ११ ॥ गुरु तो भ्रतार सर्वस्वें आमुचें । घेतलें सेवेचें सौख्य तेथें ॥ १२ ॥ गुरु बंधु पुत्र सांगातीं मागील । तूं होसी कैवल्य जन्मोजन्मीं ॥ १३ ॥ क्रमोनिया तेथें वर्षें त्रेचाळीस । राहिला हव्यास ब्रह्मनिष्ठे ॥ १४ ॥ बहिणी म्हणे आतां जन्म तो बारावा । सांगेन धरावा हृदयांमाजीं ॥ १५ ॥

९७ तुझें मनोगत जाणोनी अंतरीं । बोलीली वेखरी जन्म नाना ॥ १ ॥ ऐकावा बारावा सांगेन तांतडी । मृत्युची हे थोडी वेळ आहे ॥ २ ॥ लाखणी हें स्थळ-अगाधाचि तोये । लक्ष तीर्थ पाहे तये स्थळीं ॥ ३ ॥ शिवनद पाहे औट नदांतील । संगमीचें स्थळ महाउग्र ॥ ४ ॥ तेथें अनुष्ठानीं होतां एक द्विज । नाम तया साजे रामचंद्र ॥ ५ ॥ तयाची वल्लभा जानकी पवित्र । तया घरीं पुत्र दोघे होती ॥ ६ ॥ थोर ब्रह्मज्ञानी शांतीचा आगर । तीर्थांचें माहेर तीर्थरूप ॥ ७ ॥ तयाचिया पोटीं कन्येचिये रूपें । जन्मोनिया तपें साधीयलें ॥ ८ ॥ धरोनीया मौन वर्ततसें जनीं । बोलती वचनीं वाचा नसे ॥ ९ ॥ करोनिया लग्न दिधलें ब्राह्मणा । ज्योतिषी तो जाणा महा थोर ॥ १० ॥ तयासी प्रसन्न गणेश प्रत्यक्ष । बोलतसे साक्ष तयासी तो ॥ ११ ॥ तयाचिये गेहीं निराहार देहीं । सेवासुख पाहीं घेतलें म्यां ॥ १२ ॥ विरक्त मानस विषयभोगीं त्रास । सदा मज ध्यास आत्मनिष्ठा ॥ १३ ॥ राम-

चंद्र पिता राम-उपासक । अत्यंत विवेक ज्ञान तया ॥ १४ ॥ माझे अंतरींचा-जाणोनीया हेत । केलें माझें चित्त स्थिर तेणें ॥ १५ ॥ लावोनी समाधी बैसवी संन्निध । अंतरीं तो बोध ठसावला ॥ १६ ॥ स्वधर्मे गौरवें देउनिया पती । सेवा आत्मस्थिती करी त्याची ॥ १७ ॥ कोठें चित्त आणुमात्रही न वसे । सदा निज-ध्यासें देह वर्ते ॥ १८ ॥ पडिलें शरीर छत्तिसा वर्षांत । व्हावें परी मुक्त शेष राहे ॥ १९ ॥ बहिणी म्हणे जन्म बारावा तो ऐसा । तेराव्याची दशा सांगीजेल ॥ २० ॥

९८ एक सावधान सांगेन आणीक । मागील तें देख सांगितलें ॥ १ ॥ कित्येक संदेह राहिले सांगतां । त्वरा जाली चित्ता अंतकाळीं ॥ २ ॥ विवेक तें शास्त्र अनुभव अंगींचा । असेल तो साचा अर्थ जाणे ॥ ३ ॥ अवघेचि ते जन्म आठवती मज । अंतरींचें गूज मृत्यु-वेळां ॥ ४ ॥ आदर्शांत जैसें दिसे प्रतिमुख । तैसे जन्म देख दिसती डोळां ॥ ५ ॥ लटिकेची शब्द व्यवहारीं मानीती । मूर्ख तयां-प्रती बोलों नये ॥ ६ ॥ कस्तूरीचा वास घेईल काऊळा । तरिच ते कळा कळे तया ॥ ७ ॥ तेरा जन्मां पूर्वीं आठवें समस्त । परी तैसा हेत नाहीं मज ॥ ८ ॥ मुंगीचा तो मार्ग सांपडे न वाघा । जरी तो थोर गा जाला बहू ॥ ९ ॥ बहिणी म्हणे देव कृपा करी जेव्हां । सर्व हित तेव्हां कळे मनीं ॥ १० ॥

९९ तेरावा तो जन्म देह वर्ते हाची । सांगेन तयाची मूळ कथा ॥ १ ॥ देव-गांवीं शाखा 'वाजसनीय' जाण । लेख प्रविण एक सांगो ॥ २ ॥ मौनस कुळींचा ब्राह्मणाचा भक्त । भोळा ज्ञानवंत भाग्यनिधी ॥ ३ ॥ तयाची वल्लभा जानकी ते नाम । माता ती उत्तम पतिव्रता ॥ ४ ॥ तयाचिये घरीं कन्या मी जालीये । लग्न केलें तये स्थळीं जाण ॥ ५ ॥ गौतम कुळींचा भ्रतार पाहिला । अत्यंत शोभला ज्योतिषी तो ॥६॥ तयाचिये घरीं 'शक्ति' उपासना । तयाची कामिना केली मज ॥ ७ ॥ कांहीं एक योगें दक्षिणीं कोल्हापुर । तेथें तो भ्रतार वास करी ॥ ८ ॥ माझी माता पिता बंधु भगिनीशीं । तयाचे भेटीसी सर्व गेलों ॥ ९ ॥ तेथें तो 'जयराम' कृष्णदास संत । महिमा अद्भुत सिद्धि त्यासी ॥ १० ॥ तया संगतीनें क्रमोनिया काळ । जाला तो दयाळ कृपानिधी ॥ ११ ॥ सांगितलें मज पतीचें सेवन । तीर्थ तें घेवोन नित्य राहे ॥ १२ ॥ गीतेचें पठण करीं मी सर्वदा । वेदाची मर्यादा नुलंघोनी ॥ १३ ॥ वाटलें भ्रतारा जावें स्वदेशासीं । त्वरें कुटुंबेशीं निघाले गा ॥ १४ ॥ आलों इंद्रायणी । देहु-गांव स्थळीं । कोंडाजी भेटला पंत तेथें ॥१५॥ ब्राह्मण म्हणोनी घातलें भोजन । तेथें गर्भ जाण तुझा होता ॥ १६ ॥ देखियलें तेणें मग कुटुंबासी । म्हणे या स्थळासी रहा तुम्ही ॥ १७ ॥ आहे गरोदर तुमची स्त्री जाण । प्रसूत होवोन जाणें पुढें ॥ १८ ॥ देईन मी धान्य तुम्हा जें लागेल ।

क्रमोनिया काल जावें स्थलां ॥ १९ ॥ मागुतीं राहिलों विचारोनी मनीं । नाम-संकीर्तनीं काळ सारूं ॥ २० ॥ पांडुरंग देव तुकाराम साधु । सर्वदा आनंद हरि-कथा ॥ २१ ॥ नमस्कार करूं तुकाराम यासी । चित्त पायापासीं विठोबाच्या ॥ २२ ॥ आनंद वोवरी देखियली मग । देव पांडुरंग तयापासीं ॥ २३ ॥ वाटलें मानसीं बैसावें एकांतीं । तीन अहोरात्री तये स्थळीं ॥ २४ ॥ भ्रतार क्रोधाचा पुतळा सर्वही । एकांत तो पाहे केवीं साधे ॥ २५ ॥ तंव अकस्मात कार्याच्या उद्देशें । भ्रतार आवेशें पुण्या गेला ॥ २६ ॥ पुसोनी मातेसी इंद्रायणीं स्नान । केलं पैं दर्शन विठोबाचें ॥ २७ ॥ मनासीं आवेश सत्त्वाचा लोटला । आनंद दाटला आसनीं हो ॥ २८ ॥ तीन अहोरात्री क्रमिल्या ते ठायीं । आनंद तो देहीं थोर जाला ॥ २९ ॥ दुसरीया दिवशीं तुकारामरूपें । मंत्र तीन सोपे सांगि-तले ॥ ३० ॥ तेरावा हा जन्म लाधलीस आतां । पूर्वीं योगपंथा सिद्ध केलें ॥३१॥ आतां तुज पुढें नाहीं जन्म योनी । पतीच्या भजनीं राहीं सुखें ॥ ३२ ॥ तुझीये वो पोटीं आला असे पुत्र । ते तुवा एकत्र तेरा जन्म ॥ ३३ ॥ तोही आत्मनिष्ठ होईल ज्ञानिया । पुढें जन्म तया पांच होती ॥ ३४ ॥ बोलोनिया ऐसें जाला तो अदृश्य । लाविला अंगुष्ठ भ्रूवोमध्यें ॥ ३५ ॥ मग म्यां बाहेरी केलें गंगास्नान । घेतलें दर्शन विठ्ठलाचें ॥३६ ॥ पांच पदें एक आरति लिहून । विठ्ठला ध्याऊन समर्पिलीं ॥ ३७ ॥ बाहत्तरी वर्षें आयुष्य मर्यादा । आजी झाली सिद्धासनीं पूर्ण ॥ ३८ ॥ अंतकाळ आतां आला रे सन्निध । सांगीतला बोध जन्म तेरा ॥ ३९ ॥ सोळा प्रहर शेष राहिले आतां । सावधान चित्ता करीं बा रे ॥ ४० ॥ अंतकाळ वेळ पांचही असावी । तें मना पुसावी मृत्यु वेळीं ॥ ४१ ॥ बहिणी म्हणे तेरा जन्माचें सर्वही । सांगीतलें कांहीं गुरु-कृपा ॥ ४२ ॥

१०० तेरा जन्म तुज सांगीतले आज । दृश्य माझे मज सर्व होती ॥ १ ॥ आज याचि परी समयो पाहोनी । तुज रे निर्वाणीं सांगितले ॥ २ ॥ अठरा दिस मृत्यु पुढें कळों आला । परि नाहीं कथिला एक सांगे ॥३॥ रुक्मिणीसी आधीं मृत्यु जाल्यावरी । जावें गोदावरी उत्तरकार्या ॥ ४ ॥ अठरा दिस मृत्यू जाला अगोदर । रुक्मिणी सादर पतिव्रता ॥ ५ ॥ माझा मृत्यु तुज सांगतांची खेद । नव जे सांगो दे क्रिया कर्म ॥ ६ ॥ यालागीं अंत सांगितला नाहीं । धरोनी हृदयीं सावधान ॥ ७ ॥ तुज गेलीयानें नागरीक सर्व । सांगीतला भाव अंतरींचा ॥ ८ ॥ तेरावा दिवस रुक्मिणीचा जेव्हां । तुम्हीं पत्र तेव्हां पाठवावें ॥ ९ ॥ पांच दिवस मृत्यु तेथोनी उरला । हेत सांगितला नागरीकां ॥ १० ॥

आठविलीं तीं तीं लिहिवीलीं पदें । पाहांनिया शुद्धें लिहिलीं पुढें ॥ ११ ॥ बहिणी म्हणे देव बोलवी जे वाणी । असत्य जो मानी नर्क तया ॥ १२ ॥

१०१ मृत्यूचें प्रसंगीं असावें सावध । आत्मनिष्ठ बोध राखोनीया ॥ १ ॥ ऐसें गीतेमाजीं बोलीला भगवंत । आज तो वैकुंठ असे आम्हां ॥ २ ॥ अग्नीचें तें बळ आहे आजी देहीं । ज्योती तें हृदयीं सावधान ॥ ३ ॥ दिवसाचि मृत्यु शुक्लपक्षीं आहे । सांगीतलें पाहे विचारोनी ॥ ४ ॥ नाहीं एक आजी उत्तरायण खरें । सद्गुरु-निर्धारें काय काज ॥५॥ उत्तराभिमुख घालोनी आसन । धैर्य सावरोन प्राण रोधी ॥ ६ ॥ सद्गुरुस्मरणीं पांचही ते योग । आम्हांसी ते सांग फळा आले ॥ ७ ॥ बहिणी म्हणे तुज सांगितलें वर्म । पुढीलाही क्रम पाहे डोळां ॥ ८ ॥

१०२ प्रपंचीं विन्मुख जालीयानें चित्त । उत्तरायण सत्य तेंचि आम्हां ॥ १ ॥ नाहीं काज तया उत्तरायणाचें । सांगीतलें साचें पुत्रराया ॥ २ ॥ प्रपंचाभिमुख मानस सर्वदा । दक्षिण प्रसिद्धा जाण तेची ॥ ३ ॥ बहिणी म्हणे वेदशास्त्राचे संमत । सांगितलें मत स्वानुभवें ॥ ४ ॥

१०३ मागीलही जन्म आठवती कांहीं । त्वरा जाली देहीं मृत्युवेळीं ॥१॥ यालागीं राहिलें सांगणें मागील । साधनें प्रवळ होतीं खरीं ॥ २ ॥ देह प्राक्तना मागीलें संचित । स्वस्वरूपें चित्त भूमिका क्रमी ॥ ३ ॥ सत्यही भूमिका वैराग्य सांगातीं । स्वधर्में विरक्ति संपादिली ॥ ४ ॥ विदेहि अवस्था भूमिका सातवी । तें येथं अनुभवीं साधियेली ॥ ५ ॥ सरलें संचित प्राक्तन देहाचें । माझी मज साचें साक्ष याची ॥ ६ ॥ तेरा जन्म सर्व भूमिका साधिल्या । वृत्तिही राहिल्या निमग्न त्या ॥ ७ ॥ बहिणी म्हणे कांहीं न घरीं संदेह । विवेकें विदेहदशा आली ॥ ८ ॥

१०४ मन हें विरक्त विषयीं सर्वदा । इंद्रियें गोविंदा समर्पिलीं ॥ १ ॥ तेंचि प्रायःश्चित घेतलें अंतरीं । सबाह्याभ्यंतरीं एकनिष्ठ ॥ २ ॥ मंत्र ज्ञान सदा श्रीराम-चिंतन । सद्गुरुभजन सर्वकाळ ॥३॥ दशदानें दशकां परेसीं समर्पू । गोदानें संकल्पूं वासनेचीं ॥ ४ ॥ पंचगव्य तेंचि जाण अर्ध-मात्रा । सोहं या पवित्रा प्राशियेलें ॥ ५ ॥ ज्ञानगंगें स्नान मनाचें वपन । वृत्ति त्या निमग्न ब्रह्मरूपीं ॥ ६ ॥ हेंचि प्रायश्चित्त सदा सर्व काळ । मन हें अढळ निश्चयाचें ॥ ७ ॥ बहिणी म्हणे ऐसें केलें प्रायश्चित्त । शास्त्राचा संकेत शास्त्र जाणे ॥ ८ ॥

१०५ हेत तो प्रमाण जन्मासी कारण । अनुभव खूण हेंचि आम्हां ॥ १ ॥ ऐसें जाणोनीया हेत निर्दाळीला । अद्वय तो जाला हेत चित्तां ॥ २ ॥ इंद्रियां आणोनी

दिलें प्रायःश्चित्त । ज्ञानमहातीर्थ आत्मनिष्ठा ॥ ३ ॥ विषयवासना भोगीली बहुसाल । तयाचें निर्मूळ आजि केलें ॥४॥ सद्गुरुवचनीं धरोनिया निष्ठा । वासना त्या भ्रष्टा शुद्ध केल्या ॥ ५ ॥ बहिणी म्हणे मना दिलें प्रायश्चित्त । आतां जालें मुक्त आत्मबोधें ॥ ६ ॥

१०६ तीन शतें आणि वरुषें एकावन्न । आयुष्य निर्माण तेरा जन्मीं ॥ १ ॥ घातलें स्त्रीरूपें साधनें हरीच्या । निमाल्य मनाच्या वृत्ती जंव ॥ २ ॥ आतां निश्चयानें सांगेन निर्धार । जालें निर्विकार चित्त माझें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे पुढें कांहीं नाहीं हेत । स्वरूपीं निवांत चित्त माझें ॥ ४ ॥

१०७ हा देह जोंवरी आहे तुझा जाण । तोंवरी तूं ज्ञान साधिसील ॥ १ ॥ या पुढें तुज जन्म होती श्रेष्ठ । असती योगभ्रष्ट जन्म नाना ॥ २ ॥ तीन जन्म तुझा काशी क्षेत्रीं वास । वैराग्य मानस होईल तें ॥ ३ ॥ ऐक तूं जन्मसी संन्यासी नेमस्त । चित्त कांहीं स्वस्थ होय तेथें ॥ ४ ॥ पांचवीयें जन्मीं अठरा वर्षीं तुज । विदेहत्व पूज्य होसी खरा ॥ ५ ॥ तयां पुढें जन्म घेणें नाहीं कदा । सांगतेंस धंदा नको आतां ॥ ६ ॥ बहिणी म्हणे तुझें जाणवेल तुज । कृपा करे बुझ गुरु-खुणें ॥ ७ ॥

१०८ आपलें आपण देखीलें मरण । तो जाला शकुन स्वानंदासी ॥ १ ॥ उभारीली गुढी मनाच्या शेवटीं । जाली मज भेटी आत्मारामीं ॥ २ ॥ केला प्राणायाम सोहं धारणेसी । मिळाली ज्योतीशीं ज्योत तेणें ॥ ३ ॥ सरलें संचित आयुष्य देहाचें । क्रियमाण अंतींचें रामरूप ॥ ४ ॥ उठाति रागादिनीं कामक्रोध माया । म्हणे अहा ! अहा ! यम धर्म ॥ ५ ॥ वैराग्याच्या श्रेणी लावील्या देहाला । ज्ञानाग्नि लाविला ब्रह्मत्वेंसी ॥ ६ ॥ जाला प्रेमरूप शरीराचा भाव । देखियेला ठाव स्मशानींचा ॥ ७ ॥ फिरविला घट फोडिला चरणीं । महावाक्य ध्वनी बोंब झाली ॥ ८ ॥ दिली तिलांजुली कुळ नाम रूपासी । शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ॥ ९ ॥ बहिणी म्हणे रक्षा जाली त्रिपुरेची । तुकारामें साची कृपा केली ॥ १० ॥

१०९ शेष प्राक्तनाची रक्षा करुनीया । नेली तें अद्वयानंदतीर्थी ॥ १ ॥ त्रिकोण वेदिका त्रिगुणाचा देह । सिंपोनी विदेह रूप केलें ॥ २ ॥ निर्गुणाचें भाव येती जे आठही । गोमुत्र तें पाहीं तयावरी ॥ ३ ॥ लाविल्या पताका सात्विक भावना । मंत्राची धारणा ब्रह्मनिष्ठा ॥ ४ ॥ ऐसा सिंचनविधी संपादिला येथें । पुढें मोक्ष-पंथ क्रिया योग ॥ ५ ॥ बहिणी म्हणे क्रिया करितां स्वदेहाची । माझी मीच साक्षी होउनी ठेलें ॥ ६ ॥

११० प्रथमदिनादारभ्य आरंभिली क्रिया । पिंडीं पिंड पहा निवेदिला ॥ १ ॥

दुसरीया दिवशीं द्वैतें हारपलीं । अद्वैत बिंबलें परब्रह्मीं ॥ २ ॥ तिसरीया दिवशीं त्रिगुणाची शांती । पिंडाची समाप्ती त्याचिपरी ॥ ३ ॥ चवथीया दिवशीं चौदेहातीत । उघडा संकेत वोळखिला ॥ ४ ॥ पांचवीया दिवशीं केलें पिंडदान । पांचही प्राण बोळविलें ॥ ५ ॥ सहावीया दिवशीं षडार्मी निमाल्या । वृत्ती स्थिरावल्या आत्मरूपीं ॥ ६ ॥ सातवीया दिवशीं सप्तधातू आंत । राहे अखंडित अद्वयत्वें ॥ ७ ॥ आठवीया दिवशीं नाश अष्ट भावा । अद्वयानुभवा सुखें राहे ॥ ८ ॥ नवमी नवांक भक्ति नवविधा । सरल्या आत्मबोधामाजीं आल्या ॥ ९ ॥ दहावीया दिवशीं इंद्रीयें दहाही । बोळवण देहीं केली त्यांची ॥ १० ॥ अश्मा तो उत्तरीं पंचधा विषय । ज्ञानगंगें पाहे योग त्याचा ॥ ११ ॥ अकरावे दिवशीं अकरावें मानस । परब्रह्मीं त्यास निवेदीलें ॥ १२ ॥ वृषोत्सर्ग केला भव विरक्तीचा । विजनीं तयाचा वास केला ॥ १३ ॥ होम केला सर्व शेष प्राक्तनाचा । हेत सुतकाचा पुढें नाहीं ॥ १४ ॥ सपिंडीचें कर्म बाराव्या दिवसांत । वासनेचा प्रांत होय तंव ॥ १५ ॥ व्हाया निर्वासना बाराव्या दिवशीं । अद्वय सरसीं परब्रह्म ॥ १६ ॥ माय अविद्येचें जाळीलें बिंबलें । असि-पदीं आलें ऐक्य चित्ता ॥ १७ ॥ सच्चिदानंद दृश्य द्रष्टा तें दर्शन । ध्येय ध्याता ध्यान विसरलें ॥ १८ ॥ त्रिपुटीचा नाश तोचि रे बारावा । ब्रह्मत्व या जीवा केलें तेणें ॥ १९ ॥ बिंब प्रतिबिंबीं हरपलें तेंचि । बाराव्यासी हेंचि । साच संज्ञा ॥ २० ॥ सोहं हंस याची केली बोळवण । बारावा तो दिन आजी खरा ॥ २१ ॥ उल्लंघोनी कळा चालीलें द्वादश । तेंचि बारामास श्राद्ध केलें ॥ २२ ॥ चंद्राचीया कळा साळाच्या उपरमा । न्युनाधीक सीमा तेंचि आम्हां ॥ २३ ॥ ज्ञान तेंचि गंगा सांगे गुरु क्रिया । साक्षात्कार गया तेंचि आम्हां ॥ २४ ॥ मंगल श्राद्ध करूं गुरूचिया वचनीं । ब्रह्मचि होऊनी ब्रह्मदेवा ॥ २५ ॥ ऐसी जाण क्रिया केली या शरीरें । विवेकें निर्धारें आपुलीया ॥ २६ ॥ बहिणी म्हणे आतां असो देहभाव । आमुचा दृढ भाव हाचि खरा ॥ २७ ॥

१११ बोलावा ब्राह्मण मंत्रस्नान करूं । दानाविधि सारूं अंतकाळीं ॥ १ ॥ घ्यावें प्रायश्चित वेदाचिया मतें । आमुचीं दैवतें द्विज तुम्ही ॥ २ ॥ दश दानें देऊनी केला नमस्कार । आतां कृपा फार असों द्यावी ॥ ३ ॥ सात प्रहर शेष उरला अंतकाळां । दिंडीं टाळ घोळां कथाभारें ॥ ४ ॥ ज्ञानेश्वरी ग्रंथ संपला प्रजन्य ? । करावे ब्राह्मण सिद्ध उभे ॥ ५ ॥ वाद्याचिये ध्वनी वाजतीं अंबरीं । दशनाद भीतरीं आयका रे ॥ ६ ॥ घालोनी आसन बैसोनी ध्यानस्त । पाहें मी प्रशस्त गुरु-खूणें ॥ ७ ॥ शंख चक्र गदा तुळसीच्या माळा । ब्राह्मणांच्या गळां शोभताती ॥ ८ ॥ सावधान तुम्ही म्हणा ज्ञानेश्वर । विठ्ठल निर्धार नाम जपा

॥ ९ ॥ सांगेन तें तुम्हीं ऐकावें सर्वही । अंतकाळ देहीं जवळ आला ॥ १० ॥ बहिणी म्हणे आतां पांचही ते योग । पाहों पां प्रसंग येचि क्षणीं ॥ ११ ॥

११२ आसनीं बैसोन उत्तराभिमुख । सहजासनीं देख अंतकाळीं ॥ १ ॥ सूर्योदयापूर्वीं घटिका तीन जाण । आसनीं बैसोन ध्यान मुद्रे ॥ २ ॥ तयीं तुवां पुत्रा बैसोनी पाठीसी । सावध मानसीं आत्मनिष्ठें ॥ ३ ॥ बाह्य ध्वनि कानीं पडती तुज कांहीं । ध्यान तें हृदयीं धरीं तेथें ॥ ४ ॥ करावा गजर नामकीर्तनाचा । दीस आनंदाचा महा थोर ॥ ५ ॥ लावीन रे हात जाण जये स्थानीं । जाण तूं तें मनीं प्राण तेथें ॥ ६ ॥ तीन आणि तेरा सोळा घटिका जाण । आसनीं बैसोन ध्यान मुद्रे ॥ ७ ॥ नव घटिका नाम न सांडी उच्चार । चित्ताचा निर्धार सांगितला ॥ ८ ॥ सात घटिका पुढें तयाची लोडणी । इंद्रियें गोठणीं सर्व येती ॥ ९ ॥ चार घटिका ध्यानीं राहेन तटस्थ । तुवां मन स्वस्थ असों द्यावें ॥ १० ॥ ऐसीया घटिका तेरा गेलीयानें । सद्गुरुस्मरणें वदे जिव्हा ॥ ११ ॥ तुकाराम मुखीं गंगाधरस्मरण । आठवण जाण मालिकेची ॥ १२ ॥ नंतरें त्या पुढें नासिकाग्रीं दृष्टी । वळोनिया मुष्टी हात दोन्ही ॥ १३ ॥ माळ तेव्हां कंठीं घालीन स्वहस्तें । करोनी प्रशस्त चित्त राहे ॥ १४ ॥ एकाग्रता सर्व वायूचा उपरम । उदानीं संभ्रम योग त्याचा ॥ १५ ॥ हृदयीं धरोन नारायण ध्यान । राहे समरसोन चित्त तेव्हां ॥ १६ ॥ अखंड अद्वय हृदय व्यापक । स्मरण तें एक अद्वयाचें ॥ १७ ॥ बहिणी म्हणे ऐसी अंतकाळस्थिती । सांगितली गति निश्चयेंसी ॥ १८ ॥

११३ सद्गुरू वोवाळा वोवाळा । उजळोनी निज ज्योतिज्वाळा ॥ १ ॥ पिंड हरपला पिंडीं । तेज व्यापिलें ब्रम्हांडीं ॥ २ ॥ शांतिसुखाचें आसन । अद्वय बोधाचें पूजन ॥ ३ ॥ चिद्घन चिदानंदगाभा । सच्चिदानंद निज प्रभा ॥ ४ ॥ तेज प्रकाशलें लोचनीं । बहिणी हरपली चिद्घनीं ॥ ५ ॥

११४ घट फुटलीयावरी । नभ नभाचेभीतरीं ॥ १ ॥ ऐसा देह गेलीयानें । उरे स्वरूप चिद्घन ॥ २ ॥ जळ आटलीया जाण । प्रतिबिंब म्हणे कोण ॥ ३॥ लागली कापुरासी । अग्निरूप नाहीं ह्मसी ॥ ४ ॥ बहिणी ऐसें नाम माया । गेलें ध्याऊनी अद्वया ॥ ५ ॥

११५ शेवटीं ते आतां सांगतसें लोकां । मनीं धरा निका सत्य भाव ॥ १ ॥ घरोघरीं संत जाले कलीमाजीं । केज्यावरी भाजी तैशापरी ॥ २ ॥ बहिणी म्हणे येथें आपुला सद्भाव । तारील सर्वां सर्व हेंचि जाणा ॥ ३ ॥

११६ ऐकोनिया पत्र आलासी तांतडी । घालोनिया उडी पुत्रराया ॥ १ ॥ तेरावा दिवस केला 'रुक्मिणी' चा सद्गदित वाचा कंठ दाटे ॥२॥ जालासी उत्तीर्ण

तूंचिरे सर्वांचा । मनें काया वाचा सर्व भावें ॥ ३ ॥ देखोनिया तुज संतोष वाटला । प्रेमेंचि दाटला कंठ माझा ॥४॥ मृत्यूचा संकल्प अश्विन शुद्ध प्रतिपदा । ऐक तूं प्रसिद्धा सांगितला ॥ ५ ॥ खेद तो अंतरीं धरावा न कदा । सांगतां मर्यादा नुलंघावी ॥ ६ ॥ पुत्रपण तुझें आजी आलें फळा । माझ्या अंतकाळ पावलासी ॥ ७ ॥ बहिणी म्हणे आतां विचारिजे बाळा । साशंकता खळा नको ठेवों ॥ ८ ॥

---

# संत बहिणाबाईचे चि. संत विठ्ठलमहाराज यांचे अभंग.



११६ उदर भराया केलें असें ढोंग । घरोघरीं बोंब उपदेशाची ॥ १ ॥ आपणा कळेना लोकां सांगे ज्ञान । धरोनीया ध्यान बकाऐसें ॥ २ ॥ स्वयें बुडोनिया लोकां बुडविती । हात धरुनी जाती यमलोका ॥ ३ ॥ विठा म्हणे त्यांच्या काय करूं कपाळा । पापाचा कंटाळा न करिती ॥ ४ ॥

---

# ४ मनःपर अभंग.



११७ सद्गुरूचे पाय धरीन हृदयांत । राहीन ध्यानस्थ सर्व काळ ॥१॥ मग मना तुझें काय तेथें उरे ध्यानाचे वागुरे सांपडसी ॥ २ ॥ सद्गुरुवचनीं धरीन विश्वास । प्रेम अविनाश होय तेथें ॥ ३ ॥ सद्गुरूचा सर्वदा होईन मी दास सर्वस्वीं उदास होउनीया ॥ ४ ॥ देह वाचा मन समार्पिन पायीं । सद्गुरु हृदयीं सांठवीन ॥ ५ ॥ बहिणी म्हणे मना सांडीं रे मीपण । जाय तूं शरण सद्गुरूशी ॥ ६ ॥

११८ सर्व साधनांच्या माथा गुरुसेवा । जे करि या जीवा ब्रह्मरूप ॥ १ ॥ तयाचिया पायीं जाऊनी राहेन । तेथें मना कोण तुज पुसे ॥ २ ॥ शास्त्रवेद नाना दर्शनां वरिष्ठ । सद्गुरु हा श्रेष्ठ सर्वांपरीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे स्वामी सद्गुरूची कृपा । दाखविलि सोपा मार्ग मना ॥ ४ ॥

११९ बचनागाचे झाडीं विष कोण घाली । इंद्रावनातळीं कडूपण ॥ १ ॥ तैसें मना तुज विषय हे अंगींचे । तुझे तुज रुचे गुळापरी ॥ २ ॥ दुर्गंधी त्या घाली विष्टेमाजीं कोण । कावळयासी गुण विष्ठा भक्षी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मना विषय तुझें मूळ । तेथें तूं अचल धृत्तिदारां ॥ ४ ॥

१२० तृण अरण्यांत पेरावया जावें । ऐसें कोणी जीवें आदरीना ॥१॥ तैसें मना तुज विषय भोगकरी । सांगेन विचारी नलगे कोणा ॥ २ ॥ नाना वृक्षयाती डोंगरीं लागती । स्वभावतां क्षितीं वाढी तया ॥ ३ ॥ पशुपक्ष्यांप्रती कोण सांगे काम । ज्याचें जें जें कर्म तें तो करी ॥४॥ बहिणी म्हणे मना तुज ही धारणा । विषयाची वासना कल्पकोटी ॥ ५ ॥

१२१ निंबा कडुपण देत असे कोण । इक्षु गोड पण कोण करी ॥ १ ॥ बिजा-ऐसें फळ गोडीचा निवाडा । हा अर्थ उघडा दिसतसे ॥ २ ॥ इंद्रावनामुळीं कोण घाली विष । अमृत आम्रास कोण देई ॥ ३ ॥ बचनागाअंगीं विष कोण लावी । सुगंधता द्यावी नलगे पुष्पा ॥ ४ ॥ तीक्ष्ण सोहरी करितसे कोण । खारीक निर्माण मधुर कां हो ॥ ५ ॥ बहिणी म्हणे बीजाऐसें येत फळ । उत्तम ओंगळ परीक्षावें ॥ ६ ॥

१२२ शुकरा आणि श्वाना गर्दभासी जाणा । विष्टेच्या भक्षणा कोण सांगे ॥ १ ॥ ज्याचा तो संस्कार घेउनीया उठे । लोकां दुःख वाटे कासयासी ॥ २ ॥ दंश करीं ऐसें कोण सांगे सर्पा । विंचवाच्या कोपा लोक कष्टी ॥३॥ व्याघ्रवृकादिकां कोण सांगे कामीं । राहोनीया रानीं जीव मारा ॥ ४ ॥ गोचीड ढेकण हे रक्त भक्षिती । तयां हे सांगती लोक कार्यी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे पूर्व संस्कार जीवाचा । प्रवर्तवी साचा न सांगतां ॥ ६ ॥

१२३ केळी आणीक या नारळी पोफळी । कोण घाली मुळीं दुग्ध तयां ॥ १ ॥ बीज तैसें फळ येत असे गोड । जाणती निवाडा संत याचा ॥ २ ॥ फणस आणि आंबा सिताफळें नाना । मुळींचिया गुणा गोड होती ॥ ३ ॥ बहिणी म्हणे बीज गोड त्याचें फळ । उत्तम केवळ सेव्य सर्वां ॥ ४ ॥

१२४ मना तुझा संस्कार संग हा पूर्वील । विषयाचें बळ तुझे अंगीं ॥ १ ॥ म्हणोनी प्रार्थना करितसें तुझी । इंद्रियांसी राजी केलें असें ॥ २ ॥ नायकसी माझें सांगितलें जरी । शरिराची उरी उरों नेदीं ॥ ३ ॥ करीन उपवास कोंडोनिया श्वास । पंचाग्नीचा वास उष्णकाळीं ॥ ४ ॥ धूम्रपानें देह पीडीन सर्वथा । हिंडवीन तीर्थां सर्व पृथ्वी ॥ ५ ॥ साधोनीया योग बैसेन आसनीं । राहीन निर्वाणीं उपोषणें

॥ ६ ॥ घालीन कर्वतीं देह हा आपुला । तेथें मग तुला प्राप्त काय ? ॥ ७ ॥ बहिणी म्हणे मना सांगतसें ऐक ।नाहीं तरी भीक मागशील ॥ ८ ॥

१२५ विवेक वैराग्य सांपडलें मज । आतां मना तुज कोण पुसे ॥ १ ॥ धरोनी आणीन करीन ध्यानस्थ । होईल तों अस्त इंद्रियांचा ॥ २ ॥ तुझाच तुजला करीन पारखी । मना तूं विलोकीं आपणांसी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मना यश घेतां हित । आहे तूं निवांत पाहें ऐसें ॥ ४ ॥

१२६ विवेकाचें बळें वैराग्य साधलें । तेथें तुझें केलें काय चाले ॥ १ ॥ म्हणोनी आपुल्या ठायीं तूं आपण । पाहें विचारून मनामाजीं ॥ २ ॥ काम क्रोध लोभ मद हा मत्सर । तुजसवें वैर चालवीती ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मंत्री विवेका-सारिखा । जोडिला हा निका निश्चयाचा ॥ ४ ॥

१२७ म्हणशील मना इंद्र म्यां ठकीला । ब्रह्मयाचा केला मानभंग ॥ १ ॥ तुझा तेथें काय पाड असे मूढा । मनाचा पवाडा वेदशास्त्रीं ॥ २ ॥ नारदाची केली नारदी आपण । माझे ठायीं पण बोलों नये ॥ ३ ॥ शिवासीं आपण हिंडवीलें रानीं । विष्णु करी ध्यानीं वृंदा वृंदा ॥ ४ ॥ व्यासा ठकविलें ऋषी नागवीले । मज मना-वगळें काय असे ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसा मनाचा प्रतिशब्द । ऐकोनीया स्तब्ध चित्त झालें ॥ ६ ॥

१२८ इंद्राचा संकत होता लग्नकाळीं । भोगीन मी बळी अहिल्येसी ॥ १ ॥ हेत होता त्याचा तरी तो काय कळे । हेतींच बांधीलें ज्याचें तया ॥ २ ॥ नारदेंही तेंच मागीतलें दान । हेतींच बंधन पावला तो ॥ ३ ॥ ब्रह्मयाचा हेत भवानी सुंदर । अंगुष्ठें विकार आणियेला ॥ ४ ॥ शिवासीं कामाचा हेत सर्वकाळ । म्हणोनी चपळ बांधी तया ॥ ५ ॥ व्यासही तैसाची निष्काम तों नाहीं । तो पडे अपायीं नवल काण ॥ ६ ॥ बहिणी म्हणे हेत गुंतला ते ठायीं । घालीसी अपायीं सत्य मना ॥ ७ ॥

१२९ आम्ही तों निर्हेत साक्षी ऐसी येत । भोगांमाजीं चित्त क्षणूं नाहीं ॥ १ ॥ आतां मना येथें काय तुझें चाले । निर्हेत पाउलें विठोबाचीं ॥ २ ॥ मनांत पाहिलें बुद्धींत गाइलें । चित्तांत ध्याइलें विठ्ठलासी ॥ ३ ॥ वासना गाळीली सर्वही चाळीली । शांति स्थिरावली विठ्ठलीं हे ॥ ४ ॥ काम क्रोध लोभ मत्सराचें अंग । झाला पांडुरंग आपणची ॥ ५ ॥ बहिणी म्हणे मना हेतूंचा उगाणा । करूनी निर्वाणा पहातसे ॥ ६ ॥

१३० ब्रह्मचर्य आणि संन्यास घेइजे । वानप्रस्थ कीजे याचिलागीं ॥ १ ॥ निर्वासना साधे हेत हा निरसोन । विषयांचा मन वीट धरी ॥ २ ॥ योगयाग तपें व्रतें

अनुष्ठान । सेवावें अरण्य याचिलागीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे हेत विषयांचा निरसला । तरी मना तुला कोण पुसे ॥ ४ ॥

१३१ दमुनी इंद्रियें आणिला विवेक । दाखवील सुख आत्मयाचें ॥ १ ॥ मना तुझें मग काय चाले तेथं । राहे पैं निवांत आपणची ॥ २ ॥ काम तो निष्काम करील विवेक । शांतीपाशीं देख क्रोध राहे ॥ ३ ॥ लोभ तो निर्भास ठकोनी राहील । मोहारी जाळील ज्ञानानळीं ॥ ४ ॥ शुद्ध सत्त्व गुण तिन्ही अहंकार । घालील निर्धार धरीं मना ॥ ५ ॥ आशा मनसा तृष्णा इच्छा हे वासना । आधीन आपणा करील ते ॥ ६ ॥ सांगितलें तेंची इंद्रियें वर्तती । विवेकसंपत्ती ब्रह्मनिष्ठ ॥ ७ ॥ बहिणी म्हणे मना विवेक तो सार । तरी तो विचारा आत्मवंता ॥ ८ ॥

१३२ विवेक सांगातीं जयासी जोडला । थारा तो मोडला पातकांचा ॥ १ ॥ तो आम्हीं विवेक केलासे कैवारी । मना तुझी करी कोण चिंता ॥ २ ॥ विवेक वैराग्य जोडेल निश्चित । भक्ति हो अंकित विवेकाची ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मना विवेक हा खरा । तुझीया व्यापार कोण पुसे ॥ ४ ॥

१३३ विवेकें श्रवण करीन वेदांत । साधीन अद्वैत ब्रह्मनिष्ठा ॥ १ ॥ तुजपुढें बोलें हाचि पण मना । धरीं तूं धारणा आत्मयाची ॥ २ ॥ श्रवणाचें सार्थक मनन होय जाण । निज ध्यासी खूण विश्रांतीची ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मना होईं तूं सुमन । कासया भांडण होय पुढें ॥ ४ ॥

१३४ दहा इंद्रियें हीं गोंविन हरिपदीं । मग तुझी बुद्धि हरपेल ॥ १ ॥ यालागीं मना तूं इंद्रियांसमवेत । होय शरणांगत अच्युताचा ॥ २ ॥ निश्चयेंसी बुद्धि चित्त अहंकार । संकल्पें निर्धार आत्मयाचा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे होय पायीं ओळंगणा । विषयीं वासना सांडोनीया ॥ ४ ॥

१३५ मना तुझीं सर्व वाहनें हिरोनी । नेलीं तीं बांधोनी विवेकें हो ॥ १ ॥ बैसोनी हृदयीं होय तूं ध्यानस्थ । संकल्पाचा हेत वंचुनीया ॥ २ ॥ दहा इंद्रियें हीं होऊनी पारखीं । विवेकाचीं सखीं सर्व झालीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तुज रूप नाहीं नांव । मना तुझी धांव पारुषली ॥ ४ ॥

१३६ नयन गोंविले ध्यानीं केशवाचे । श्रवण हरीचे कीर्तनीं हो ॥ १ ॥ विवेकें इंद्रियां दावोनीया सुख । गोंविलीं आणीक नाठवीतां ॥ २ ॥ वाचा हे गोंविली नामसंकीर्तनीं । सेवा सुक्त पाणी केशवातें ॥ ३ ॥ पाय तीर्थयात्रा देवाच्यादर्शना । कर्मेंद्रिय-खुणा वोळखाव्या ॥ ४ ॥ दहाही इंद्रियें विवेकें गोंविलीं । मना तूं निर्बेली याचियोगें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे मना विषयसेवनीं । येती न नेमोनी टाकिलीं तीं ॥ ६ ॥

१३७ चित्त नाहीं शुद्ध जयाचें अंतर । विषयीं तत्पर सर्व काळीं ॥ १ ॥ तया ज्ञान साधे असें तों घडेना । ज्ञानावीण जाणा मोक्ष कैंचा ॥ २ ॥ नाहीं ज्या अपेक्षा साधनाची चाड । दोषाचा तो घड ओतलासे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ज्ञान संतसंगें होय । चित्त जरी राहे सदा पायीं ॥ ४ ॥

१३८ माझिया रे मना सखया सज्जना । ऐक तूं प्रार्थना विनवीतें ॥ १ ॥ सांडीं हें मीपण अहंतालक्षण । निवांत आपण सुखी राहें ॥ २ ॥ किती वण वण करीसी भ्रमण । व्यर्थ वायां शीण श्रम देहीं ॥ ३ ॥ मायामृगजलापाठीं कां लागसी । कष्ट कां भोगसी चौऱ्याशींचे ॥ ४ ॥ येणें काय हित वडों पाहे तुज । धरीं कांहीं लाज सज्जनांची ॥ ५ ॥ बहिणी म्हणे गेले संत जया वाटां । पावले ते निष्ठा सुखरूप ॥ ६६ ॥

१३९ शुक वामदेव व्यास पराशर । गेले थोर थोर जेणें पंथें ॥ १ ॥ जेणें पंथें सुखी जाले पैं निर्भय । मना तेचि सोय धरीं बापा ॥२॥ वासिष्ठ अरुंधती सनकादिक पाहें गेले लवलाहें जेणें पंथें ॥३॥ बळी बिभीषण प्रल्हाद वाल्मीक । पावले ते सुख जेणें पंथें ॥ ४ ॥ ऐसे किती सांगों चहु वर्णांतरीं । जाले ते संसारीं सुखरूप ॥ ५ ॥ बहिणी म्हणे मना धरीं रे धारणा लागलें चरणां निजभावें ॥ ६ ॥

१४० मना तूंचि माझें संचितक्रियमाण । भाग हे भोगणें सुखदुःख । तुझे-नीच मज बंध मोक्ष जाण । येऱ्हवीं पुसे कोण मजलागीं ॥ २ ॥ मी माझें हें द्वैत वाढविला विकल्प । पुण्य आणि पाप तुझे देठीं ॥ ३ ॥ निश्चलता तुज जरी हे असती । सुखदुःखप्राप्ति कोणालागीं ॥ ४ ॥ जीवशिव नामें वाढली उपाधी । तुझेनीच बुद्धि मना जाण ॥ ५ ॥ बहिणी म्हणे मना भाकीतसें करुणा । सोडवीं मज दीना काळाहातीं ॥ ६ ॥

१४१ काळ आणि वेळ घटि तास पळ । तुझेनी हें मूळ गणनेलागीं ॥ १ ॥ जेथें नाहीं काळ तेथें कैंची वेळ । उपाधीचें मूळ तूंचि मना ॥ २ ॥ अणूचें प्रमाण सुक्ष्म-ब्रह्मपणा । एवढी गणना तुझेमुळें ॥ ३ ॥ पंचमहाभूतें वर्तती आपण । चंद्रसूर्य जाण दिनमासीं ॥ ४ ॥ अवघी हे गणना ब्रह्मांडरचना । मना तुजवीण नाहीं नाहीं ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसें काळचक्र चाल । ऐसे तुझे चाळे दिसती बापा ॥६॥

१४२ मना तूं व्यापकापरीस व्यापक । ब्रह्मांड हें देख व्यापीयलें ॥ १ ॥ तेथें निज सुख कैंचें जीवालागीं । म्हणोनी तुजलागीं विनवीतसें ॥ २ ॥ जेथवरी मना फिरे तुझा वारा । तेथवरी थारा सुखा नाहीं ॥ ३ ॥ जेथवरी मना तुझा बा पसार । सुखाचा विचार तेथें नाहीं ॥ ४ ॥ तुझी कृपा होये तरी सुख लाहे । म्हणोनिया पाय धरीतसें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तुवां ठाकिलें बहुवस । तेणें कासा-वीस जीव माझा ॥ ६ ॥

१४३ विधात्याणवढा तपोनिधि होता । त्यासी त्वां तत्त्वतां ठकियेलें ॥ १ ॥ ऐसे तुझे खेळ खेळसी तूं लगट । भोगविसी कष्ट जिवांलागीं ॥ २ ॥ विष्णू ठकवोनी नारद ठकियेला । शंकराचा केला लिंगपात ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसें सांगतां अपार । मना तुझे चार कळती न ॥ ४ ॥

१४४ तुजसाठीं मना धरिती धारणा । योगमुद्रा जाणा नानापरी ॥ १ ॥ ऐसें तपोनिधी साधिती साधना । नाकळसी मना काय सांगों ॥ २ ॥ एक प्राणापान निरोधूनी द्वारें । ब्रह्मांडविवरें वायू नेती ॥ ३ ॥ उघडे बोडके जटाळ मुडके । होऊनिया मुके हिंडताती ॥ ४ ॥ एक भूमीमाजीं पुरोनिया घेती । वनीं विचरती अन्नावीण ॥५॥ बहिणी म्हणे ऐसीं नाना मतें सांग । हिंडती वैराग्यें मनासाठीं ॥६॥

१४५ तुज साधावया एकाचि कारण । फार पुण्य जया गांठीं वसे ॥ १ ॥ तेव्हां निजमन वश पें आपण । जैसें केलें जाण तैसें होय ॥ २ ॥ तपाचिया राशी वसे ज्याचे गांठीं तेव्हां मन हातीं गवसे पां ॥ १३ ॥ बहिणी म्हणे मग मन तेंचि तृण । पाहीजे कारण पुण्यप्राप्ती ॥ ४ ॥

१४६ वश मन झालें मग काय उरलें । ब्रम्हांड घातलें पालथें जेणें ॥ १ ॥ ऐसें पुण्य करा मनासी या वरा । सद्गुरूचे धरा पाय आधीं ॥ २ ॥ मन वश होतां साधनें साधितां । ब्रह्मसायुज्यता रोकडी ती ॥ ३ ॥ मन जंव नाकळे मग केविं कळे । वायांचि सोहळे साधनांचे ॥ ४ ॥ मन नाहीं ठायीं सोस वेडगा कायी । अज्ञानासी पाहीं झकवाया ॥ ५ ॥ बहिणी म्हणे येथें केलें तें आपण । जेवत्याची खूण वाढिता जाणे ॥ ६ ॥

१४७ तुजसाठीं मना जाईन येथोनी । राहीन चरणीं सद्गुरूचे ॥ १ ॥ मग तुझें काय चाले पाहें तेथें । येतां तुज तेथें हाल होती ॥२॥ तुजसाठीं मना घेईन रे सोटा । धरीन मी निष्ठा गुरूपायीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मना ब्रह्मांडासगट । भरीन तुझा घोट गुरुकृपे ॥ ४ ॥

१४८ विषयाचा लंपट जरी तूं नसतांसी । तरी मना तूशीं काय संबंध ॥ १ ॥ निज सुख मग सहज तूं आपण । साधनांचा शीण कोणासाठीं ॥२॥ सांडोनी प्रवृत्ति असतांस निवृत्ति । तरी भोगप्राप्ती कोणालागीं ॥३॥ बहिणी म्हणे मना विषयाचे संगातीं । एवढी आटाआटी करिसी जीवा ॥ ४ ॥

१४९ सद्गुरुकृपेनें साधीन तव कळा । वासना अबला दंडीन मना ॥ १ ॥ केंविलवाणें मुख करिसील मग । तुझें तूंचि सुख नेणसी घेऊं ॥ २ ॥ अनाथाची परी होईल तुजलागीं । ऐसें वितरागी करीन क्षणीं ॥३॥ बहिणी म्हणे तुझ्या सांडवीन खोडी । विवेकाची बेडी जडीन पायीं ॥ ४ ॥

१५० निंबोळियाभरें निंब बहरला सुकाळ जाहला वायसांसी ॥ १ ॥ काव-काव तेणें मदें ओरडती । परी ते नेणती चवी कैसी ॥ २ ॥ तैसें नको मना मातूं कामभरें । हित होय बरें तेंचि करीं ॥ ३ ॥ मुक्ताफळें हंस सेवीती पक्षीया । हासती ते तया काग कैसे ॥ ४ ॥ परी त्याची गोडी नेणती विचारें । मुखें अनिवार भरले फांटा ॥ ५ ॥ जो जेथें रातला तो तेथें मातला । पूर्ण ब्रह्मकळा-चवी नेणे ॥ ६ ॥ विष्ठा पैं कस्तूरी केविं ते समान । बहिणी म्हणे ज्ञान दुर्लभ हें ॥ ७ ॥

१५१ ज्याचे गांठीं फार पुण्याचे हे सांठे । मन त्याचें विटे विषयभोगीं ॥ १ ॥ मग तो दैवाचा सांगाती निजाचा । सखा तो आमुचा प्राणदाता ॥ २ ॥ आत्म-सुखालागीं सर्वस्व त्यागिलें । विरक्तीसी केलें साह्य जेणें ॥ ३ ॥ संसाराचा त्रास ज्यामनीं उपजला । निज सुखा झाला धनी तोची ॥ ४ ॥ उरलेनि प्रालब्धें आयुष्य घालवीती । स्वरूपाची स्थिति अखंडत्वें ॥५॥ बहिणी म्हणे मना सोडीं मज आतां । ब्रह्मसायुज्यता सुख देई ॥ ६ ॥

---

# ५ भक्तिपर अभंग.



१५२ भक्ति हें कारण साधन वरिष्ठ । रोकडें वैकुंठ हातीं वसे ॥ १ ॥ स्थिर करीं चित्त प्रेम अखंडित । पावसी अच्युतपद पाहें ॥ २ ॥ भक्तीपाशीं ज्ञान वैराग्य आंदण । सर्व हीं साधनें लया जाती ॥ ३ ॥ बहिणी म्हणे भक्ति विरक्तीचें मूळ । चित्त हें निश्चळ करीं बारे ॥ ४ ॥

१५३ संताचें वचनीं दृढ जया भाव । भक्ति अभिनव हेचि खरी ॥ १ ॥ सांगि-तली खूण आयके जो मनीं । पावेल निर्वाणीं तोचि एक ॥ २ ॥ संताचें वचन शास्त्राचे आधारें । भक्तिचें निर्धारें दृढ होई ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संत-पायीं जया आर्त । हाचि भक्तिपंथ वोळखावा ॥ ४ ॥

१५४ नामसंकीर्तन सर्व काळ जया । भक्तिवंत तया म्हणों आम्ही ॥ १ ॥ क्षण एक नाहीं नामाविण वाचा । सोंस हा भक्तीचा सर्वकाळ ॥ २ ॥ नेत्रीं हरि-ध्यान मुखीं तें कीर्तन । सर्वदां श्रवण मोक्षशास्त्रें ॥ ३ ॥ सेवा घडे हातीं पायीं प्रदक्षिणा । विश्रांति धारणा आत्मयाची ॥ ४ ॥ आठही प्रहर नाहीं आराणूक । संताघरीं रंक होउनी ठेला ॥ ५ ॥ बहिणी म्हणे भक्ति खरी मोक्षदा ती । पाहिजे संगतीं संतसेवा ॥ ६ ॥

१५५ जलावीण मासा जैसा तळमळी । चातक भूतळीं मेघ इच्छी ॥ १ ॥ तैसें भक्तीलागीं कळवळे मन । भक्ति हे निर्वाण तेच खरी ॥ २ ॥ एकुलता पुत्र सांपडे वैरीया । कुरंग हा ठाया पारधीचे ॥ ३ ॥ पतिव्रता पतिवियोगें तडफडी । भ्रमर प्राण सोडी पुष्पावीण ॥ ४ ॥ तृषाक्रांत जैसा इच्छित जीवन । चकोर हा जाण चंद्रामृता ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तैसी आवडे हरिभक्ति । तेव्हां चित्तवृत्ति वोळखावी ॥ ६ ॥

१५६ भक्तीविण काय वांचोनीया व्यर्थ । अंतरला स्वार्थ देखतांची ॥ १ ॥ नये त्याचें तोंड जो पाहे सर्वथा । कासयासी माता तया व्याली ॥२॥ न करी सेवन न पूजी सज्जन । न करी श्रवण मनामाजीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जया न घडे हरिभक्ति । मग त्या विरक्ति केविं साधे ॥ ४ ॥

१५७ चित्तशुद्धि होय भक्तीचेनि योगें । होईल वाउगें दृश्यजात ॥ १ ॥ वैराग्य संचरे मनामाजीं जाण । जैसें हें वमन सर्व तैसें ॥ २ ॥ विषय असत्य रोहिणीचें जळ । वाटतें सकळ भ्रांतिरूप ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जंव चित्तशुद्धि नाहीं । प्रपंच तंव कांहीं न सुटेची ॥ ४ ॥

१५८ विषयाचा संग नावडे जयासी । वैराग्य मानसीं संचरल्या ॥ १ ॥ मग काय उणें सुखालागीं तया । सर्वदा सुखीया तोचि होय ॥ २ नावडे ज्या संग स्त्रिया पुत्रधन । इंद्रियाचरण नावडेची ॥ ३ ॥ नावडे पहाणें बोलणें ऐकणें । नावडे मिष्टान्न भोग भोगूं ॥ ४ ॥ नावडे संपत्ती गणगोत कांहीं । नावडेचि देहीं अहंपण ॥ ५ ॥ बहिणी म्हणे होईल उदास मानस । प्रपंचाची आस तैंच तुटे ॥ ६ ॥

१६९ भ्रतार गांवासी गेलीयानें सतीं । भोग ते लागती विषाऐसे ॥ १ ॥ अनुताप तैसा संचरे शरीरीं । आत्मा हा अंतरीं वोळखतां ॥ २ ॥ अपूर्ण हा काम जालीया कामुका । भोग सर्व विखापरी होती ॥ ३ ॥ धनलोभियाचें धन नेतां चोरीं । क्षणही अंतरीं सुख नाहीं ॥ ४ ॥ मीन जलांतुनी काढीलीयावरी । विष सर्वोपरी होत तया ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तैसें ब्रह्मप्राप्तीविण । जाय एक क्षण युगाऐसा ॥ ६ ॥

१६० परलोक नावडे इंद्राची संपत्ती । इहलोक चित्तीं विष भासे ॥ १ ॥ तो एक विरक्त ज्ञानासी अधिकारी । ब्रह्मप्राप्ति खरी होय तया ॥ २ ॥ सर्व सिद्धि येतां घरासीं सर्वथा । नावडती चित्ता विरक्तीनें ॥ ३ ॥ रंभा तिलोत्तमा उर्वशी मेनका । नावडती एका हरीवीण ॥ ४ ॥ चंदन आगरू नाना उपचार । गमती विखार हरीविण ॥ ५ ॥ बहिणी म्हणे पूर्ण विरक्ति मानसीं । ज्ञान हें तयासी वोळंगण ॥ ६ ॥

१६१ प्रपंच असत्य कळों आला जया । विषय हे तया नावडती ॥ १ ॥ उदासीनापरी वर्ततो प्रपंचीं । आस हें मनाची सांडोनीया ॥ २ ॥ मनाचा स्वभाव संकल्प विकल्प । होय सांक्षिरूप तयांचा ही ॥ ३ ॥ बुद्धीचा निश्चय अनुसंधानीं चित्त । अहंकारीं हेत अहंतेचा ॥४॥ सर्वही मायिक व्यवहार जाणती । निश्चय अद्वैतीं ठेवोनीया ॥ ५ ॥ बहिणी म्हणे माया सत्य ना असत्य । श्रीगुरूनें तथ्य सांगितलें ॥ ६ ॥

---

# ६ सद्गुरूची थोरवी



१६२ असत्य हे माया म्हणों जातां दिसे । सत्य म्हणतां नसे ज्ञानदृष्टी ॥ १ ॥ ऐसा हा संदेह निवारी सद्गुरु । विवेकनिर्धारू करोनिया ॥ २ ॥ ब्रह्महरिहर मायेचे त्रिगुण । माया ब्रह्मीं जाण बोलों नये ॥ ३ ॥ माया काल्पनीक अकल्पित ब्रह्म । कळे न हें वर्म कोणेपरी ॥ ४ ॥ माया हे सावेव किंवा निरावेव । न कळे याचा ठाव कोणेपरी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे याचें वर्म कळावया । वोळंगावें पायां सद्गुरूच्या ॥ ६ ॥

१६३ ब्रह्मापासोनिया जाली म्हणे माया । उपाधी हे तया केवीं घडे ॥ १ ॥ करावा निवाड सद्गुरुवचनें । भेद निरसोन विकल्पाचा ॥ २ ॥ माया ब्रह्मीं नाहीं ऐसें ह्मणों जरी । स्वतंत्रता तरी म्हणों नये ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसा संदेह मायेचा । निरसी जो साचा तोचि गुरु ॥ ४ ॥

१६४ ब्रह्म तों अद्वय श्रुतीचें संमते । वेगळी माया ते म्हणों कैसी ॥ १ ॥ कोणासी पुसावें मायेचें ठिकाण । सद्गुरूवांचोन सत्य जाणा ॥ २ ॥ सुवर्णकांचन नांव मात्र भिन्न । ज्ञानें एकपण वोळखावें ॥३॥ तोय आणि तरंग भेद नाममात्र । ऐक्य हें सर्वत्र ज्ञानदृष्टी ॥ ४ ॥ सुत वस्त्र दोन्ही ऐक्यता सहजें । ज्ञानदृष्टी-बोजें पाहिलीया ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसा पहातां विवेक । सहजची ऐक्य माया-ब्रह्मीं ॥ ६ ॥

१६५ असत्य हे माया म्हणतां प्रत्यक्ष । मायेचा हा पक्ष दृश्य आघवें ॥ १ ॥ काय तें धरावें काय तें सोडावें । रहावें अनुभवें कोण्यापरी ॥ २ ॥ विधिहरिहर नाम अवतार । मायेचा बडिवार दिसतसे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे माया असत्य म्हणतां । गुणांच्या अवस्था दिसताती ॥ ४ ॥

१६६ सत्य म्हणों माया ज्ञानें निरसत । अनुभवें अद्वैत होउनी ठेलें ॥ १ ॥ सत्य म्हणों जातां नसे हे सर्वथा । आतां काय चित्ता बाध करूं ॥ २ ॥ सूर्या-पुढें काय अंधकार राहे । विवेक हा ठाये न दिसे इच्छा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सत्य म्हणों नये कदा । संत आत्मबोधा पावलीया ॥ ४ ॥

१६७ गुरुकृपा पूर्ण जयासी लाधली । माया ही निरसली तया मनीं ॥ १ ॥ येर तें अज्ञान पडीलें भ्रमणीं । संसार-जाचणी अनिवार ॥ २ ॥ जयांचा विकल्प निरसला निश्चित । तेचि ब्रह्मीभूत होउनी ठेले ॥ ३ ॥ जयांचीं वासना निमाली अंतरीं । तेचि निर्विकारी सहज जाले ॥ ४ ॥ जयांचा हा हेत निरसला देहींचा । रावो ब्रह्मांडींचा तोचि एक ॥ ५ ॥ बहिणी म्हणे काय सांगावें कवणा । मायेचा देखणा विरळा असे ॥ ६ ॥

१६८ सूर्याचिये घरीं रहाणें जयासी । अंधार तयासी स्वप्नीं नाहीं ॥ १ ॥ तैसा स्वानुभवीं देखे न तो माया । ब्रम्ह तों अद्वयानंद अंगें ॥ २ ॥ परिस तो जाणे काय सोनें लोह । निर्ममते मोह कदा नाहे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे न लागे तृषा ते जीवना । पूर्णत्वें भावना भावशुद्धी ॥ ४ ॥

१६९ सूर्याचिये अंगीं भासे मृगजळ । सूर्य तो केवळ नेणे तया ॥ १ ॥ तैसी जाण माया ब्रह्मींच आभासे । परी स्पर्श नसे ब्रह्मत्वासी ॥ २ ॥ चुंबकासंन्निध लोहासी भ्रमण । सूर्यसत्ते जन वर्ततसे ॥३॥ बहिणी म्हणे ऐसा अनुभव पाहिजे । स्वसुखीं राहीजे निरंतर ॥ ४ ॥

१७० दृश्य आणि द्रष्टा दर्शनें समवेत । ब्रह्म सदोदित सर्वकाळ ॥ १ ॥ काय घेऊं काय सांडूं कोणीकडे । अनंत ब्रह्मांडें रोमरंध्रीं ॥ २ ॥ ध्येय ध्याता ध्यान ज्ञेय ज्ञप्ति ज्ञान । साध्य तो साधन आपण झाला ॥ ३ ॥ बहिणी म्हणे द्वैत स्वप्ना-माजीं नसे । अवघाची प्रकाशे राम माझा ॥ ४ ॥

१७१ कैंची माया आणि अविद्या कल्पना । कैंची हे वासना पहातोसीं ॥ १ ॥ जगदाकार ब्रह्म अखंडित सर्व । पाहें हा अनुभव निश्चयाचा ॥ २ ॥ कैंचें मन बुद्धि कैंचा अभिमान । सर्व नारायण अंतर्बाह्य ॥ ३ ॥ बहिणी म्हणे अवघे गुणाचे विकार । ब्रह्म निर्विकार स्वयंसिद्ध ॥ ४ ॥

१७२ त्रिगुणीं हें जाण व्यापीलेंसें जग । यामाजीं श्रीरंग वेगळाची ॥ १ ॥ विश्वाकार तोची पाहे अनुभव । येथील गौरव सद्गुरु जाणे ॥ २ ॥ उफराटी दृष्टी पाहिलीयावरी । सौख्य हें अंतरीं होय तेव्हां ॥ ३ ॥ बहिणी म्हणे गुण मायेचे अंकुर । ब्रह्म परात्पर अद्वयत्वें ॥ ४ ॥

१७३ सत्त्वगुण साधी ज्ञानाचीये सिद्धी । स्थिर होय बुद्धि आत्मरूपीं ॥ १ ॥ कासया रज तम जगीं दिसें अंगीं । वाढविसी संगीं पापरूप ॥ २ ॥ काय एक

नाहीं सत्त्वगुणापासीं । पाहे तूं मानसीं आपुलीये ॥ ३ ॥ सत्त्वगुणें स्वर्ग साधेल मोक्षही । विचारोनी देहीं पाहे पां रे ॥ ४ ॥ सत्त्वगुण आणि संताची संगती । कर्मांची निवृत्ति होय तेणें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे सत्त्व मोक्षासी कारण । पाहिजे तें ज्ञान शुद्ध अंगीं ॥ ६ ॥

१७४ स्नान संध्या जप नित्य अनुष्ठान । करीं सावधान आत्मनिष्ठे ॥ १ ॥ फलाशा सांडोनी अहं करी व्यक्त । मोक्ष तो आयता असे तेथें ॥ २ ॥ स्वधर्मा-चरण आपुलाले वर्ण । यज्ञ आणि दान करीं सर्व ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसा साधील तो जरी । सत्त्व जों अंतरीं प्रवेशला ॥ ४ ॥

१७५ दुधाचिये चाडे गायीचें सेवन । आंब्याचें पालन फळांसाठीं ॥ १ ॥ तैसें कर्म करी फलाशा धरोन । रजोगुणी जाण वोळखावा ॥ २ ॥ द्राक्षाचिया मुळा । दुधाची घागरी । समर्थांचे घरीं आमंत्रणें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसी क्रिया जया-पाशीं । ज्ञान तयापाशीं नये कदा ॥ ४ ॥

१७६ वेदशास्त्र जया नाहींची प्रमाण । अशुची तो जाण अंतर्बाह्य ॥ १ ॥ तामसी तो खरा वोळखावा नर । तयासी अघोर कल्पकोटी ॥ २ ॥ वेदाचें प्रमाण । तें तें अप्रमाण । भल्यासीही मान नाहीं जेथें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसा अंगींचा दुर्जन । त्यासी संभाषण करूं नये ॥ ४ ॥

१७७ जन्मजन्मांतरीं वासनेचा भ्रष्ट । मोक्ष हा वरिष्ठ केवीं साधे ॥ १ ॥ जैसी काउळयाची अमंगळीं प्रीती । राजहंसपंक्ती कैंची तया ॥ २ ॥ कुकर्म आवडे अधर्मीं प्रवृत्ती । अंध तम छत्रीं घेत असे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे त्याचें तोंड पाहों नये । नरकाचा तो ठाये एक जाणा ॥ ४ ॥

१७८ गुणाची वागुरा मांडीलीसे जीवा । सुटेल केधवा केशीराजा ॥ १ ॥ ऐसा अनुताप होईल अंतरीं । मोक्ष होय तरी प्राणियासी ॥ २ ॥ कामक्रोधलोभ वैरी हे भोंवतें । करावी अनंतें कृपा आतां ॥ ३ ॥ बहिणी म्हणे धन्य ते एक संसारीं । पूर्ण जयांवरी गुरुकृपा ॥ ४ ॥

१७९ न लगती वेद शास्त्राचें पठण । परमार्थाची खूण वेगळीच ॥ १ ॥ सद्गुरूशीं जाईं शरण सर्वभावें । मग तूं स्वभावें ब्रह्मरूप ॥ २ ॥ न लगती तपें व्रतें अनुष्ठान । आत्मत्वाची खूण वेगळीच ॥ ३ ॥ न लगती देव तीर्थ क्षेत्र यात्रा । आगमोंच्या मंत्रा धांडोळावें ॥ ४ ॥ न लगती योग याग प्राणायाम । साधनाचें वर्म वेगळेंच ॥ ५ ॥ नलगे ब्रह्मचर्य गृहस्थ संन्यास । व्रताचे हव्यास व्यर्थ तेही ॥ ६ ॥ न लगती पंचाग्नी धूम्राचें प्राशन । आकाश वसन नलगे कांहीं ॥ ७ ॥ बहिणी म्हणे एक सद्गुरूवांचोनी । मोक्ष ना गहनीं प्राप्त होय ॥ ८ ॥

१८० शब्दाचें बोलणें दृश्य हें तोंवरीं । अदृश्य वैखरी हारपली ॥ १ ॥ तेथें हा सद्गुरु बोधील समर्थ । दाखवोनी अर्थ श्रुति शास्त्रें ॥ २ ॥ बुद्धीचें बोधक चित्ताचें चिंतन । अदृश्य हें जाण हारपलें ॥३॥ इंद्रियांचें सर्व आकारीं बोलणें । निराकारीं जाणें हारपलें ॥ ४ ॥ बहिणी म्हणे जेथें अनिर्वाच्य बोली । सद्गुरु माऊली तेची दावी ॥ ५ ॥

१८१ प्रारब्धाआधीन शरीर लागलें । आत्मत्व निराळें वेगळेंचि ॥ १ ॥ सुख-दुःख याचें नाणावें अंतरीं । पूर्ण साक्षात्कारी स्थिर राहे ॥ २ ॥ बहिणी म्हणे त्याचें सांगेन विंदान । सद्गुरुचरण पाहें पां रे ॥ ३ ॥

१८२ पिंड ब्रह्मांडासी करोनी ऐक्यता । होय या-परता साक्षीरूप ॥ १ ॥ सर्व तूंचि होसी सर्वांही वेगळा । ऐसी साध कळा सद्गुरुमुखें ॥ २ ॥ हिंग हिरण्यासी ऐक्य करोनिया । जाय तूं अद्वया ब्रह्मपदा ॥ ३ ॥ आशा तृष्णा माया एकरूप दोन्ही । करोनिया जनीं वर्ते सुखें ॥४॥ सर्वही प्रपंच ऐक्यतेसी आणी । तूंचि जनीं वनीं होउनी राहें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे सर्व हारपली मुळी । तें रूप न्याहाळी ज्ञानदृष्टी ॥ ६ ॥

१८३ काळे-गोरेपण धुतलिया जाय । दाहकपण काय अग्नि सांडी ॥ १ ॥ तैसें तें प्राक्तन न सोडी सर्वथा । ज्ञानियाच्या माथा साट वाजे ॥ २ ॥ शीतलता उदक काय सांडी गुण । चंचलत्व मन कांवें सांडी ॥३॥ बहिणी म्हणे याचें होईल निरसन । सद्गुरुचरण पाहलीया ॥ ४ ॥

१८४ गुरू अवघे जाले उपदेश मांडिले । सद्गुरुकृपेचा न कळे महिमा कोणासी ॥ १ ॥ नानापरीचें ज्ञानध्यान । सांगती जपतपानुष्ठान । परि तें सद्गुरुलक्षण अगम्य जाणा वो ॥ २ ॥ आगमनिगमधारी । एक तें जारणाधिकारी । चुकोनी जाले वैरी । देवाचे कैसे ॥३॥ नाना मंत्र उपासना । सांगती ते यंत्रधारणा । परी ते सद्गुरुचरणा । न पावती कोणी ॥४॥ बहिणी म्हणे आतां काया । जतन कां करावी वायां । भजावें श्रीगुरूच्या पायां । सर्वही सिद्धि रे ॥ ५ ॥

१८५ गुरुपरंपरा आम्हां चैतन्य बळी । तयाचें स्मरणें आम्ही वैकुंठीं बळी ॥१॥ नमस्कार हा तया साष्टांग माझा । वोवाळूं जीवें साधू चैतन्य राजा ॥ २ ॥ चैतन्य हा सर्वगत व्यापक सद्गुरू । प्रगटला हा 'तुकाराम'-वेषें दातारू ॥ ३ ॥ तयाचें हें ध्यान सदा माझीये अंतरीं । अंतरींचें ध्यान 'तुका' सबाह्याभ्यंतरीं ॥४॥ मेणे स्नान दान जप आसन मुद्रा । सदा सर्व काळ ध्याऊं चैतन्यपदां ॥ ५ ॥ बहिणी म्हणे मुक्त आम्ही सद्गुरूचे ध्यानें । प्रेमें भक्ति-भावें तया वोवाळूं प्राणें ॥ ६ ॥

१८६ आतां सद्गुरु स्वामी राणा । माझिया प्राणा ॥ ध्रु ॥ । ठेविन मी मस्तक त्याचे चरणीं । लावील मज स्मरणीं । ध्याईन मी निश्चल अंतःकरणीं । निज-

---

१ हें पद असून याला चाल 'रामदासी पदाची' असें मुळांत म्हटलें आहे (संग्राहक)

दाविल नयनीं ॥ १ ॥ ज्याचें दर्शनीं द्वैत निरसे । माया न स्पर्शे । अमृतवृष्टि ज्यावरि वर्षे । आनंदें हर्षे ॥ २ ॥ खंती वाटे त्याची मजगे । किती सांगूं मी तुज गे । सांगल मुक्तीचें बीज गे । बहिणी म्हणे मग गे ॥ ३ ॥

---

# ७ अनुतापपर अभंग.



१८७ अनुताप-अग्नि लागला अंतरीं । आतां कृपा करीं जगन्नाथा ॥१॥ तापत्रयें फार पीडिलें शरीर । नलगे संसार स्वर्ग तोही ॥२॥ पेटलीं इंद्रियें धडाडीत अंगें । कृपा करी वेगें पांडुरंगा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सुख तेंचि झालें दुःख । ऐसा हा विवेक संचरला ॥ ४ ॥

१८८ पाहें परतोन मी हा येथें कोण । देह तोही जाण नाशिवंत ॥ १ ॥ इंद्रियाचरण होतसे कैसेनीं । सृष्टीचा तो धनी कोण येथें ॥ २ ॥ पृथ्वी आप तेज वायू हें गगन । सर्वही निर्माण जाले कोठें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे याचा करावया शोध । होउनी सावध विचारिजे ॥ ४ ॥

१८९ आपुलीये मनीं विचारोनी सर्व । पुसावया ठाव पहातसे ॥ १ ॥ जेथें पुसे तेथें संदेह तुटेना । करी स्थिर मना कोण ऐसा ॥ २ ॥ शास्त्रासीं पुसावें थोडें तों आयुष्य । कर्म तें अवश्य कर्मीं गोंवी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसी चिंता-साधकासी । कैशी भवपाशीं मुक्त होऊं ॥ ४ ॥

१९० जेथें पुसों जावें तेथें अभिमान । आपुलेंची ज्ञान प्रतिष्ठी तो ॥१॥ जाणोनि अंतरीं न सांगेची कोणी । कोणाचे वचनीं स्थिर राहों ॥ २ ॥ लय हें लक्षण सांगती धारणा । नाना उपासना नाना मंत्र ॥३॥ एक ते सांगती पंच मुद्रा जप । येवें खटाटोप आसनाचा ॥ ४ ॥ एक ते सांगती तीर्थ तप व्रत । एक ते अनंत पूजाविधी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे आतां नव्हे स्थिर मन । जेथें तेथें रण अविद्येचें ॥ ६ ॥

१९१ कामाचे विकिले क्रोधाचे जिंकिले । लोभाचे अंकिले सर्व भावें ॥ १ ॥ तयांसी पुसतां काय देती सुख । अंतरीं विवेक नाहीं जयां ॥ २ ॥ आशेलागीं जयां आंदण दिधलें । ममतेचे जाले सेवक ते ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तेचि ग्रासीले मायेनें । आम्हां सोडवणें केवीं होती ॥ ४ ॥

१९२ दुजीयाच्या दुःखें शिणे ज्याचें चित्त । तोचि एक संत वोळखावा ॥ १ ॥ तयासी पुसतां हरील तो शीण । दुःख घे हिरोन रोकडेंची ॥ २ ॥ परोपकार जया

जालासे विभागी । शांती हे सर्वांगीं डोलतसे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे नाहीं आपुलें पारिखें । वर्ततो विवेकें ज्ञानदृष्टी ॥ ४ ॥

१९३ चंदन सर्वांगें झिजोनियां जाय । जेणेंपरी होय तोष प्राण्या ॥ १ ॥ तैसे साधु जन मनें वाचें कायें । सुख देतां मोहे उदासीन ॥ २ ॥ उदक तें जैसें संतोषवी जनां । उपकार तो तृण आदि करुनी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संतीं अवतार घेतले । जनहित केलें सर्व परीं ॥ ४ ॥

१९४ अनुतापें विरक्त होईल मानस । विषयाचा ध्यास तुटेल तैं ॥ १ ॥ वाटेल जें चित्ता नावडती जन्म । इंद्रियासी नेम होय तेव्हां ॥ २ ॥ स्वर्ग संसाराची तुटेल आवडी । होय देशोधडी काम क्रोध ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसें होय जैं अंतर । तैंच तेथें वर सद्गुरूचा ॥ ४ ॥

१९५ इहलोक सत्य मानितांचि जाण । आली नागवण घरामाजीं ॥१॥ निश्चय विवेक करुनी निर्धार । शाश्वत हें सार घेई मूढा ॥ २ ॥ इहलोक पहातां क्षणांतचि नासे । येथीलं हव्यास धरूं नको ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देह प्रपंच असत्य । मनांतील तथ्य सांगितलें ॥ ४ ॥

१९६ असत्य प्रपंच म्हणोनी सांडिसी । नागवण परियेसीं तेही बापा ॥ १ ॥ असत्याचि सत्य साधला जाणीजे । विवेक पाहिजे आपुलीया ॥ २ ॥ असत्य शरीर तयाचेनि जाण । साधिती निर्वाण ब्रम्हनिष्ठ ॥ ३ ॥ सोहागीं असत्य परी एकवटी सोनें । लोखंड भूषणें घडवीत ॥ ४ ॥ नाग तो विखार सेवितां तो हित । महाविषें मृत्यु न बाधिती ॥५॥ बहिणी म्हणे सत्य असत्याचि साधे । सद्गुरुचिया बोधें वर्तलीया ॥ ६ ॥

१९७ आणिलें उसनें पांचांचें शरीर । साधावया सार मोक्षपंथ ॥ १ ॥ येथें तुवां जरी मांडिला आळस । होईल तरी नाश स्वहिताचा ॥ २ ॥ भाड्याचिये घोडे करोनि आणिले । पाहिजे साधिलें कार्य त्वरें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ज्याचें नेईल तो धनी । होईल ते हानि स्वहिताची ॥ ४ ॥

१९८ पृथ्वी आप तेज वायु आणि नभु । ब्रह्मांडीं स्वयंभु वर्तती ते ॥१॥ आणियेले अंश नांव करावया । भव तारावया स्वहित ते ॥ २ ॥ अस्थिमांसत्वचा नाडी आणि रोम । पांच हे उत्तम धरित्रीचे ॥ ३ ॥ लाळा मूत्र स्वेद शुक्र हें शोणीत । आणिले हे सत्य उदकाचे ॥ ४ ॥ क्षुधा तृषा निद्रा आलस्य मैथुन । मागीलले गुण तेजापाशीं ॥ ५ ॥ चलनवलन अकुंचन निरोधन । प्रसरण हे जाण वायूपाशीं ॥ ६ ॥ राग द्वेष भय लज्जा मोह पाहे । निःसंदेह गुण हे पांचापाशीं ॥७ ॥ ऐसे हे पांचांचे गुण पंचवीस । आणीले सायास करोनिया ॥ ८ ॥ शंभर वर्षांचा करोनीया नेम । आणिले उत्तम गुण तिन्हीं ॥ ९ ॥ चाऱ्ही वेदयासी आउलें ठाविलें ।

बळीसी दिधलें बलिदान ॥ १० ॥ बहिणी म्हणे नाम भवसिंधुतारक । निर्मिलें अनेक जीवमात्रें ॥ ११ ॥

१९९ सत्वाचिये धाटी घालुनी चालिली । ते जाण पावली स्वर्ग लोका ॥ १ ॥ चिंतिलिये ठायास जाइजे चिंतितां । हित तें तत्त्वतां विचारावें ॥२॥ रजाचिये धाटी चालीयेलें जरी । भूलोकाभीतरीं पाववी ते॥३॥तमोगुणी धाटी घालोनी चालिली । अधोगती गेली तेचि नाव ॥ ४ ॥ शुद्ध सत्त्वीं नाव लोटलीया जाण । पावती निर्वाण ब्रह्मपदीं ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तारी मारी नांव हेंची । वासना जयाची तयापरी ॥ ६ ॥

२०० सत्य सत्य श्रुति धर्मासी चालवी । तापसी तो दैवी संपत्तीचा ॥ १ ॥ तो जाय स्वर्गासी सत्याचिया बळें । त्यजोनी सकळ कर्मपंथा ॥ २ ॥ दयाक्षमा भूतकृपा जयापाशीं । निष्कामता तैसी शुद्ध बुद्ध ॥ ३ ॥ निश्चय सबल अंगीं जया धैर्य । वचनीं माधुर्य अवंचक ॥ ४ ॥ संतोषी सर्वदां नुलंघोनी वेद । अंतरीं आनंद सर्वकाळ ॥ ५ ॥ संतांची संगती सद्गुरुसेवन । नाहीं दुजेपण जयामध्यें ॥ ६ ॥ वैराग्यीं वर्तत प्रपंच्याचा साक्षी । आलियांचें रक्षी चित्त जो कां ॥ ७ ॥ बहिणी म्हणे ऐसा स्वर्गा जाय नर । आत्मज्ञानशूर जाय मोक्षा ॥ ८ ॥

२०१ कर्म करी देहीं धरोनी फलाशा । द्वैताचा वळसा जयापाशीं ॥ १ ॥ तयासी हा जाण प्राप्त मृत्यु लोक । रजोगुणी एक वोळखावा ॥ २ ॥ गर्व जयापाशीं क्रोध सर्वकाळ । निद्रा ते जवळ ठेविलीसे ॥ ३ ॥ मोहाचीये माळा सर्वकाळ कंठीं । परस्त्रिया दृष्टीं न्याहाळीत ॥ ४ ॥ आलियानें घरां इंद्राची संपत्ती । समाधान चित्तीं नाहीं जया ॥ ५ ॥ पापिया निष्ठुर विषयांचा ध्यास । जया अविश्वास सर्वकाळ ॥ ६ ॥ चुंबक निंदक भूतमात्रीं द्रोह । नाहीं निःसंदेह चित्त ज्याचें ॥ ७ ॥ बहिणी म्हणे ऐसा वर्ते जो मानसीं । मृत्युलोकीं त्यासी जन्म घेणें ॥ ८ ॥

२०२ विधिहीन वर्ते वेदांसी न मानी । श्रेष्ठ अव्हेरोनी वर्ततसे ॥ १ ॥ तया दुर्जनाची नर्कयोनीं जन्म । जाणावा अधम तमोगुणी ॥ २ ॥ करितसे घात विश्वास देउनी । हिंसक अवगुणी मंदबुद्धि ॥ ३ ॥ अखाद्य-भक्षण अच्योष्य-चोषण अपेयाचें पान सुखें जया ॥ ४ ॥ न धरीं भय मनीं नर्कांचिये बीज । वर्तणें सहज पापबुद्धि ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसा जाणा तमोगुणीं ॥ ५ ॥ पडेल पतनीं हीनमती ॥ ६ ॥

२०३ त्रिगुणाचें जाण शरीर ओतलें । देहीं क्रिया चाले गुणापरी ॥ १ ॥ म्हणोनिया साक्षी होय तूं गुणाचा । मग तुज कैचा द्वैतभाव ॥२॥ त्रिगुणाचें भय ब्रह्मादिकां असे । त्रिगुणाचे फांसे घातकी हे ॥ ३ ॥ त्रिगुण सांकळी जीवासी जडली ।

तयाचेनी झाली बाधकता ॥ ४ ॥ त्रिगुणाचा सर्प झोंबला जयासी । मरण तयांसी साच आलें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे गुण निवारील ऐसे । एक कृपा वसे सद्गुरूची ॥ ६ ॥

२०४ त्रिगुणापरतें आहे तेंची एक । भावने भावीक जाणती ते ॥ १ ॥ सर्वां-मार्जी असे सर्वांही वेगळे । इंद्रियां नाकळे अखंडत्वें ॥ २ ॥ दृश्य म्हणो तरी न दिसेची डोळां । नाहीं तो आगळा भास याचा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे नाहीं नामरूप गुण । सर्वांठायीं पूर्ण सदोदित ॥ ४ ॥

२०५ जाला वासनेचा अंत । तेंचि जाणावें ललीत ॥ १ ॥ ऐसें जाणती सज्जन । साक्षी जया आलें मन ॥ २ ॥ आला विषयांचा त्रास । पुढें जाले सावकाश ॥ ३ ॥ चित्त झालें पाठमोरें । एक आपुल्या निर्धारें ॥ ४ ॥ ज्ञानें जाळिलें संचित । हेत राहिला निवांत ॥ ५ ॥ बहिणी म्हणे स्थिर बुद्धि । हेचि अखंड समाधि ॥ ६ ॥

२०६ रूप नसोनिया डोळियांसी दिसे । तेजही प्रकाशें नेत्रांमार्जी ॥ १ ॥ तें रूप चोरटें ओळखें बा चित्ता । बुद्धीचा आरुता पैस जेथें ॥ २ ॥ सगुण निर्गुण लक्षातीत वस्तु । जाला तेथ अस्तु इंद्रियांचा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे शब्दीं न सांपडे तरी । शब्द त्या भीतरीं अंतर्बाह्य ॥ ४ ॥

२०७ पृथ्वीचा तो गंध उदकींचा रस । तेजामार्जी अंश आत्मयाचा ॥ १ ॥ परी तो न दिसे ज्ञानचक्षूवीण । पाहिजे अंजन गुरु-कृपा ॥ २ ॥ वायूमार्जी ज्याचें वसतसें रूप । नभीं असें दीप आत्मयाचा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सर्व सर्वांही आगळा । ज्ञानाचिया डोळां पाहें पां रे ॥ ४ ॥

२०८ पहावया जातां पहाणेंची सरे । विज्ञान तें विरे जयांमार्जी ॥ १ ॥ तें रूप डोळीया पाहतां न दिसे । जयाचेनी अंशें श्रेष्ठाश्रेष्ठ ॥ २ ॥ लक्षूं जातां लक्ष हारपलें जेथें । परेचाही प्रांत तेथ जाला ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तेथें व्यवहार राहिला । जे वेळीं पाहिला देवराणा ॥ ४ ॥

२०९ बोध-नंद बुद्धि- यशोदा गोकुळीं । जन्म झाला कुळीं गवळीयाचे ॥ १ ॥ तें रूप सांवळें पहा डोळेभरीं । बाह्य अभ्यंतरीं ओतप्रोत ॥२ ॥ नवविध नवमास पूर्ण जाले तेथ । कृष्ण अखंडित जन्मला तो ॥ ३ ॥ बहिणी म्हणे रूप सांवळें सुकुमार । राक्षसांचा भार उतरिला ॥ ४ ॥

२१० आकाशींचा सूर्य जळांत बिंबला । तरी काय बुडाला तयामार्जी ॥ १ ॥ तैसा या शरीरीं अलिप्तचि असें । इंद्रियसमरसें असोनिया ॥ २ ॥ चुंबकदर्शनें लोखंडा चलन । आत्मा देहीं जाण तैसा असें ॥ ३ ॥ पूर्ण चंद्र होतां सिंधूसी भरतें । तैसा देह वर्ते आत्मयानें ॥ ४ ॥ आलिया वसंत येती पुष्पें फळें

तैसा देह चळे आत्मसत्ता ॥ ५ ॥ बहिणी म्हणे आत्मा सर्वांही अतीत । अनुभवें पदार्थ सर्व कळे ॥ ६ ॥

२११ कोणे ठायीं असे कोणे ठायीं नसे । ऐसें तो मानसें चोजवेना ॥ १ ॥ यालागीं सद्गुरु बोलती जें भावें । आत्मा तो स्वभावें कळावया ॥ २ ॥ कोण याचें गांव कोण याचा ठाव । न कळे स्वयमेव काय धरूं ॥ ३ ॥ कोण याचें कुळ कोण याचें स्थळ । कवळायासी बळ कळेचिना ॥ ४ ॥ कोण याची माता कोण याचा पिता । अमूकची तत्त्वतां कोण जाणे ॥ ५ ॥ बहिणी म्हणे कोणा पुसों याची कथा । ऐसें विवंचितां कल्प गेले ॥ ६ ॥

२१२ सत्य म्हणतां माया ज्ञानें लया जाय । असत्य तरी नोहे कदा काळीं ॥ १ ॥ जाणती अनुभव ज्ञान दृष्टिरूप । मायेचें अमूप रूप वाढे ॥२ ॥ आकरलें जें जें मायिक तें खरें । शब्द तो निर्धारें मायारूप ॥ ३ ॥ ज्ञान तेंही माया ध्यान तें मायाचि । मायेवीण कैंची दृष्टि वाढे ॥ ४ ॥ जोंवरी हें द्वैत मनामाजीं वसे । तोंवरी मायांशें लोकत्रय ॥ ५ ॥ बहिणी म्हणे माया लटकी म्हणों भेदी । करोनी वेदादी पहा बरें ॥ ६ ॥

२१३ घट भंगलियावरी नभ नभाचे भीतरीं । तैसा देह गेलियानें । जीव शिव मिथ्या बाणे ॥ १ ॥ जळ आटलियावरी । प्रतिबिंबा कैंची उरी ॥२॥ बहिणी म्हणे भासे द्वैत । जाण उपाधीनें येथ ॥ ३ ॥

२१४ चालतां पाऊल पंढरीच्या वाटे । ब्रह्मसुख भेटे रोकडेंची ॥ १ ॥ दिंडी ध्वजा भार चालती अपार । मृदंग–गंभीर–स्वरश्रुति ॥२॥ हमामा हुंबरी घालिती परवडी । होवोनी उघडी विष्णुदास ॥३॥ बहिणी म्हणे ऐसा आनंद वाटेचा । कोण तो दैवाचा देखे डोळां ॥ ४ ॥

---

# ८ संतवर्णनपर अभंग.



२१५ गर्व जयापाशीं नाहीं अणुमात्र । सर्वांगें पवित्र संतवृत्ति ॥ १ ॥ तेचि एक साधु तारितील जन । भ्रांतीसी हिरोन ज्ञान देती ॥ २ ॥ अंतर्बाह्य शुद्ध सूर्याचिये परी । ज्ञान कर्में करी बाह्यात्कारें ॥ ३ ॥ रत्न कीं कर्पूर शुद्ध अंतर्बाह्य मनांतील गुह्य सांग जनीं ॥ ४ ॥ कृपा जयापाशीं होउनी आंदण । आनंदीं निमग्न सदा राहे ॥ ५ ॥ बहिणी म्हणे मनीं भूतकृपा पूर्ण । तेचि वोळखण संतजनां ॥ ६ ॥

२१६ तीर्थें इच्छितातीं तया साधुजनां । पुण्याची गणना कोण करी ॥ १ ॥ ब्रह्मरूप स्वयें तारावया जन । अवतार घेवोन येथें आले ॥ २ ॥ ब्रह्मादिका देव इच्छितातीं भेटी । अमृताची वृष्टि क्रिया तैसी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ज्यांचें बोलणें सहज । वेदांतींचें बीज हातीं वसे ॥ ४ ॥

२१७ गंगेच्या प्रवाहा सागरींच गति । बोलतातीं श्रुति ब्रह्मवरी ॥ १ ॥ तैसी जाण बुद्धि चाले तेचिवरी । निश्चय शिखरीं विरुनी जाये ॥ २ ॥ पतिव्रते काम वाढे तो भ्रतारीं । सूर्य तो अंबरीं प्रभा दावी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तैसें संतांचें बोलणें । साक्षात्कार मनें होय जीवा ॥ ४ ॥

२१८ सहज स्वभावें गोडी ते अमृतीं । पुष्पीं जाण अद्भुती अंगींच जो ॥ १ ॥ तैसा तो स्वभाव क्रिया जे वर्तत । वेद मूर्तिमंत आकारला ॥ २ ॥ परिसाचा गुण अंगीं साच खरा । रत्न गार हिरा सूर्य जैसा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तैसी सहज. अंगीं शांति । संतांची संपत्ति सर्व कर्म ॥ ४ ॥

२१९ संतां असंतांचें शरीर सारिखें । भिन्नत्व वोळखें क्रियेपाशीं ॥ १ ॥ काय सांगों फळ दोहींचें वेगळें । जाणत्यासी कळे ज्ञानदृष्टी ॥ २ ॥ परिस आणि गार सारिखें स्वरूप । तेल आणि तूप पाहें पां रे ॥ ३ ॥ कांच आणि मणि पहातां समान । अंतरींचा गुण भिन्न असे ॥ ४ ॥ खरें आणि खोटें सारिखेंची नाणें । ताक दूध गुणें वेगळेंची ॥ ५ ॥ बहिणी म्हणे मैंद साधु वोळखून । पुढें त्याचे गुण अंगीकारीं ॥ ६ ॥

२२० संतसंगें शुद्ध होय चित्तवृत्ति । लागेल प्रवृत्ति संतसंगें ॥ १ ॥ यालागीं तयाचें करावें दासत्व । तेणें निजतत्त्व सांपडेल ॥ २ ॥ संतसंगें दोष नासतील सर्व । संतसंगें गर्व जाईल तो ॥ ३ ॥ संतसंगें तुज सांपडेल निज । संतसंगें गुज प्रगट होय ॥ ४ ॥ संतसंगें दृष्टि पडेल स्वरूपीं । संतसंगें स्वल्पीं मोक्ष जोडे ॥ ५ बहिणी म्हणे संग धरावा निःसंग । साधनाचें अंग कळे तेव्हां ॥ ५ ॥

२२१ संतसंगें होय वैराग्य मनासी । देईल शांतीसी संतसंग ॥ १ ॥ संत सकलांचे शिरोमणि थोर । पाहिजे निर्धार एकनिष्ठ ॥ २ ॥ संत संगें ज्ञान विज्ञान ठसावें । संतसंगें होये सुख देहीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संतसंगाचा विचार । जाणती निःसार भक्तिवंत ॥ ४ ॥

२२२ संत महावैद्य भवरोग फेडीती । सांगेन ते गति ऐक त्यांची ॥ १ ॥ अर्ध मात्रा रस देउनिया जीव । रोग दूरी सर्व करिताती ॥ २ ॥ विषयाचा त्याग सांगोनिया पथ्य । भाव यथा तथ्य सेवविती ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसें जाणोनी अंतर । तैसाची प्रकार प्रेरिताती ॥ ४ ॥

२२३ चंदनाचा संग लाधलीया वृक्ष । तैसोचि प्रत्यक्ष होती जाणा ॥ १ ॥ तैसी ही संगति साधूची जालीया । संत आपसया होती जीव ॥ २ ॥ गांवींचा ओहोळ मिळलीया गंगे । गंगारूप संगें होय जैसा ॥ ३ ॥ परिसाचा संग जालीयानें लोह । होय तें विदेह सुवर्णची ॥ ४ ॥ वातीसी लाधला दीपकाचा संग । प्रकाश अभंग साध्य तया॥५॥ बहिणी म्हणे संग सज्जनाचा करी । तोचि रे संसारीं धन्य एक ॥ ६ ॥

२२४ दुर्जनाचे संगें दुर्जनची होय । पाहें अभिप्राय सहज तो ॥ १ ॥ हिंगाची संगति लाधली कापुरा । स्वगुण तो खरा हारपला ॥२॥ तक्राचे संगतीं नासलें तें दूध । भांग करी मुग्ध जीव क्षणीं ॥३॥ बहिणी म्हणे संग आपुलेंसें करी । म्हणोनी विचारीं साधुजनां ॥ ४ ॥

२२५ वोळखोनी करीं संग तूं निर्धारीं । सुख तें अंतरीं पात्रशील ॥ १ ॥ हा जाण निर्धार विवेकाची युक्ति । न धरावीं आसक्ति मनामाजीं ॥ २ ॥ सुपंथ जाणोनी सज्जनाचे संगें । पावसी सर्वांगें आनंदातें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे शास्त्र केलें याचिलागीं । कळावया जगीं मार्गामार्ग ॥ ४ ॥

२२६ संतसंगतीचा महिमा अद्भुत । होती ज्ञानवंत सत्वगुणी ॥ १ ॥ यालागीं सेवावे संतांचे चरण । स्थिर होय मन एक क्षण ॥ २ ॥ संतांचें बोलणें एकतांचि कानीं । ब्रह्मरूप क्षणीं होय सर्व ॥ ३ ॥ बाहिणी म्हणे संतदर्शनेंचि मोक्ष । अनुभव प्रत्यक्ष पाहें याचा ॥ ४ ॥

२२७ तीर्थें हिंडलिया काय होय फळ । अंतर निर्मळ नाहीं जंव ॥१॥ यालागीं निर्मळ होय चित्त येणें । संतांचें दर्शन घेतलीया ॥२॥ पाषाणप्रतिमा काय बोलतील । सुख हें देतील काय चित्ता ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ज्याचे वचनीं निःसंदेह । होईल विदेह रोकडाची ॥ ४ ॥

२२८ प्रपंचीं असोन प्रपंचा अतीत । करताती संत सर्व कर्म ॥ १ ॥ यालागीं सेवावे संतांचे चरण । मोक्षासी कारण एक हेंची ॥ २ ॥ तक्रांतील लोणी न

मिळेचि पुन: । वेगळ्याची गुणां आंत आलें ॥ ३ ॥ पद्मिणीचें पत्र न मिळे उद-कांत । असतांही तेथ जन्मवरी ॥ ४ ॥ बहिणी म्हणे तैसें प्रपंचीं असोन । न बाधी खूण साधूपाशीं ॥ ५ ॥

२२९ संतकृपा झाली । इमारत फळा आली ॥ १ ॥ ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिलें देवालया ॥ २ ॥ नामा तयाचा किंकर । तेणें रचिलें तें आवार ॥ ३ ॥ जनार्दन एकनाथ । खांब दिधला भागवत ॥ ४॥ तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ॥ ५ ॥ बहिणी म्हणे फडकती ध्वजा । निरूपणां केलें वोजा ॥ ६ ॥

२३० संत होती खरे भवार्णवीं तारू । जाणती उतारू प्राणियाचा ॥ १ ॥ कांसे लाविताती निष्ठेचिया बळें । नेती ते कृपाळ पैल तीरा ॥ २ ॥ नामाची सांगडी बांधोनी बळकट । दावितातीं तट सायुज्याचे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मागें उतरिले बहुत । येणेंपरी संत तारू खरे ॥ ४ ॥

२३१ एका मतें संत धन्वंतरी जाण । मंत्रवादी पूर्ण भासताती ॥ १ ॥ वांच-विलें जीव सर्पदृष्टीपासाव । सामर्थ्य अपूर्व वाटतसे ॥ २ ॥ पंचमुखी अहि विष ज्या झोंबलें । लहरी येती बळें नानाविध ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संत बघतीं ज्याकडे । विष त्याचें झडे नवल मोठें ॥ ४ ॥

२३२ संतांपाशीं असे ज्ञानाची निजशक्ति । अज्ञाननिवृत्ति होय तेणें ॥ १ ॥ यालागीं संतासी जावें लोटांगणीं । रिघावें शरण मनोभावें ॥ २ ॥ संतांचिये कृपे विषयमळ-नाश । सांपडे अविनाश परब्रह्म ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संत देव हे प्रत्यक्ष । कां न घेशी साक्ष मनामाजीं ॥४॥

२३३ संतसंगें योग संतसंगें याग । संत संगें प्रयोग जोडे मना ॥ १ ॥ या-लागीं आवडी धरावी संतांची । प्रत्यक्ष मोक्षाची वाट होचि॥२॥संतसंगें तीर्थ संत-संगें क्षेत्र । संत संगमंत्र सिद्धि जोडे ॥३॥ बहिणी म्हणे संतसंगें जोडे ज्ञान । संत-संगें मन स्थिर होये ॥ ४ ॥

२३४ संत देखतां दृष्टी । वृत्ति जाली उफराटी । हारपल्या अवघ्या गोष्टी । पडिलें मौन ॥ १ ॥ दृश्याचें लोपलें भान । द्वैताचें उठलें ठाण । ब्रह्मानंदसुखें गगन । भरोनी ठेलें ॥ २ ॥ मनासी जाहले ठकें । डोळीयां पडलें टकें । देखानि अखंड एक । स्वरूप डोळां ॥ ३ ॥ शब्द निःशब्द झाला । निवृत्तीसी सामावला । सुम-नाचा ध्यास तुटला । जयाचे ठायीं ॥ ४ ॥ बहिणिसि लाधतां संतसंग । संतप्रेमा अंतरंग । सकळाचा होऊनी भंग । अखंड ठेली ॥ ५ ॥

२३५ आजि माझा जन्म सफल गे माये । संतसज्जनांचे देखियले पाये ॥ त्यांचे चरणरजें देहभार जाये । सुख हे होय अनिवार ॥ १ ॥ आजि माझें भाग्य

---

१ चांगल्या रीतानें; सहज. २ तटस्थपणा. ३ एकाग्र दृष्टि.

फळासी आलें । साधुसंतांचे पाय देखिले । सप्रेम या देहीं दाटलें । सुख सुखावलें सहजची ॥ २ ॥ एकपणें होतें अनेक झालें । पहातां विश्वाकार विस्तारलें । वटबीजन्यायें कैसें विरूढलें । सर्व होउनी ठेलें माझी मीच ॥ ३ ॥ आलें गेलें अवधान नाथिला भ्रम । आजवरी प्रकृतीनें केला हा धर्म । रज्जुसर्पन्यायें मिथ्या जाला भ्रम । देखतां चरणरज नाचे बाहिणी म्हणे तणें अहंपण माझें । संसारदुःख उतरिलें वोझें । तुकाराम भेटला धन्य जिणें माझें । कृतकृत्य जालें सहजची ॥ ४ ॥

---

# ९ बोधपर अभंग

२३६ पांचांचें उसनें घेऊनी शरीर । आलासी तें सार ब्रह्म साधीं ॥१॥ कासया काबाड वाहतोसी ओझें । लटिकें तें तुझें नोहें जाण ॥ २ ॥ अस्थि मांस त्वचा नाडी आणि रोम । ज्याचें त्यांसी वर्म समर्पावें ॥ ३ ॥ लाळ मुत्र स्वेद शुक्र हें शोणित । आपाचेच सत्य गुण पांच ॥ ४ ॥ क्षुधा तृषा निद्रा आळस मैथुन । तेजाचे हे गुण जाण पांच ॥ ५ ॥ धावन वळण निरोधाकुंचन । पांच गुण जाण वायूचे हे ॥६॥ राग द्वेष भय लज्जा आणि मोह । पांच गुण होय आकाशाचे॥७॥ ऐसे हे पंचवीस पांचांचे आणून । ब्रह्मप्राप्ति जाण साधीं बा रे ॥८॥ ऐसें हें शरीर घेऊनी आलासी । साधीं आत्मयासी येथें बापा ॥९॥ बहिणी म्हणे नको भुलों त्या अनित्या । वोळखोनी सत्या राहें पां रे ॥ १० ॥

२३७ शरीर असत्य पहातां विवेकें । त्याचीं सुखदुःखें कोण मानी ॥ १ ॥ सत्य हा निर्धार ज्ञानियांचें मत । आकळीं शाश्वत चित्त ज्याचें ॥ २ ॥ प्रापंचिक सर्व असत्य व्यवहार । लाभालाभ फार कोण मानी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जेथें त्रिपुटीच नाहीं । प्रारब्ध तें काई तेथें सत्य ॥ ४ ॥

२३८ आकार विकार निमाला विचार । एक निरंतर निर्विकल्प ॥ १ ॥ त्वंपद तत्पद असि पदातीत । अनादि अनंत अरूप तें ॥ २ ॥ ज्ञान ना अज्ञान अभाव ना भाव । आनंदासी ठाव मूळ नसे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जो हा इतुका तितुका । तूंचि सर्व लोकां अंतर्बाह्य ॥ ४ ॥

---

१ नाहीसा केला.

२३९ मरण न यो म्हणतो । रे! नर मरण न यो म्हणतो । स्वानुभविक सुख जया तोंही विषयाशीं रमतो ॥ १ ॥ स्त्री सुत धन दुहिता प्रिय ज्यासी भ्रमर जसा भ्रमतो । आवड मान प्रतिष्ठा लौकिक येथेंची जो रमतो ॥ २ ॥ राज्यसुखीं रति आर्त मूर्छना कामीं लुब्धक तो । जो व्यसनप्रिय मद्यपर स्त्रीलंपट तामस तो ॥३॥ वांच्छित इंद्रपद प्रमदा सुख त्यास्तव याज्ञिक तो । बहिणी म्हणे अरे ये स्थितिचा नर मृत्युभयासि भितो ॥ ४ ॥

२४० मृत्यु भया न भीं रे । ज्ञानी मृत्युभया न भीं रे । सिंधुवरी जसे बुडबुडे येती त्या वातें विलयो रे ॥ १ मायिक सर्व प्रपंच मिथ्या कैंचा त्या प्रळयो । स्वप्न जैसें प्रतिभासत मिथ्या देह तदन्वयो रे ॥ २ ॥ घृत जैसें थिजलें विघुरे मग तेंचि पुन्हा घट होये । हेमाचे नग आटुनि हेमचि काय तयासि भये रे ॥३॥ बहिणी म्हणे निज अनुभव ज्यासी, द्वैत तेथें न यो रे । देह पडो अथवा न पडो । अनुभवी परि ब्रह्मिंच त्यासि लयो रे॥ ४ ॥

२४१ थोरपणा दूरीं टाकोनिया जाण । संतांसी शरण जाय वेगीं ॥ १ ॥ तुझी सर्व चिंता हरील चित्ताची । स्थिरता मनाची होय तरी ॥ २ ॥ सर्वभावें शरण रिघतां संतांसी । ज्ञानाभिमानासी टाकोनीया ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संत दया-निधि खरे । चित्ताचे निर्धारें सेवीं बापा ॥ ४ ॥

२४२ योगयाग भोगत्याग देहासी दंडन । जपतप अनुष्ठान नामाविण विटंबन ॥ १ ॥ तें हें जपा नाम तुम्ही सुखाचें निधान । हरती भवयातना तुटेल जिवाचें बंधन ॥ २ ॥ उपास पारणें जरि ते जाले नग्न मौनी । पंचाग्नी धूम्रपानी मिथ्या अवघे नामाविण ॥ ३ ॥बहिणी म्हणे नाम नाहीं ज्याचें मुखीं । नातळावें त्यासीं सत्य जाणावा सुतकी ॥ ४ ॥

२४३ जरी झाला भाग्यवंत । धन धान्य संपन्न अद्भुत । भगवंतीं न ज्याचें चित्त । तरि तो यथार्थ सुतकी ॥१॥ न वंजावें त्याचे घरां । नातळावें घरदारां । जळो त्याची द्रव्यदारा । पापी खरा सुतकी ॥ २ ॥ कन्यापुत्रकनकसंपन्न । सोयरेधायरे धनवंत जाणें । भगवंतीं जयाचें विमुखपण । तरी तो जाण सुतकी ॥ ३ ॥ जरी जाले वेदपंडित । शास्त्राभ्यासी तत्त्वार्थ । भगवंतीं न ज्याचें चित्त । तरी तो यथार्थ सुतकी ॥ ४ ॥ जरी जाले ज्ञानी महानुभाव । पूर्णपणें देखिला देव । नामपाठीं ज्यासी अभाव । त्या नांव तरी सुतकी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे निवृत्ति कारण । नामपाठीं ठेविलें मन । हरावया देहदोष जाण । हरिकीर्तन करीं तसें ॥६॥

२४४ नलगे ध्यावें सोंग टोपी-मुद्रा-धारण । भक्तिही कारण असों द्यावी ॥ १ ॥ तेथें सर्व सिद्धि नांदती स्वभावें । आपुल्या दैवें ध्यावें येथें ॥ २ ॥नलगे योगयाग नलगे भोगत्याग । असावा अनुराग भक्तिसवें ॥ ३ ॥ नलगे जप तप दान

---

१ जाणें

तीर्थाटनें । भक्ति असो देणें एक गांठीं ॥ ४ ॥ नलगे ज्ञान ध्यान हिंडणें पैं मग्न । भक्तिसीया मन असों द्यावें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे आम्हां भक्ति तेचि मुक्ति । ऐशा वेदश्रुति गर्जतांती ॥ ६ ॥

२४५ जव्हेरियापाशीं न चले खोटें कुडें । तैसें संतांपुढें मन मग ॥ १ ॥ आपणाचि कळे भल्याचीं लक्षणें । नलगे पुसणें येरयेरां ॥ २ ॥ मन मुरोनिया जें वर्तणूक । आपणाचि देख उमटे अंगीं ॥ ३ ॥ दया क्षमा शांति डोलती सर्वांगीं । नुरे उपभोगीं वासना ती ॥ ४ ॥ भागलीया ढोरा भेटे पाणी छाया । मुरकुंडी त्या ठायां मिठी मारी ॥ ५ ॥ मारितां ढळेना उठावितां उठेना । बहिणी म्हणे जाणा तैसें सुख ॥ ६ ॥

२४६ गुरु ते जाणावे समुद्रासारिखे । कदाकाळीं देखें नुचंबळती ॥ १ ॥ ऐसे ते जाणावे सद्गुरु व्यवहारें । कल्पांतीं न सरे निजधन ॥ २ ॥ संत ते जाणावे धैर्य-मेरूपारे । पडतां नभ वरी ढळतीना ॥ ३ ॥ संत ते जाणावे प्रेमाचे सागर । उदार गंभीर ज्ञानघन ॥ ४ ॥ संत ते जाणावे पूर्ण वेदमूर्ति । कर्मब्रह्मस्थिति ठसावली ॥ ५ ॥ संत ते जाणावे वैराग्यविरक्ति । लवही आसक्ति विषयीं नाहीं ॥ ६ ॥ संत ते जाणावे उदासीनवृत्ति । द्वंद्वातीतमूर्ति लीनरूपी ॥ ७ ॥ संत ते जाणावे क्षमेचे सागर । दयेचे आगर शांतिरूपें ॥ ८ ॥ भूतकृपा वसे ब्रह्म सर्व असे । संत ते मानसें वोळखावे ॥ ९ ॥ तीर्थं देव यात्रा करिती उत्सव । तेचि संत राव कलीमाजीं ॥ १० ॥ आहारीं व्यवहारीं इंद्रियाचे द्वारीं । युक्त जे निर्धारीं तेचि संत ॥ ११ ॥ बहिणी म्हणे ऐसी गुरूची पारखी । शोधोनिया सुखी होय शिष्य ॥ १२ ॥

२४७ स्वरूपस्थितीचें ज्ञान । वेगळें तें लक्षण । पहावें पैं आत्मज्ञान । स्वरुप-स्थिति ॥ १ ॥ पंचीकरण महावाक्य । पहावें उपनिषद्भाग । स्वरूपस्थितीचें पैं अंग । कळेल तेव्हां ॥ २ ॥ धरावी हे उपासना । आठवावें नारायणा । न सोडावें गुरुचरणा । साधन हेंचि साधा ॥ ३ ॥ नित्य हें सारावें कर्म । जया जैसा वर्णधर्म । नैमित्तिक सारावा रेम[1] । स्वरुपस्थिती ॥४॥ बहिणी म्हणे शांति क्षमा । वोळावी भूतकृपा जाणा । दया पाहिजे करुणा । भगवंत तोची ॥ ५ ॥

२४८ वरि वरि वेष संताचा । भीतरीं धुमसं[2] इंद्रियांचा ॥ १ ॥ ऐसे संत जाले कलीं । बोले बोल तो न पाळी ॥ २ ॥ सभा देखोनी धरी मौन । एऱ्हवीं भुंके जैसें श्वान ॥ ३ ॥ तोंड देखोनी बरवें बोले । जगामागें झोंड चाले ॥४॥ बहिणी म्हणे हे भांड । यांसी कोठें व्याली रांड ॥ ५ ॥

२४९ लटिकेंच अवतणें जेविलीया सांच । तयाचा विश्वास काय खरा ॥ १ ॥ ऐसें शब्दज्ञान सांगती उदंड । करणीचे लंड मतवादी ॥२॥ कळसूत्री घोडे बाहुलें

---

१ राम हाच आत्माराम असें अद्वैत भावानें पाहणें. २ सत्य स्वरूप; चाळा.

नाचती । काय ते झुंजती कलीमाजीं ॥ ३ ॥ दशअवतारी दाखविती सोंगें । काय होती अंगें रामकृष्ण ॥ ४ ॥ बहिणी म्हणे तैसें लटकियाचें जिणें । दिसें लाजिरवाणें बोलतांची ॥ ५ ॥

२५० सद्गुरूचें नाम नाहीं जया मुखीं । जाणावा तो सुतकी सर्वकाळ ॥ १ ॥ ऐसे ते जाणावे गुरुद्रोही अभक्त । केला तो परमार्थ जाय वायां ॥ २ ॥ सद्गुरूचा महिमा न बोले जो वाचे । पूर्वज तयाचे अधोमुख ॥ ३ ॥ सद्गुरुपदाचें न करी स्मरण । जाणावें तें श्वान जन्मा आलें ॥ ४ ॥ कुलगुरु देव विद्या, जो शिकवी । त्यासी जो नाठवी अन्यबीज ॥ ५ ॥ मातापिता आणि सद्गुरु भय हर्ता त्यासी नाठवितां पातकी तो ॥ ६ ॥ जातिविजातींचा गुरु असो कोणी । लोपी जो या जनीं हत्या त्यासी ॥७॥ बहिणी म्हणे आम्हां गुरु 'तुकाराम' । सदा नाचों प्रेमगीतीं गातां ॥८॥

२५१ असावें स्वधर्मीं जाणावें तें वर्म । जेणें ब्रह्मकर्म हातीं वसे ॥१॥ तेव्हां तें आतुडे ब्रह्म सर्वगत । भूतीं भगवंत सर्व होय ॥ २ ॥ कर्म आणि ब्रह्म वेगळें न भासे । तया कर्म दिसे ब्रह्मरूप ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ब्रह्म बळेंचि भावितां । कर्म अधःपाता घाली देखा ॥ ४ ॥

२५२ वेदासी विरुद्ध म्हणे आत्मज्ञानी । पडला तो पतनीं रौरवाचे ॥ १ ॥ ऐसे ते चांडाळ पडों नये दृष्टी । ज्याचेनीही कष्टी उभय कुळें ॥ २ ॥ वेदासी विरुद्ध असतां सर्वथा । अनर्थ परमार्था हाचि एकु ॥ ३ ॥ बहिणी म्हणे त्याचें जळो आत्मज्ञान । त्यानें नारायण वैरी केला ॥ ४ ॥

२५३ कर्म ज्ञानोपासना करिती त्रिकांड । चालीला प्रचंड भक्तीवरी ॥ १ ॥ ऐसा हा अनुभव जाणते जाणती । तया पुनरावृत्ति नाहीं नाहीं ॥ २ ॥ भक्ति आणि ज्ञान वैराग्य विज्ञान । कर्म ब्रह्म पण वेद बोले ॥ ३ ॥ ब्रह्मचर्य आणि गृहस्थ वानप्रस्थ । सन्यास चतुर्थ वेदांवरी ॥ ४ गुरु शास्त्र आणि तिसरी आत्म प्रचीति । चालिल्या विरक्ति वेदामाजीं ॥ ५ ॥ बहिणी म्हणे जया वेद मान्य जाला । ब्रह्मीं होऊन ठेला तोचि एक ॥ ६ ॥

२५४ साधक तें कर्म साधावें तें ब्रह्म । दोहींचाही धर्म वेदांमाजीं ॥ १ ॥ ऐसी ज्याची क्रिया तोचि ब्रह्म जाणा । ब्राह्मण या नामा म्हणती बापा ॥२॥ साध्य आणि साधन साधितां हे तिन्ही । अवघे देवाचेनी बळीवंत ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देव ॐकार सर्वांचा । तेथेंचि वेदांचा प्रसार दिसे ॥ ४ ॥

२५५ पृथ्वी आप तेज वायू पैं गगन । विस्तार हा जाण वेदान्वयें ॥ १ ॥ अणूचें प्रमाण नाहीं वेदावीण । एवढें ब्रह्मज्ञान वसे कोठें ॥ २ ॥ एकवीस स्वर्ग

दश दिशा पाताळ । अवघाचि भूगोल वेद जाणा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे वेद सर्वांचें हें मूळ । स्वरुप केवळ वेद होय ॥ ४ ॥

२५६ जीं हीं या वेदाचा केला मानभंग । नव्हे तोचि मांग ब्रह्मज्ञानी ॥ १ ॥ दोहींकडे तया जाली नागवणी । पाडिलें पतनीं जन्मोजन्मीं ॥ २ ॥ वरी जग दंभ दावी लोकाचार । भीतरीं साचार मांग जैसा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे याचें न घडावें दर्शन । घडतां पैं पतन रोकडेंचि ॥ ४ ॥

२५७ विषय ब्रह्मरूप तेव्हां सत्य होती । जैं लाभें आत्मस्थिति स्वस्वरूपीं तेव्हां तो जाणावा आत्मनिष्ठ खरा । नातळे विकारा देहबुद्धि ॥ २ ॥ इच्छा मावळेल अहंता गळेल । वासना विरेल स्वस्वरूपीं ॥ ३ ॥ जिव्हाउपस्थांचा पडे ज्या विसरू । इंद्रिय व्यापारू पारुषेल ॥ ४ ॥ बहिणी म्हणे वृत्ति पावेल जैं निवृत्ति । विषय तेव्हां होती ब्रह्मरूप ॥ ५ ॥

२५८ आगम तो कैसा विचारोनी पाहे । सद्गुरूचे पाय धरोनिया ॥१॥ गुरुकृपेंविण साधसी आगम । तरी तो दुर्गम होय तुज ॥ २ ॥ सत्रावीचें जीवन तें प्रथम जाण । द्वितीयेची खूण इंद्रियशुद्धि ॥ ३ ॥ मनःशुद्धि तेचि तृतीय पैं जाण । सोहंमंत्रज्ञान चतुर्थ तें ॥ ४ ॥ पंचम तें जाण पांचवी अवस्था । जावें मोक्षपंथा भोगोनीया ॥ ५ ॥ सत्य सांगितला आगम तो हाची । न चुके येथींची वर्म खूण ॥ ६ ॥ रसनाविषयावरी ठेवुनिया चित्त । आगमीं म्हणवीत जना माजीं ॥ ७ ॥ वर्म चुकोनिया आचरती आपण । जनां म्हणती सुगम मार्ग हाची ॥ ८ ॥ ते न गुरु म्हणा सत्य वेदवाणी । वेदबाह्य करणी काय काज ॥ ९ ॥ आगमी जाणे तो आगमाची कळा । इतर गोंधळालागीं करिती ॥१० ॥ बहिणी म्हणे साधीं गुरुवचनें आगमे । नाहीं तरी श्रम पावशील ॥ ११ ॥

२५९ कोणी एक म्हणती मायाचि प्रमाण । ऐसें हें वचन नायकावें ॥ १ ॥ होईं सावधान पाहें निरखून । सांगतां हें मन घालीं बरें ॥ २ ॥ समब्रह्म म्हणती करिती संकर । ऐसे ते पामर जाणा येथें ॥ ३ ॥ विषयसुखभुक्ति मानताती मुक्ति । तोचि जाणा चित्तीं पापदेही ॥ ४ ॥ माता आणि भगिनी स्वपत्नीसमान । ऐसें एक ज्ञान पतनवाटी ॥ ५ ॥ अवघें ब्रह्म जेथें कैंचा धर्म तेथें । आचरती मतें चांडाळाचीं ॥ ६ ॥ मद्यमांस एका पूजनीं प्रमाण । सत्कर्माची आण असे तया ॥ ७ ॥ अधर्म अकर्म अनाचार पाहें । जयासी हा आहे कुल-धर्म ॥ ८ ॥ रजस्वला मांगी दैवत जयाचें । ऐसें या कलीचें ज्ञान पाहें ॥ ९ ॥ सत्याचा कंटाळा हिंसेचा पसारा । कंटक तो खरा विष्णुदास ॥ १० ॥ वरि टिळे माळा नाम उच्चारीती । लौकिक राखिती मैंद जैसे ॥ ११ ॥ बहिणी म्हणे ऐसे जाणावें ते लंड । पाहों नये तोंड स्वप्नीं त्यांचें ॥ १२ ॥

२६० सूर्याचीया योगें वर्तत हें जन । लागे त्यासी कोण क्रिया त्यांची ॥ १ ॥

तैसा जाण आत्मा करुनि अनात्मा । वोळखावें चित्तामाजीं संतीं ॥ २
भ्रामका देखोनी लोहासी चलन । भ्रामकासी शीण काय त्याचा ॥ १ ॥ चं
देखोनिया समुद्र उल्हासे । सोम तो आकाशीं वेगळाची ॥ ४ ॥ बहिणी म्ह
पंचकारणां वेगळा । जाणती ते कळा संत कोणी ॥ ५ ॥

२६१ जळामाजों जवीं कमलिनीपत्र । असोनी एकत्र लिप्त नव्हे ॥ १ ॥ तै
देहीं जाण आत्मा सर्वगत । परी तो निश्चित वेगळाची ॥ २ ॥ तक्रामाजीं जै
लोणीयाचा वास । परी तो तयास वेगळाच ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जैसा काष्टामा
अग्न । परी तया भिन्न जाण तैसा ॥ ४ ॥

२६२ घटमठ नाम मात्र । व्योम व्यापक सर्वत्र ॥ १ ॥ तैसा विश्वीं विश्वंभ
वोळखिजे परात्पर ॥ २ ॥ पट पहातां तो भिन्न । तंतु तयाचे अभिन्न ॥ ३
अलंकारीं भेद होती । सोनें सर्वांतरीं निश्चितीं ॥ ३ ॥ वापी-कूप-तडागांत । र
एकच निवांत ॥ ४ ॥ बाहिणी म्हणे भेदभान । अभेदाचे नारायण ॥ ५ ॥

२६३ गुळाविण कैंची गोडी । जाणों येईल आवडी ॥ १ ॥ तैसा देव भावेंविण
कैसा जाणावा आपण ॥ २ ॥ पुष्पाविण न कळे वास । त्याचें ज्ञान पडे वोस ॥३
बहिणी म्हणे जगीं देव । वोळखावा स्वयमेव ॥ ४ ॥

२६४ जन तोचि जनार्दन । ऐसें श्रुतीचें वचन ॥१॥ म्हणवोनी जनीं आहे । ते
विवेकें तूं पाहें ॥२॥ चंदनाचें खोडीं । आहे सुगंध-परवडी॥३॥ बहिणी म्हणे ज
रस । तंतूमध्यें जी कापूस ॥ ४ ॥

२६५ मृगजळें तृषा हरे । हीं तो वाउगीं उत्तरें ॥१॥ तैसें नासविती देव । मा
लिया ज्ञाना वाव ॥ २ ॥ चित्रांतील रवी । भावें अंधारें उगवी ॥३॥ बहिणी म्ह
दृश्य जाये । तेथें कैचा देव राहे ॥ ४ ॥

२६६ देव न लभे तानमानें । शब्दज्ञानें सर्वथा ॥ १ ॥ संतसमागमाविण
नारायण साधेना ॥ २ ॥ देव नलभे तीर्थयात्रीं । कुरुक्षेत्रीं हिंडतां ॥ ३ ॥ बहि
म्हणे वर्म थोडे । मूर्ख वेडे जाणेना ॥ ४ ॥

२६७ संतसमागमें राहे । त्यासी काय उणें होये ॥ १ ॥ पाहिजे तें निष्ठाबळ
हेंची अढळ मानसीं ॥ २ ॥ संत केवळ विज्ञान । निज खूण दाविती ॥ ३
बहिणी म्हणे संतापाशीं । सिद्धि दासी कामाच्या ॥ ४ ॥

२६८ मोक्ष संताच्या वचनें । प्राप्त क्षणें तो होय ॥१॥ परि तुवां काया-वाच
करीं साचा संकल्प ॥ २ ॥ मागसी ते देती संत । क्षणार्धांत पैं एका ॥ ३
बहिणी म्हणे बाते संत । हाचि अर्थ वेदाचा ॥ ४ ॥

२६९ संत पूर्ण कृपानिधि । स्थिरबुद्धि स्वरूपीं ॥ १ ॥ साच वो
खावें चिन्ह । दया पूर्ण भूतांची ॥ २ ॥ संत सदा तृप्त मनीं । अनुसंधानीं सर्व
॥ ३ ॥ बहिणी म्हणे परोपकारी । दीनावरी कृपाळू ॥ ४ ॥

२७० संतुष्ट मानसीं सदा सर्वकाळ। हृदय निर्मळ जैसी गंगा ॥ १ ॥ संत ते जाणावे ब्रह्मप्राप्तीलागीं। धन्य तोचि जगीं शरण त्यांसी ॥ २ ॥ सर्व भूतीं बुद्धि समान सारिखी। आपुली पारखी चिंतूं नेणें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे द्वैत हारपूनी गेलें। अद्वैत बिंबलें ब्रह्म डोळां ॥ ४ ॥

२७१ आपुलिया दुःखें जैसे होती क्लेश। दुजिया चित्तास तोचि परी ॥ १ ॥ ऐसे जे जाणती आपुले मानसीं। संत निश्चयेंसी वोळखावे ॥ २ ॥ पराविया सुखें सुख मानी मनीं। देखें वनीं जनीं जनार्दन ॥ ३ ॥ कापुराचें जैसें अंतर्बाह्य शुद्ध। किंवा तें प्रसिद्ध रत्न जैसें ॥ ४ ॥ तैसें ज्याचें चित्त सारिखें सर्वदां। संत तयां वदा सर्वभावें ॥ ५ ॥ सूर्याचिये अंगीं जैसा नाहीं मळ। चंदनीं निश्चळ धृति जैसी ॥ ६ ॥ बहिणी म्हणे पूर्ण ब्रह्म निर्विकार। तोचि हे साकार संत जाणा ॥ ७ ॥

२७२ अमृतासी कोण घालील भोजन। किंवा पांघरुण गगना त्या ॥ १ ॥ ज्याचें तोचि जाणे आपुलें महिमान। इतरांसी दूषण जाणावया ॥ २ ॥ कुबेराचें कोण फेडील दारिद्र्य। किंवा तो समुद्रतृषा हरी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सूर्य प्रकाशील कोण। पृथ्वीसी तुलना केवीं घडे ॥ ४ ॥

२७३ एकपत्नीव्रत चालाविलें रामें। यया अनुक्रमें ब्रह्मनिष्ठा ॥ १ ॥ ज्याचें तया शोभे इतरा अलभ्य। जाणती हा गर्भ आत्मवेत्ते ॥ २ ॥ परद्वारीं कृष्ण लीलावेषधारी। भोगुनिया नारी अभोक्ता तो ॥ ३ ॥ साठ खंड्या भक्षी दुर्वास ब्राह्मण। निराहारी पूर्ण ब्रह्मवेत्ता ॥ ४ ॥ क्रोधाचें माहेर देखा तो जमदग्नि। ब्रह्मनिष्ठ जनीं त्यास साजे ॥ ५ ॥ बहिणी म्हणे कळी लाविजे नारदें। ब्रह्मनिष्ठ बोधें निश्चयाचा ॥ ६ ॥

२७४ त्रैलोक्य हिंडोनी भागली विरक्ति। फार तिची शक्ति हीन झाली ॥ १ ॥ मग तिचा केला अंगिकार संतीं। तेणें त्या महती थोर आली ॥ २ ॥ भक्तिही शीणली कोणी अंगिकारा। न करिती निर्धारा कळों आलें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे धृती नाहीं तिसी ठाव। सांडोनिया गर्व आली येथें ॥ ४ ॥

२७५ जपी तपी वृती मौन्यें अनुष्ठानीं। साधिती पंचाग्नि धूम्रपान ॥ १ ॥ ऐसे नाना क्लेशें पीडिती शरीर। परि निर्विकार चिंता नव्हे ॥ २ ॥ वायो साधुनिया निरोधिती पान। षड्चक्र भेदोन आसनींते ॥ ३ ॥ बहिणी म्हणे शुष्क शरीर करोनी। एक पर्णाशनी निराहारी ॥ ४ ॥

२७६ निर्विकार नोहे चित्त देवतीर्थीं। हिंडलेती क्षिती जरी नाना ॥ १ ॥ संतसमागमें शुद्ध होय चित्त। वासना विरक्त क्षणीं होये ॥ २ ॥ निर्विकार नोहे चित्त_

कर्मामाजीं । गायी गज वाजी दिधलीया ॥ ३ ॥ बहिणी म्हणे याचे वर्म संतसंगें । कळतसे अंगीं साधनाचे ॥ ४ ॥

२७७ तीर्थे केलियानें स्नानें देहमळ। नासती सकळ निश्चयेंसी ॥ १ ॥ परी मनोमळा नाश नव्हे जाण। श्रीगुरुवचन सत्य सत्य ॥२॥ प्रतिमा पूजीली देहदंड जाला। सार्थकाला आला देह त्याचा ॥३॥ बहिणी म्हणे मन शुद्ध निर्विकार। होईल निर्धार गुरुकृपे ॥ ४ ॥

२७८ चित्तासी विवेक वैराग्य यावया । ज्ञान साधावया मूळ हेंचि ॥१॥ सद्गुरुहस्त मस्तकीं घेशील । तरी पावशील ब्रह्मपद ॥२॥ सर्वत्र समान ब्रह्म परिपूर्ण। व्यापक चैतन्य तैंच होय ॥३॥ बहिणी म्हणे चित्त स्थिर तैंच घडे । ब्रह्मत्व आतुडे रोकडेंची ॥ ४॥

२७९ सद्गुरुवचना करीं अमृतपान । जन्ममृत्यु जाण नासतील ॥ १ ॥ होशील तूं अमर स्वामी इंद्रियांचा । मनें काया वाचा शरण जाईं ॥२॥ सद्गुरूचें तीर्थ अमृताची वाटी । नित्य सेवीं तुटी नको आणूं ॥३॥ बहिणी म्हणे जीवीं होशील संतुष्ट । सद्गुरु वरिष्ठ पूजिलीया ॥४॥

२८० काजळासारिखी कस्तुरीही काळी । गुणें ती वेगळी आपुलीया ॥ १ ॥ जाणता तो जाणे दोहींचा तो पारखी । सगुण विवेकें ज्ञानवंत ॥ २ ॥ तक्र आणि दूध वर्णे ते समान । परि गुण भिन्न भिन्न त्याचे ॥३॥ बहिणी म्हणे गारा पारिस हे शुभ्र नीर आणि अभ्र सारिखेची ॥ ४ ॥

२८१ आपुलें कल्याण इच्छिणें जयासी । तेणें या नामासी विसंबूं नये ॥ १ ॥ करील मनोंचे परीपूर्ण हेत । पाहिजे हें चित्त नामापाशीं ॥ २ ॥ भुक्ति आणि मुक्ति जोडतील सिद्धि । होईल गा वृद्धि अपरिमित ॥ ३ ॥ बहिणी म्हणे पाहा जपोनिया नाम । पुरतील काम जो जो हेत ॥ ४ ॥

२८२ भाजी घेणार केळ्याचा ! काढा मागतो केळाचा ॥ १ ॥ मूर्ख तो न विचारी चित्तीं । मनीं इच्छितसे मुक्ति ॥ २ ॥ तुळा पुरुष गाजराचा । मागे लक्षी वैकुंठींचा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे भाबांवला । मूर्ख जनाचिया बोला ॥ ४ ॥

२८३ मायेची निवृत्ति केली जंव नाहीं । आत्मतत्त्व ठायीं पडे कैसें ॥ १ ॥ यालागीं सद्गुरु सेवीति सज्ञान । मायेचें निरसन करावया ॥ २ ॥ द्वैताचा हरास केला जंव नाहीं । आत्मतत्त्व ठायीं पडे केवीं ॥ ३ ॥ कल्पनेचा ठाव पुसिला जंव नाहीं । आत्मतत्त्व ठायीं पडे केवीं ॥ ४ ॥ भ्रांतीचें हें स्थान छेदिलें जंव नाहीं । आत्मतत्त्वठायीं पडे केवीं ॥ ५ ॥ देहींचा अहंकार गेला जंव नाहीं । आत्मतत्त्व ठायीं पडे केवीं ॥ ६ ॥ बहिणी म्हणे ज्ञान साधिलें जंव नाहीं । आत्मतत्त्व ठायीं पडे केवीं ॥ ७ ॥

---

१ सापडे. २ भाजीपाला विकत घेण्याबदल दाणे घालतात ते. ३ नाश.

२८४ कर्ममार्ग एक भक्तिमार्ग दुजा । अभ्यास तो तिजा वोळखावा ॥१॥ साधावें स्वहित आत्म-अनुभव । सुखाची राणीव करीं भोगीं ॥ २ ॥ एक तो हटयोग दुसरा विषयत्याग । तिसरा विषयमार्ग वोळखावा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे आत्मा साधितो हा मार्ग । सांगितला सांग आत्मप्राप्ति ॥ ४ ॥

२८५ अचेतन कर्म सचेतन ब्रह्म । वोळखीजे धर्म दोहींचाही ॥ १ ॥ मग तो ब्रह्मज्ञ बोलिजे निश्चित । सावधान चित्त सर्वकाळ ॥ २ ॥ मन बुद्धि चित्त अहंकार सर्व । वोळखुनी पूर्व कर्म करीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे कर्म कर्तव्य वोळखे । ब्राह्मण विवेकें वोळखीजे ॥ ४ ॥

२८६ श्रीबीजसंयुक्त पांडुरंग-मंत्र । जपतां पवित्र महा पापी ॥ १ ॥ नाहीं या संदेह पहा वेद शास्त्र । गुह्य हें सर्वत्र सांगितलें ॥ २ ॥ पाठिमोरा देव होईल सन्मुख । अंतरींचें दुःख निवारील ॥ ३ ॥ पापाचे पर्वत क्षणें एक होती दग्ध । ज्ञानाचा उद्बोध होय चित्तीं ॥ ४ ॥ बहिणी म्हणे नका पाहूं रिद्धि-सिद्धींसी । जपितां तयासी फळे आधीं ॥ ५ ॥

२८७ एकांतीं आसन घालुनीया शिव । ब्रह्मादिक देव ध्याती जया ॥ १ ॥ ते पाय आले चंद्रभागे तीरीं । पहा डोळेभरी एक वेळां ॥ २ ॥ असंख्यात जन्म केलें अनुष्ठान । न कळे ब्रह्मज्ञान झालें कायी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे पायीं सर्वांची उत्पत्ति । अंतीं सांठवती भूतमात्र ॥ ४ ॥

२८८ आश्रमाचें धर्म चालविल्यावरी । शुद्ध ते अंतरीं चित्त होय ॥ १ ॥ तेणेंचि वैराग्य मनासीं ठसावें । श्रवण मनन होये मोक्ष तया ॥ २ ॥ आश्रमाचे योगें सर्व सिद्धि घरां । होईल अंतरां एकनिष्ठ ॥ ३ ॥ बहिणी म्हणे नव्हे काय या आश्रमीं । पाहिजे स्वधर्म एकनिष्ठ ॥ ४ ॥

२८९ कलियुगीं घोर पाप हें खतेलें । स्वधर्म सांडिलें चहूंवर्णीं ॥ १ ॥ बळी पैं मोहाचें माहात्म्य वा जेथें । गुरुशिष्य तेथें एक होती ॥२॥ धनाचिया चाडें पुराण-पठण । वेदांतश्रवण धनालागीं ॥ ३ ॥ दाटोनिया एक देती उपदेश । धरोनिया सोस कांचनाचा ॥ ४ ॥ वेदाज्ञेंकरूनी न करी स्वहित । न होती अतीत देहाहूनी ॥ ५ ॥ एक स्त्रियालागीं उपदेश करिती । अंतरीं लोलुपती रतिसुखा ॥ ६ ॥ बहिणी म्हणे त्यांचें नका घेऊं नाम । मुखीं स्मरा राम सर्वकाळ ॥ ७ ॥

२९० सर्पाचे सारिखा दोर आहे जरी । देखियेल्यावरी सर्प झाला ॥ १ ॥ तोचि निश्चयानें पाहिलीयावरी । वस्तु तेचि खरी वस्तुरूप ॥ २ ॥ शिंपला झगमगी रूपेंचि वाटतें । मृगजळें भरतें भूमंडळ ॥ ३ ॥ स्तंभ हा पुरुष नये निश्चयेंसी । खोटी मुद्रा जैसी खरी वाटे ॥ ४ ॥ कर्णीचें रत्न देखियेलें डोळां । साराविला निळा काच भूमी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसा ज्ञानेंच हरास । साधन तें त्यास विवेकाचें ॥ ६ ॥

---

१ राज्य. २ चकचकित.

# १० निवृत्तिपर अभंग.



२९१ अष्टधा प्रकृति त्याचि या गोपिका । अष्ट भाव देखा गोपाळ हे ॥ १ ॥ क्रीडती गोकुळीं सदा या शरीरीं ।स्वानंद निर्भरीं परमानंदें ॥ २ ॥ इंद्रियगोधनें विषय तृणचरे । दुभती अपारें निजसत्त्वें ॥ ३ ॥ गोरसाचे डेरे अखंड संचले । सुखें सुखावले स्वानुभवें ॥ ४ ॥ तेणें सुखानंदें नाचती गोपाळ । करिती गदारोळ गोपिका त्या ॥ ५ ॥ बहिणी म्हणे जेथें कृष्णाचा अवतार । तेथें व्यभिचार स्वप्नीं नाहीं ॥ ५ ॥

२९२ गौळणीरंगणीं परब्रह्म खेळतो । गोमयीं रुळतो बाळकृष्ण ॥ १ ॥ क्षीरसागरींचें सुख सांडोनी परतें । अनुसरला येथें भक्तीलागीं ॥ २ ॥ नवल हें आवडी न कळे निजवर्म । वेडावलें ब्रह्म भक्तीलागीं ॥ ३ ॥ अश्वमेधादिक यज्ञाचे आड ते । न पाहे तयातें आळुमाळा ॥ ४ ॥ तो हा गोपाळाकरींचें उचिष्ट । अन्न खावया लागून वाट पाहे ॥ ५ ॥ वेदश्रुति वर्णितां न घेचि पैं चित्तीं । श्रमलीया म्हणती नेति नेति ॥ ६ ॥ बहिणी म्हण फुका सांपडला हरी । प्रेमसूत्र दोरी गळां लावूं ॥ ७ ॥

२९३ गौळणीबाळा देखीयला डोळा । गोविंद सांवळा बाईयांनो ॥ १ ॥ वेधलीसे वृत्ति लागली हे स्थिति । गोरसा हा चित्तीं विसरल्या ॥ २ ॥ माझा हरि घ्या हो माझा हरि घ्या वो । अंतरींचा भावो पालटला ॥ ३ ॥ शरीर भावाच्या पडिल्या विसरी । गोरसासी हरि म्हणताती ॥ ४ ॥ हरीच्या ह्या कैशा पडियल्या छंदीं । हिंडली बिदोबिदीं बाजारेंसी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे जया गोरसाची भूक । तया हरीचें सुख काय कळे ॥ ६ ॥

२९४ देह घट लवंडोन रिता केला । निजज्ञानें पाणीया भरियला ॥ १ ॥ कैसी चाले ठमकत बाहे बाळा । अंतरी प्रेमकळा वेगळीच ॥ २ ॥ ज्ञानगंगे यमुने भरी पाणी । ऊर्ध्वदृष्टी लक्षीतां चक्रपाणि ॥ ३ ॥ सोहं दुडी वाहोनी चाले थीर । मी-तूंपण मोकळे दोन्ही कर ॥ ४ ॥ सुखरूपीं लागली निज गोडी । तेणें घरचा अहंकाररांजण फोडी ॥ ५ ॥ ऐशा करितां बहुत येरझारा । जोंवरी या शरीरीं प्रारब्धाचा ॥ ६ ॥ सारवोनिया वाच्यांश-खडा थोर । लक्षुनिया सुक्षण हाणे वरी ॥ ७ ॥ तेणें मिसें जे जूट झाली मारी । मग बोले वरिवरी लोकाचारीं ॥ ८ ॥ बहिणी म्हणे लाधलें सुखें सुख । जैसे जीवनीं लवण समरस ॥ ९ ॥

२९५ उठा चला जाऊं गे जेथवरी । जेथें नांदे आमुचा आत्मा हरि ॥ १ ॥ कैसा छंद लागला तया नारी । अखंड दृष्टी परपुरुषावरी ॥ २ ॥ काम धामा विसरू कैसा झाला । कृष्णप्रेमा तो अंगीं ठसावला ॥ ३ ॥ विसरल्या देहभाव जेथें तेथें । पडा कैसें व्यापिलें कृष्णनाथें ॥ ४ ॥ बहिणी म्हणे वेधल्या कृष्णें नारी । त्या गाइल्या वेदशास्त्रपुराणीं ॥ ५ ॥

२९६ शब्द त्या आरतें लक्ष त्या परतें । लक्षालक्ष जेथें मग्न झालें ॥ १ ॥ तेथें काय आतां पुसणें सांगणें । भलते आपणे जाणताती ॥ २ ॥ ज्याचे जितुकें ज्ञान तितुक्यासी देव । शब्दाचा निर्वाह अरुताची ॥ ३ ॥ आतुरासी बोलतां कैंचें समाधान । म्हणोनीया मौन धरितां भलें ॥ ४ ॥ पाहावें तें एक शीत चाचपोनी । अवघें घाटोनी कोण सिद्धि ॥ ५ ॥ बहिणी म्हणे अवघ्या वासनेच्या चेष्टा । तेथें ब्रह्मनिष्ठा कासयाची ॥ ६ ॥

२९७ देह-नगरीं मन राजा राज्य चालवी आपुलें । दोघी स्त्रिया तयाला निवृत्ति प्रवृत्ति हे भले ॥ १ ॥ निवृत्ति ज्ञानाची ही कन्या प्रवृत्ति अज्ञानीं वोतलें । सवतीमत्सर दोघीं तयांचें भांडण लागलें ॥ १ ॥ ऐका सावध श्रोते तुम्ही करा निवाड दोघींचा । भांडती त्या परोपरी थोर गर्जिताती वाचा । निवृत्ति नवी हे कोण मन भोगी प्रवृत्तीचा । तयाचीया बळें दोघी वर्म काढितीही साचा ॥२॥ प्रवृत्तीनें व्याप केला पुरें पट्टणें वसविलीं । देश दुर्गे नानापरी राया पाडियली भूली । पुत्रकन्याप्रजा कैसी एका एका प्रसवली । लावण्य दाविलें मना प्रवृत्तीनें ख्याति केली ॥ ३ ॥ सर सर वेडिये बाई तुझें नामची निवृत्ति । येथें तुज ठाव कैंचा घाली बाहेर प्रवृत्ति । ऐक वो तूं म्हणणें माझें एक वचन तूं बाई । तुज मुळीं ठावो कैंचा बाई मीच आहें पाहीं ॥ ४ ॥ पट्टराणी माझें नांव रायो विसरला देहीं । देखोनी लावण्य तुझें भ्रम झालासे काई । जाय वो तूं परती होय तुझें लावण्य लटिकें । अज्ञान हा पिता तुझा मूळ पाहीं आधीं निके ॥ ५ ॥ प्रवृत्ति हे काय बोले वचन ऐक सवती । ब्रह्मादिक बाळें माझीं ऐसे नेणसी ख्याति ॥ रविचंद्रादि देव अवघे माझे गृहीं असती । सनकादिक माझे नातू ऐसें कळो तुझे चित्तीं ॥ ६ ॥ आम्ही नारी पट्टाचिया अखंड रायाशेजारी । घरचार करावया दाही घातली बाहेरी । ब्रह्मादिक बाळें पाळी पट्टराणी येईल सरी । चंद्रसूर्यादि देवही माझे सत्तेनें निर्धारीं ॥ ७ ॥ तूं तव पट्टाची खरी ऐसें बोलसी वचन । रावणानें सीता नेली तें कां न चाले मजविण । दंभाची स्त्रिया केली एवं मिथ्या तूं वो जाण । प्रवृत्ति मी थोर गाढी नाहीं नाहीं मजविण ॥ ८ ॥ ऐके वो विदेह माझा पिता ज्ञान हा समर्थ । होतें मी रामापाशीं यज्ञ करावया तेथ । परी मी अदृश रामीं तूं गे नोळखीसी सत्य । तुझें अंग क्रिया माझी तुम्हां सर्व साक्षीभूत ॥ ९ ॥ ऐक वो कां

बोलतेसी तुझे संगें सुख नाहीं । म्हणोनी मज प्रवृत्तीसी माळ घातली पाहीं । अवतारही कृष्णादिक मजसाठीं कष्टी तेही । कासया बोलसी व्यर्थ अदृश्य हे मिथ्या देहीं ॥ १० ॥ उन्मनी हें नाम माझें मज निर्गुणाचा संग । सगुण आरतें बाई मी तव अव्यय अभंग । प्रवृत्ति हे माझी सत्ता मना लागला झोटिंग । मनपण आलें मना माझिया आलेंसे अव्यंग ॥ ११ ॥ ऐक वो निवृत्ति तुझें स्थळ येथें कोण।इतुकें सांगें मज मी वो जाईन येथून । कन्या पुत्रा समेत राजा टाकून जाईना यासी जरी मिथ्या होय तरी रायाचीच आण ॥ १२ ॥ निरंजन वन स्थळ माझें निवृत्तीचें आहे । भाऊ माझा परमार्थ यासी मिथ्या बाई नोहे । भाव आणि निजबोध पुत्र शांतिक्षमा होय । ऐसी निवत्ति कन्या ज्ञानाची हे बोलों जाय । निवृत्तीसी शब्द नाहीं निरजंनी पाहें बाई । परादिक वाचा फिरे तरी तुझें येथें काई । बोलसी जीये वाचे तें तंव प्रवृत्तिच आहे ठायीं । तुझें बाई काय येथें हो सावध तूं देहीं ॥ १४ ॥ निवृत्ति कुंठित झाली प्रवत्तीनें जिंकियलें । तंव एक आठवलें तुझें मज माहेर वाहिलें । सांग वो मजलागीं माय बाप कोण बोले । सांग गे इतुकें बाई खरें खोटें तेथें कळे ॥ १५ ॥ अज्ञान हा पिता माझा अहंकार पूर्वज । काम क्रोध मोह पुत्र कन्या आशादिक मज । क्षेत्र हें हो गेहे माझें काय पुसतेसी मज । जाय तूं येथुनी आतां नये बोलतां लाज ॥ १६ ॥ घर जेव्हां जळे तुझें तेव्हां कोठें तूं राहसी । अज्ञान हें पळे जैसें तम रविप्रकाशीं । मनपण मन सांडी तैं तूं कोठें गे बाई । हगवण गेली मग कैंचा ठावो कडदोरासी ॥१७॥ बरें वो सवती बाई मन जेव्हां विषयीं विटे । तेव्हां सांडिलें प्रवृत्ति तुज तव देसवटे । आला ऐसें जाण चित्तीं बोलसी तें शब्द वायां जाय परि ते प्रवृत्ति ॥ १८ ॥ प्रवत्तीचें भान मिथ्या ज्ञान पाहसी जरी बाई । अज्ञान हीं ज्ञान दोन्ही झालें स्वरूपाचे ठायीं । अज्ञाना ठाव नाहीं मी हें आहे कोण कायी । इतुकें नाच हें आहे आधीं । शरण रिघे गुरु-पायीं ॥ १९ ॥ प्रवृत्ति मानली गोठीं म्हणे निवृत्ति बहिणी । तुम्ही आम्ही नांदों येथें सुखें सुख मनपणीं । गुरु तो कवण तेथें मज सांगे वो निर्वाणीं । शरण मी आलें तुज दोन्ही जोडुनीया पाणी ॥ २० ॥ ऐक वो ऐक वचन प्रवृत्ति तुझें नांव । प्रवत्तींचा धर्म तो भ्रतारासचि भजावें । मनाचे तूं घरीं पाया सुख पावसी स्वभाव । हें मन उन्मन पदातें ज्ञानें पावशील दैव ॥ २१ ॥ मी हें कोण आठवतां नामें प्रवृत्ति तत्त्वतां । मन उन्मन जालें ठेवितांची चरणीं माथा सवतीचा द्वैत गेला अवघी निवृत्ति तत्त्वतां । एकरूप दोन्ही जाल्या सवती भांडण भांडतां ॥ २२ ॥ बहिणी म्हणे प्रवृत्तींत अवघी निवृत्ति आहे । अज्ञानाचे मूळ सांडीं द्वैत आपणाचि जाये । विकल्प हा स्वयें तुटे तेथें द्वैत कैंचें राहे । सवती त्या एकरूपा मनपणीं मन आहे ॥ २३ ॥

२९८ ऐका तुम्ही सावध सजन । कांहीं एक बालकवचन । आत्माकार्यी लागलें भांडण । साधुसंतीं द्यावें निवडोन ॥ १ ॥ काया म्हणे आत्मयासी पाहें । मज स्वामी मोकलीसी काये । हें तों तुज उचीत पैं नव्हे । आधीं बरें विचारूनि पाहें ॥२॥ मर मर आत्मया रे नष्टा । मज येथें सांडिसी पापिष्टा । येरु म्हणे ऐक काये माझें । दैव तव लटिकें सहजें ॥३॥ आत्मा अविनाश श्रुति गर्जे । कां वा व्यर्थ भांडसी सांगिजे । सोडीं मज वेडीये अज्ञाने । तुज मज वेगळीक ज्ञानें ॥ ४ ॥ ऐकें स्वामी आत्मया जिवलगा । मजसंगें सुख तुज कीं गा । नानापरी सोसुनी कीं गा । सेखीं मज सांडुनी जासी गा ॥ ५ ॥ ऐक वेडे नाव हे सागरीं । प्राण्यालागीं नेत पैलतीरीं । नाव राहे उदकीं जयेपरी । तैसें तुज जाहलें सुंदरी ॥ ६ ॥ तुजमज वियोगाचि नाहीं। जन्मा आधीं साजणी तूं पाहीं।टाकावें हें उचितचि नाहीं। सेवा मजपासूनिया घेईं ॥ ७ ॥ अश्वावरी पार्थिव[2] बैसला । तेथूनिया स्वस्थानीं उतिरला । अंतरसुख काय प्राप्त त्याला । अश्वा प्राप्त झाली अश्वशाळा ॥ ८ ॥ रतिसुख आत्मया मजसी । नानापरी घेतलें विशेषीं । इंद्रियद्वारें सुख घेसी । सेखीं[1] मज पापिष्टा सांडिसी ॥ ९ ॥ लोहारा अग्नि-चाड आहे । म्हणोनी फुंकिती उपायें । कार्य जाल्या टाकिलें सर्व हें । तैसें तुझें काम आम्हां काये ॥ १० ॥ लोहसंगें अग्नि भासे परी । घण पडतीं लोहाचेंच शिरीं। तैसें तुझे संगतीमाझारीं । असोनिया अलिप्त सुंदरी ॥ ११ ॥ आम्ही तव पतिव्रता नारी । स्वामी जातां जाळुनी शरीरीं । तूं रे तंव नष्ट सर्वापरी । भोगुनिया चाललासी वरी ॥ १२ ॥ तुझें नांव पाहतां डफडी । तुज आम्हांसंगतीं आवडी । निज आत्मा निर्गुण निरवडी[3] । जाय परती आहेसी तूं वेडी ॥ १३ ॥ मग आतां कासया वर्तसी । अंतीं आम्हां सांडुनी जासी । सुखभोग सर्वही तूं घेसी । अलिप्त हें नाम मिरवीसी ॥ १४ ॥ तुजमज संगतीचें मूळ । जैसा चंद्र उदकींच सोज्ज्वळ । भासे परी अभिन्न केवळ । तैसा कायेमध्यें हा गोंधळ ॥ १५ ॥ ऐसा आत्मा बोलतां आपण । मग कुडीस पडियलें मौन । आत्मा व्यापक परिपूर्ण । देहीं आहे परी विलक्षण ॥ १६ ॥ देहआत्मासंबंधुचि नाहीं । गुरुकृपेकरूनियां पाहीं । तुकारामीं निष्ठा पूर्ण तेही । बहिणी हें मुळीं नांव नाहीं ॥ १७ ॥

---

## जोगी.



२९९ जाग रे जगजोगी जगजोगी । तोचि आहे तुमच्या संगीं ॥ १ ॥ ऐसें सांगें क्षेत्रपाळ । तुम्ही पुजा रे सकळ ॥ २ ॥ कायाकाशीपुर नगरीं । आत्मा-

---

१ शेवटी. २ राजा. ३ निग्रह; सावधानता.

शिव राज्य करी ॥ ३ ॥ ज्ञान भागीरथीनीर । निर्मळ वाहे स्थिर स्थिर ॥ ४ ॥ अखंड पर्वकाळ तेथें । ब्रह्मादिक मिळती जेथें ॥ ५ ॥ तया जाती काशीपुरा । होती वेगळे संसारा ॥ ६ ॥ पंचतत्त्व पंचक्रोशी । अवघे लिंगमय काशी ॥ ७ ॥ ऐसी देह-काशीपुरी । विश्वनाथाची नगरी ॥ ८ ॥ काळभैरव दंडपाणि । तेचि विवेक विचार दोन्ही ॥ ९ ॥ तेथें उभा धुंडिराज । येथें निजबोध सहज ॥ १० ॥ प्रयागत्रिगुणत्रिवेणी । आली गंगेसी मिळणी ॥ ११ ॥ मना-गुणां जेथें भेटी । मनकर्णिका तेचि घाटीं ॥ १२ ॥ काशी तेचि मूळमाया । मन येतां तिचे ठायां ॥ १३ ॥ दोवां होतां जेथें भेटी । जाली ब्रह्मानंदा सृष्टि ॥ १४ ॥ नाम घाट मनकर्णिका । ऐसें म्हणती तेथें देखा ॥ १५ ॥ तेथें घडे जया स्नान । पडे गांठीं कोटि पुण्य ॥ १६ ॥ तया पुण्याचेनी योगें । दर्शन भवानीचें होये ॥ १७ ॥ भवानी ते निजकळा । शुद्ध ब्रह्मींचा जिव्हाळा ॥ १८ ॥ नव्हे तुरीया ना उन्मनी । तया मूळ ती भवानी ॥ १९ ॥ तिचें घडतां दर्शन । भेटे ब्रह्म परिपूर्ण ॥ २० ॥ बहिणी म्हणे भाव धरा । जा रे एकदां काशीपुरा ॥ २१ ॥

३०० प्रणव ते पंढरी विस्तारलें क्षेत्र । अर्ध मात्रा तेथ चंद्रभागा ॥ १ ॥ वंदूं वेणुनाद अनुहत गोविंद । वाजवितो छंद जाणती तो ॥ २ ॥ अकार ते भीमा जाणते जाणती । दुजी पुष्पावती उकार तो ॥ ३ ॥ मकार पद्माळें अनुभव पंढरी । ब्रह्मसाक्षात्कारीं ओतलीसे ॥ ४ ॥ विठ्ठल अतीत आकारावेगळा । व्यापुनी राहिला पंढरीयें ॥ ५ ॥ पुंडलिकें तेथे अनुभव पाहिला । बहिणी म्हणे केला विस्तार हा ॥ ६ ॥

३०१ अजीसर्वन्यायें ठकावलें मन । तटस्थता जाण होउनी ठेली ॥ १ ॥ तेथें आतां काय पुसावें सांगावें । स्वानुभव अंगें नाहीं जया ॥ २ ॥ कीटकभृंगी-न्यायें जाली तद्रूपता । निमाल्या अवस्था चारी तेथें ॥ ३ ॥ बहिणीसी उन्मनी लागली अवस्था । भोगी त्या परता ब्रह्मानंद ॥ ४ ॥ परेचे परतें त्याहुनी परतें । सारूनिया चौथें पाहें पां रे ॥ ५ ॥ तेंचि तें होउनी पाहें बा रे कैसा । व्यर्थ दाही दिशा हिंडों नको ॥ ६ ॥ सच्चिदानंदाचा खुंटला संवाद । तुटला विवाद जये ठायीं ॥ ७ ॥ बहिणी म्हणे वस्ती मोडली परेची । वार्ता ओंकाराची नाहीं नाहीं ॥ ८ ॥

३०२ अदळ कमळां कमळ विकसलें । तें म्यां गगनीं उफराटें देखिलें गे ॥ ध्रु. ॥ बाईये स्वानुभवें पाहा कैसें । जेणें आत्माराम भेटे तैसें ॥ १ ॥ मनाच्या उल्हासें कमळीं कमळ भेटे । आनंदाचा पूर लोटे गे बाई ॥ २ ॥ तेथें काय कारण सरलें शेवटीचें एक उरलें । बहिणी म्हणे तें म्यां देखिलें गगनाचे माथां ॥ ३ ॥

---

१ अखंड; निरंतर. २ सर्व प्रकारें. सर्व बाजूंनी.

३०३ निरसितां निरसिलें आवचितां स्वरूप। तेंचि भरलें रूप नयनीं माझ्या ॥ १ ॥ झाडितां झाडेना काढितां काढेना। नेणों काय मना केलें येणें ॥ २ ॥ जें जें पडे दृष्टी तें तें पडे मिठी। नवल या गोष्टी कोण जाणे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे माझें व्यापिलें मानस। लावियेलें पिसें काय सांगों ॥ ४ ॥

३०४ निशींचिया भरीं दिवस ना राती। प्रकाश ना ज्योती कैसें माये ॥ १ ॥ हें सुख जाणती जाणते स्वभावें। पूर्ण कृपा देवें केली ज्यांसी ॥ २ ॥ बिंबीं बिंब कैसें सामावोनी ठेलें। स्वरूप कोंदलें दशदिशा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तेथें बोलावें तें काय। मज मीच पाहें हारपलें ॥ ४ ॥

३०५ पाहों जों गेलीया मीच हारपलें। नवल कैसें जालें बाईयानों ॥ १ ॥ काय सांगों कैसें विपरीत चोज। पाडिलें माझें मज ठक कैसें ॥ २ ॥ देखत देखतां अंगीं संचारलें। नाठवेसें झालें मीही माझें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे नवल सांगों कोणापाशीं। माझें मी मानसीं लाजलींये ॥ ४ ॥

३०६ होउनी निवांत पाहतां एकांत। अवघीच विश्रांत पडली मना ॥ १ ॥ अद्वैत आपण ब्रह्म परीपूर्ण। स्वानंदघन होउनी ठेलें ॥२॥ निवांत एकांत वास अद्वैताचा। सोहळा सुखाचा संत घेती ॥३॥ बहिणी म्हणे नेणों काय पुण्य केलें। सुख हें लाधलें गुरुकृपा ॥ ४ ॥

३०७ दिवस ना राती प्रकाश ना ज्योती। तेथें निजवस्ती केली जीवें ॥ १ ॥ आनंदी आनंद गोविंदी गोविंद। भोगूं परमानंद बाईयांनो ॥ २ ॥ अध ना ऊर्ध्व गति ना विगति। तेथें निज-वस्ती केली मनें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सोहं हंसया-सकट। भरुनी ठेला घोट एकसरां ॥ ४ ॥

३०८ जळ ना स्थळ कैंची भवनदी। वाउगी उपाधि जडली देहीं ॥ १ ॥ ऐसें जाणोनीयां केली म्यां तांतडी। साधावया गोडी स्वरूपाची ॥ २ ॥ कैंची भ्रमर-गुंफा कैंची शिवपुरी। भरावें का भरीं वाउगेंची ॥ ३ ॥ कैंचें तार्जे आणि जरठ कमळ। निरंजन कमळ कैंचें तेथें ॥ ४ ॥ महा कमळावरी आलेखाची गढी। तयावरी गुढी प्रेमज्योती ॥ ५ ॥ अवघीं कमलपदें ज्या रूपाखालतीं। बहिणीची निजवस्ती जाली तेथें ॥ ६ ॥

३०९ परेचे परतें त्याहून परतें। सारोनीया चौथें पाहें पां रे ॥ १ ॥ तेंचि तें होउनी पाहें पां तूं कैसा। व्यर्थ दाही दिशा धुंडों नको ॥ २ ॥ सच्चिदानंदाचा खुंटला संवाद। तुटलासे वाद जया ठायीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे वस्ती मोडिली परेची। वार्ता ओंकाराची मर्शी नाहीं ॥ ४ ॥

# ११ निर्गुणपर अभंग.



३१० अक्षर क्षरलें रूपासी तें आलें ।.निर्गुण तें झालें सगुणाचें ॥१॥ पैल भीमातीरीं उभी विटेवरी । स्वरूपें साजीरी दिव्य मूर्ति ॥ २ ॥ विजातिया कैसें जालें कुळ नाम । निश्चया निःसीम नवल मोठें ॥ ३ ॥ अशोभ ते शोभा पावलाहे कैसा । बहिणी म्हणे दिशा व्यापोनीया ॥ ४ ॥

३११ ब्रह्मांडावेगळी वेदासी निराळी । चोविसां आगळी विठ्ठलमूर्ति ॥ १ ॥ धन्य ते आगळी घेती प्रेमसुख । पहाती श्रीमुख विठ्ठलाचें ॥ २ ॥ सा चौ आठरा अगम्य चोजवेना । ते हे मूर्ति जाणा पंढरीची ॥ ३ ॥ वैकुंठनिवासें स्वइच्छां निर्मिलें । अक्षर क्षरलें भक्तिसुखा ॥ ४ ॥ अनंत ब्रह्मांडें जयाचे उदरीं । होती घडामोडी सर्वकाळ ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ते हे पंढरीची मूर्ति । ठकारली व्यक्ति विठ्ठलवेषें ॥ ६ ॥

---

# १२ तुलसीमाहात्म्यपर अभंग.



३१२ जेथें नाहीं वृंदावन । तेंचि जाणावें स्मशान ॥ १ ॥ राहों नये तये ठायीं । एक घडी पळ पाहीं ॥ २ ॥ जेथें असे तुलसीपान । तेथें आहे नारायण ॥ ३ ॥ बहिणी म्हणे विष्णु नांदे । तुलसीचे ठायीं मोदें ॥ ४ ॥

३१३ ब्रह्मा विष्णु वृंदावनीं । शिव राहे तये स्थानीं ॥ १ ॥ धन्य तेची जीव जाणा । करिती जे प्रदक्षिणा ॥ २॥ सर्व सिद्धी वृंदावनीं । येती तुलसीवृंदावनीं । बहिणी म्हणे वृंदावन । कलियुगीं मुक्तिस्थान ॥ ४ ॥

३१४ गंगा आणि भागीरथी । ठायीं तुलसीचे येती ॥१॥ होय दर्शन जयासी । तोचि देह पुण्यराशी ॥ २ ॥ सर्व तीर्थांचें माहेर । एक तुलसी हें सार ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तुलसी जेथें । तेथें तीर्थांचा संघात ॥ ४ ॥

३१५ तुलसीचें पत्र । असे देवासी एकत्र ॥ १ ॥ नाहीं दोघां भिन्न भेद । दोघां एक तेंचि पद ॥ २ ॥ तुलसीचे पानीं । वसे राधा-कृष्ण दोन्ही ॥ ३ ॥ बहिणी म्हणे धन्य देवा । जया तुलसीची सेवा ॥ ४ ॥

३१६ सर्व तीर्थीं जया चाड । पुण्य सर्वांहूनी वाड । वृंदावनीं एक आहे । तुलसीचे ठायीं पाहें ॥ २ ॥ देव तेहतीस कोटी । येती तुलसीचे भेटी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे वृंदावन । आहे वैकुंठा-समान ॥ ४ ॥

३१७ देव न सांपडे मना । तरी जावें वृंदावना ॥ १ ॥ तेथें होय समाधान । स्वयें भेटे नारायण ॥ २ ॥ देव हारपला ज्याचा । वृंदावनीं भेटे साचा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे भाव खरा । पाहिजे तो गांठीं बरा ॥ ४ ॥

३१८ वृंदावनीं केला धांवा । म्हणे धांव रे केशवा ॥ १ ॥ द्रौपदीसी पावे हरी । वृंदावनीं निर्धारीं ॥ २ ॥ वारी सकळ संकट । धन्य तुलसी सर्वां श्रेष्ठ ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सर्व गुण । वृंदावनापाशीं जाण ॥ ४ ॥

३१९ चहूं वर्णांमाजीं जाण । दारीं करा वृंदावन ॥१॥ तुलसीसी भजा भावें । कदा नुपेक्षिजे देवें ॥ २ ॥ भावें लावी तुलसी-माती । तया होय तेचि मुक्ति ॥३॥ बहिणी म्हणे लागे वारा । होय वेगळा संसारा ॥ ४ ॥

३२० देव, तीर्थ वृंदावन । अग्निहोत्री यांचें स्थान ॥ १ ॥ धन्य स्थळ तें पवित्र । संतसाधूंचें जें क्षेत्र ॥ २ ॥ हो तीवेदांचें पठण । जेथें गायींचें गोठण ॥ ३ ॥ बहिणी म्हणे भाव धरा । देव वसे तेथें खरा ॥ ४ ॥

३२१ ऐसें देवांचें बोलणें । बहुतां ग्रंथीं असे जाणें ॥ १ ॥ करीं माता-पिता-सेवा । तेथें वास सदा देवा ॥ २ ॥ भजनापाशीं नित्य धांव । वराडिया ऐसा देव ॥ ३ ॥ बहिणी म्हणे स्थान तरी । पाहोनीयां वास करीं ॥ ४ ॥

३२२ तुलसी-वृंदावनीं गायींचे गोठणीं । बैसतां भजनीं देव जोडे ॥ १ ॥ नाहीं या संदेह पाहिजे विश्वास । साक्ष अंतरास येत असे ॥ २ ॥ नारायणें दिलें वृंदेसी वचन । तुज मी टाकोन न वजें[१] कोठें ॥ ३ ॥ मग तें तुलसी जाली अंगें वृंदा । म्हणोनी गोविंदा प्रीति तीची ॥ ४ ॥ बहिणी म्हणे करीं तुलसी-स्मरण । होय उद्धरण तिहीं लोकीं ॥ ५ ॥

---

# १३ ज्ञानपर अभंग



३२३ संसारिक ज्ञानें तरसी संसार । हा तुझा निर्धार जाय वायां ॥ १ ॥ या लागीं तूं मूळ आत्मज्ञान साधीं । तोडोनी उपाधि अंतरींची ॥ २ ॥ स्वर्गासी जाशील तें जरी साधिलें । व्यर्थ तेणें गेलें पूर्व तुझें॥३॥ ब्रह्मांडीं चढविला प्राणवायु

---

१ थोर, पुष्कळ. २ जाणें.

जरी। व्यर्थ तें अवधारीं जाई रया ॥४॥ मंत्र-उपासनें साधीलें दैवत। श्रम तोचि तेथ फळा आला ॥ ५ ॥ बहिणी म्हणे शोध करीं आत्मत्वाचा। मग तुज कैंचा जन्म-मृत्यु ॥ ६ ॥

३२४ नाहीं आत्मज्ञान हाटामाजीं उभें। घेशील तें लोभें करोनीयां ॥ १ ॥ पाविजे विवेकें सद्गुरूच्याच संगें। कृपे पांडुरंगें पंढरीच्या ॥ २ ॥ आत्मज्ञान शेतीं पेरानी पावीजे। हिंडतां लाहिजे दिशा दाही ॥ ३ ॥ आत्मज्ञान तपें तीर्थें नोहें प्राप्त। त्याजिसी जरि आप्त संसारींचे ॥ ४ ॥ आत्मज्ञान नोहे पंचाग्नि साधीतां। धूम्रपानें वृथा क्लेश होती ॥ ५ ॥ बहिणी म्हणे साधे सद्गुरूचेनि कृपे। जरी अनु-तापें शरण जासी ॥ ६ ॥

३२५ आत्मज्ञान डोळां दिसे ऐसें नाहीं। लक्षी जैसें पाहीं मनें कांहीं ॥ १ ॥ बुद्धीचा उपरम होईल सर्वही। आत्मज्ञान ठायीं पडे तेव्हां ॥ २ ॥ आत्मज्ञान नोहे सुवर्णाचा गोळा। चंद्र-सूर्य मेळां सांपडेल ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ज्ञान साधेल संगतीं। संतांचे निश्चितीं बुद्धि-योगें ॥ ४ ॥

३२६ अग्नीविण काष्ट जेवीं नोहे जाण। तैसी स्थूलाविण वस्तु नोहे ॥१॥ ज्ञाना-वीण नोहे परी आत्मबोध। केलीया संवाद सापडेना ॥ २ ॥ कोणता पदार्थ आहे वस्तूवीण। वायूचें स्पर्शन नसे कोठें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे आत्मा सर्वांतर-व्यापी। परी तो संकल्पीं अंतरला ॥ ४ ॥

३२७ पिंड ब्रह्मांडींचा करोनि उगवू। मग तो अनुभवू होय तुज॥१॥ विश्वीं विश्वं-भर विस्तारला जाण। पाहें याची खूण वेदशास्त्रीं ॥ २ ॥ दुधामाजीं तूप आहे निश्चयेंसी। युक्ति काढायासी पाहिजे ते ॥३॥ बहिणी म्हणे देहीं आत्मत्व विचारीं। ब्रह्म तुज उरीं उरली नाहीं ॥ ४ ॥

३२८ मनाचा चालक बुद्धीचा बोधक। पहातां आणीक कोण दूजा ॥ १ ॥ परी तूं कल्पना सांडोनी पहासी। तरीच पावसी ब्रह्मपद ॥ २ ॥ डोळ्यांचें पहाणें कानांचें ऐकणें मुखींचें बोलणें कोणाचेनी ॥३ ॥ बहिणी म्हणे तुझें शरीरींच पाहें। मग पुढें जायें हिंडायातें ॥ ४ ॥

३२९ प्रणवापासोनी सृष्टीचा विस्तार। करोनी विचार सार सेवीं ॥ १ ॥ साधनें कासया साधिसी पामरा। प्रणवींच खरा तुझा वास ॥ २॥ ओंकारापासोनी विस्तारले वेद। अक्षरांचा भेद ओळखावा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मूळ ओंकाराचें ज्ञान। जालीया निर्वाण ब्रह्म होती ॥ ४ ॥

३३० भक्तिप्रेमसुख नकळे आणीकां। पंडितां वाचकां वैदिकांशीं ॥ १ ॥ जीव-न्मुक्त जाला जरी आत्मनिष्ठ। भक्तिप्रेमसुख दुर्लभ त्या ॥ २ ॥ अभेदोनी भेद

स्थापिला पैं अंगीं । वाढवाया जगीं प्रेमसुख ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देव कृपा करी कांहीं । तरीच हें ठायीं पडे वर्म ॥४ ॥

३३१ आकारलें तें तें ब्रह्माचि सर्वही । मनांमाजीं पाहीं विवेकानें ॥१॥ कासया हिंडसी दंडीसी शरीरा । विकल्प भीतरां वाउगाची ॥ २ ॥ ब्रह्मावीण दुजें नाढळे सर्वथा । अनुभव शास्त्रां सर्व ऐसा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे शोध करीं तूं मनांत। ब्रह्म सदोदित सर्व काळ ॥ ४ ॥

३३२ विश्वाकार ब्रह्म विस्तारलें सर्व । पाहें सावयव ज्ञानामाजीं ॥ १ ॥ माया म्हणवोनी ब्रह्म कां कल्पिसी । नसतें जीवासी बंधन तें ॥ २ ॥ सुतावीण वस्त्र काय तें होईल । घट ना होईल मातीविण ॥ ३ ॥ बहिणी म्हणे हेमावीण अलंकार । नघड साचार जाण ऐसें ॥ ४ ॥

३३३ गुळावीण गोडी फुलावीण वास । न दिसे सायास केला जरी ॥ १ ॥ तैसा विश्वीं जाण विश्वात्मा पाहिजे । अलक्ष्य सहजें एऱ्हवीं तो ॥ २ ॥ सूर्याचिये मूर्ती तेज मुसावलें । तेंही कळों आलें चेष्टेनें तें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तैसा ब्रह्म विश्व हरी । जाणिजे हे खरी ज्ञानदृष्टी ॥ ४ ॥

३३४ देह अचेतन वर्तवीतें मन । व्यापक त्रिभुवन साक्षिरूप ॥ १ ॥ तयाचें स्वरूप पाहीं गुरुमुखें । सर्व तुझीं दुःखें निवारती ॥ २ ॥ जागृतीं जागणें स्वप्नीं साक्षिभूत । सुषुप्तीं वर्तत साक्षरूपें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे याचा घेईं बरा बोध । होय मना बोध ब्रह्मपणीं ॥ ४ ॥

३३५ विकल्पेंचि सृष्टि वाढलीसे जाण । विकल्पेंचि मन द्वैत मार्गी ॥ १ ॥ करावें निरसन विकल्पाचें जाण । मग तूं पावन होसी बापा ॥ २ ॥ विकल्पेंचि जन्म विकल्पेंचि मृत्यु । विकल्पेंचि सत्यु हारपलें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे बा रे विकल्प घातकी । केवीं होसी सुखी संगतीनें ॥ ४ ॥

३३६ अवगूण जयाचे तया न दिसती । म्हणोनीच होती क्लेश तया ॥ १ ॥ काय करूं यासी न चले उपाय । इंद्रावणें[1] नोहे गोड कदा ॥ २ ॥ अग्नीचा तो ताप जाळी भलतेया । त्याचा गुण तया बरा वाटे ॥३॥ बचनाग मारक करी प्राणहानि । त्याचें त्यालागोनी न कळे कांहीं ॥ ४ ॥ बहिणी म्हणे जाण कोळसा हा शुभ्र । होईल तें अभ्र नभीं कायी ॥ ५ ॥

३३७ संचित हें जळे ज्ञानाचेनि मुळें । ज्ञान तें आकळे संतसंगें ॥ १ ॥ म्हणोनीया संग धरावा संतांचा । मनें काया वाचा निर्धारेंसी ॥ २ ॥ इंद्रियाच्या वृत्ति स्थिरावती मागें । साधूचेनि संगें पाहें पां रे ॥ ३ ॥ द्वैताचा हरास[2] वासनेचा नाश । तुटतील पाश संतसंगें ॥ ४ ॥ अहंकार जाय ममता देहाची । आसक्ति

---

१ कंवडल ( एक प्रकारचें कडू फळ. ) २ नाश.

कामाची संतसंगें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे संग असावा निसंग । तोचि पांडुरंग पंढरीचा ॥ ६ ॥

३३८ संत तेचि देव संत तेचि दैव । संत तेचि राव साधनाचे ॥ १ ॥ ऐसा हा निर्धार जयाचे मानसीं । फळेल तो त्यासी भव नेणे ॥ २ ॥ संत तेचि तप संत तेचि जप । संत ते स्वरूप ईश्वराचें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संत कृपेचे सागर । तर्थांचें माहेर तीर्थरूप ॥ ४ ॥

३३९ संताचे सन्निध पालटे संचित । नवी सृष्टि होत क्षणें एकें ॥१॥ ऐसे जाण संत अगाध गुणांचे । मनें कायावाचें शरण होय ॥ २ ॥ संतांचे वचनीं भानुतेजवृष्टि । दर्भा-अग्रीं सृष्टि ठेवियेली ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संत होती जैं कृपाळ । तैंच पर्वकाळ येती घरां ॥ ४ ॥

३४० संताचे सेवनीं होय आत्मज्ञान । शांति क्षमा पूर्ण वोळंगती ॥ १ ॥ म्हणोनी सेवेसी असावें तत्पर । बुद्धि निर्विकार होईल ते ॥ २ ॥ संतांचे संगतीं होय चित्तशुद्धि । महा अष्टसिद्धि द्वारपाळ ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संत कृपाळू जैं होती तैंच ब्रह्मस्थिति प्रगट होय ॥ ४ ॥

३४१ शिष्य नव्हे तोचि जाणावा निश्चयें । सद्गुरूसी जो पाहें फार बोले ॥ १ ॥ शिष्य नव्हे जाण करि तोंडापिटी । अखंड चावटी ज्ञानगर्वें ॥ २ ॥ साधु नव्हे तो हा गुरूसी विन्मुख । नाहीं ज्या विवेक साधु नव्हे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे साधु नव्हे तो सहसा । जयाच्या मानसा सुख नाहीं ॥ ४ ॥

३४२ निवृत्तीसी नाहीं प्राक्तनाचें बळ । अनुभवी केवळ जाणती तें ॥ १ ॥ निर्धारी आपुलें असत्य शरीर । मानोनी विचार सार घेती ॥ २ ॥ नाहीं दंड जैसा निःस्पृहीं रायाचा । तैसा प्राक्तनाचा निवृत्तीसी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे पाहें प्राक्तना वरिष्ठ । प्रवृत्ति हे श्रेष्ठ मानीं तया ॥ ४ ॥

३४३ शरीराचें माथां वर्ततें प्राक्तन । शरीर तें जाण प्राक्तनाचें ॥ १ ॥ ज्ञानियांचें मत देह हाचि मिथ्या । प्राक्तनाची कथा तेथें कोण ॥ २ ॥ प्राक्तन भोगवी भोग तो शरीरीं । ज्ञानिया अंतरीं सुखरूप ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देह प्राक्तन तोंवरीं । विचार अंतरीं निश्चयाचा ॥ ४ ॥

३४४ जळालें तें वस्त्र कैसें पांघरेल । देंठीं का जडेल पक्व पत्र ॥ १ ॥ तैसें ज्ञानियास भासतें शरीर । बांधील संसार केवीं तया ॥ २ ॥ जळांतील सूर्य प्रकाशेल कायी । चित्रींचा तो पांहे अग्नि जाळी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे त्वचा सर्पाचिये विखें । मेला तो नायके विवेकु हा ॥ ४ ॥

३४५ भाजलें तें बीज अंकुरेना कदा । न मिळेचि दुधामाजीं लोणी ॥ १ ॥ तैसा तो ज्ञानिया जन्म नेघे जाण । वासना भाजून वर्ततसे ॥ २ ॥ परीसा लागतां लोह तें पालटे । काळिमा हे भेटे पुन्हा कैसी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे गोदा मिळाली सागरीं । न येची माघारीं त्र्यंबकातें ॥ ४ ॥

३४६ माझीया हा मनें घेतला *उच्चाट । पहावें वैकुंठ पंढरी हे ॥१॥ सांडोनीया सर्व काम धाम धंदा । वेधलें गोविंदा गोपीराजा ॥ २ ॥ अधरापासोनी भेदीयेलें चक्रें । इंद्रियें हीं वक्त्रेंकरोनीयां ॥३॥ प्राणाचा निरोध करोनी पाहिलें । शिष्येिं गाईलें नाम तुझें ॥ ४ ॥ तंव पुढें नाद गर्जताती नाना । तेथील धारणा ठाकियेली ॥ ५ ॥ सोहं शब्द तोही अरुताचि पाहें । लक्षीं लक्ष जाये मिळोनिया ॥ ६ ॥ सद्गदित कंठ दाटतांचि मन । करोनियां स्नान चंद्रभागे ॥ ७ ॥ बहिणी म्हणे देव विठ्ठल पाहिला । द्वैतभाव गेला हारपोनी ॥ ८ ॥

३४७ विश्वाचि विठ्ठल विस्तारला सर्व । विकारेंचि देव अंतरला ॥ १ ॥ ठकोनिया बुद्धि ठसावली माया । ठुमकत गेलिया श्रुतीमार्गें ॥ २ ॥ लांचिलीं साधनें लक्ष हारपलें । लघुत्व घेतलें साधनांनीं ॥३॥ बहिणी म्हणे तो हा विठ्ठल पहातां आली अद्वयता मना सहजें ॥ ४ ॥

३४८ चंचळ मानस चुकलें चिद्रूप । चढलें प्रताप जयाचा हा ॥ १ ॥ तेचि चंद्रभागा तेथें करी वास । पुंडलीका व्यास अखंडत्वें ॥ २ ॥ द्रवोनीया चित्त दृश्य हारपलें । चिद्रूप संचलें चिदाकाशीं ॥ ३ ॥ भागलीं संचितें भाग होतां शरिरीं । भाविली पंढरी भाव बळें ॥ ४ ॥ गाइलें हें वेदीं पुराणें गर्जती । ग्वालेन्य वर्णिती स्मृति जीची ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसी चंद्रभागा जाण । तेथें अनुष्ठान भक्त करी ॥ ६ ॥

३४९ वैद्याचा देह व्यापियेला रोगें । मात्रा मागें त्यागे मूर्ख तोची ॥ १ ॥ यालागीं पारखी करोनीयां जाण । होईल कल्याण सर्व तुझें ॥ २ ॥ आपणाचि बुडे कासीं लावि जेनां । तयाच्या वचना मूर्ख मानी ॥ ३ ॥ घरीं उपवासी आमंत्रीत लोक । सत्य मानी एक मूर्ख तोची ॥ ४ ॥ बहिणी म्हणे अंगीं जयाचें सामर्थ्य । सर्वही पदार्थ सिद्ध तेथें ॥ ५ ॥

३५० कल्पतरूपाशीं मागतां कल्पिलें । सामर्थ्य तें भलें तया अंगीं ॥ १ ॥ कासयासी शीण करिसी गा मना । क्रिया ते निर्वाणा पाववील ॥ २ ॥ चिंतामणीपाशीं मागतां चिंतिलें । भावना ते फळे सर्व तुझी ॥ ३ ॥ कामधेनूपाशीं होती पूर्ण काम । परिसीं उत्तम लोह होये ॥ ४ ॥ अमृताजवळीं मागतां अमरत्व

---

१ गौरव (?) २ लोकां. * आतुरता.

ज्ञानेंचि पूर्णत्व पावशील ॥ ५ ॥ बहिणी म्हणे अंगीं क्रिया ज्या समर्थ । सर्व ही पदार्थ तयापाशीं ॥ ६ ॥

३५१ धन्य मानी मन विठ्ठलीं जयाचें । चित्त निश्चयाचें स्वस्वरूपीं ॥ १ ॥ तयाचे संगतीं होय चित्त शुद्ध । अंतरीं हा बोध प्रगट दिसे ॥ २ ॥ निंदा आणि स्तुति जयासी समान । देह-अभिमान नाहीं जया ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जया नाहीं द्वैतभाव । तोचि जाणा ठाव आत्मयाचा ॥ ४ ॥

३५२ तोचि भवरोग फेडील अंगींचा । जयासी शांतीचा भाव देहीं ॥ १ ॥ इतर ते व्यर्थ दांभिक कासया । पाडिती संशयामाजीं लोकां ॥ २ ॥ तोचि निरसील भवपाश सर्वही । जया बोध देहीं सर्वकाळ ॥ ३ ॥ तोचि दवडील माया अंधकार । जयासी विकार नाहीं स्वप्नीं ॥ ४ ॥ तोचि उतरील विषयविष पाहें । भूतकृपा राहे जयामाजीं ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसी करावी परीक्षा । पावसी अपेक्षा सहज गुणें ॥ ६ ॥

३५३ सूर्य अभ्रामाजीं सांपडला जरी । काय तेज तरी उणें होये ॥ १ ॥ तैसा जाण संत दिसे प्रपंचांत । परि तो अतीत सर्व कर्मीं ॥ २ ॥ सुवर्ण पुरिलें जरी पृथ्वी-आंत । काय तें हारपत तियेमाजीं ॥ ३ ॥ सूर्य उदकांत बिंबला आपण । तोय त्यालागून काय बाधे ॥ ४ ॥ वदन आदर्शीं बिंबलें दिसत । आरशाचें तेथें काय लागे ॥ ५ ॥ बहिणी म्हणे रंगीं ठेविला स्फटिक । रंग त्या बाधक होईल काय ॥ ६ ॥

३५४ पय आणि तक्र वर्णेंही सारिखे । शुभ्र गार देखें परीस तोही ॥ १ ॥ परी त्यांचे गुण जाणते जाणती । मूर्ख ते मानिती समान हो ॥ २ ॥ सुवर्ण पितळ दिसे पीतवर्ण । गंगाजळ अन्य सारिखेंची ॥३॥ बहिणी म्हणे येथें परीक्षक जाणे । येर ते शहाणे काय करूं ॥ ४ ॥

३५५ आकाशीं कावळा कारितसे गती । गरुडपक्षिरीती तेचि असे ॥ १ ॥ काय ते मानावे समान सज्जनीं । आपुलाल्या गुणीं वोळखावे ॥ २ ॥ सूर्याचिया तेजें वर्ततसे जन । दीपही धरोन तेज वर्ते ॥ ३ ॥ गायगाढवींचें सारिखेंचि दूध । परद्वारां निंद्य पतिव्रता ॥४॥ तुळसीचा वृक्ष आणि तो धोतरा । फणस-इंद्रावनासम पाहे॥५॥ बहिणी म्हणे ज्ञान पाहिजे अंतरीं । वस्तु तें निर्धारीं कळे तया॥६॥

३५६ सुरतरू म्हणोनी बाभूळ मानिली । व्यर्थचि ते गेली भावना हो ॥ १ ॥ यालागीं वोळखी असावी नेटकी । येईल परिपाकीं गूण तया ॥ २ ॥ साखरेचा खडा गार एकवर्ण । हंस पक्षी जाण सारखेची ॥ ३ ॥ बहिणी म्हणे पहा विचारोनी मनीं । ज्ञान सर्वांहूनी श्रेष्ठ असे ॥ ४ ॥

३५७ अहंकारें देह धरी जीवदशा । मग पडे सोसा संसारिक ॥ १ ॥ तेणेंचि अंतर पडलें मुळाशीं । मग भोग सोशी नाना योनी ॥ २ ॥ अहंकार वाढे स्त्रीधन लोभ । माया ते स्वयंभ वाटली त्या ॥ ३ ॥ बहिणी म्हणे याचा करावा विचार । आत्मज्ञान सार सांपडेल ॥ ४ ॥

३५८ स्त्रियांचेनि रूपें माया जाली सत्य । धन्य मानीं येथें चित्त वाटे ॥ १ ॥ येईल वैराग्य चित्तामाजीं जेव्हां । आत्मज्ञान तेव्हां होय तुज ॥ २ ॥ हाव भाव इच्छा कटाक्षाचे बाण । साहे ऐसा कोण भूमीवरी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मूळ नाशासी कारण । स्त्रिया आणि धन मोक्षमार्गीं ॥ ४ ॥

३५९ मद उतरेल एका दों दिसांत । सागर निवांत होईल तो ॥ १ ॥ परि जाणया हे स्त्रियांसी भुलला । तो मद उतरला नाहीं कैसो ॥ २ ॥ तपराज्यमद जाईल तो क्षणीं । आणिक ते जाणीं नाना मद ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मद स्त्रीकामें वाढती । या मदा निवृत्ति नोहे मना ॥ ४ ॥

३६० वत्सापाशीं जेवीं धावे ती गाउली । किंवा ती माउली बालकीं हो ॥ १ ॥ तैसें भक्तीपाशीं ज्ञान सहजस्थिति । सांपडे प्रतीति आली मज ॥ २ ॥ पुष्पापाशीं जेवीं भ्रमर गुंगत । गुळासी गुंतत मक्षिकाय[2] ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तैसें भक्तीपाशीं ज्ञान । अनायासें खूण सांपडली ॥ ४ ॥

३६१ विश्वीं विश्वंभर पाहे ज्ञानदृष्टी । घेउनी कसोटी वेदशास्त्रें ॥ १ ॥ काय उणें मग आपुल्या स्वसुखा । होउनीयां मुका राहे तेथें ॥ २ ॥ पुष्पांमाजीं वास नेणती ते नेत्र । घ्राणेविण श्रोत्र व्यर्थ जाण ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देवें व्यापियेलें जग । ज्ञानदृष्टि चांग पाहिजे ते ॥ ४ ॥

३६२ पाहिजे तें ज्ञान सात्विक चांगलें । निर्द्वंद्व एकलें एकनिष्ठ ॥ १ ॥ तेणेंचि तो वसे विश्वामाजीं हरी । बाह्यअभ्यंतरीं वोतप्रोत ॥ २ ॥ असलीया नेत्र सूर्य वस्तू दिसे । पुष्पाचे विकासें फलप्राप्ति ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सत्वगुणीं पूर्ण कृपा । तैंच आत्मरूपा पावशील ॥ ४ ॥

३६३ भेटी होय म्हणों जातां आलें द्वैत । आत्मा अखंडीत सर्वव्यापी ॥ १ ॥ श्रुति-स्मृति-साक्ष सिद्ध ऋषिमतें । आत्म्याविण रितें स्थळ नाहीं ॥ २ ॥ कल्पना ते मनीं वाढली अपार । तेणेंचि अंतर आत्मयासी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे द्वैत जाय जैं कल्पना । तैंच नारायणा पावशील ॥ ४ ॥

३६४ विश्वरूप आत्मा भाविशील जरी । असत्य निर्धारीं विश्वाकार ॥ १ ॥ सद्गुरुकृपा ते होईल जे क्षणीं । वोळखसी जनीं जनार्दन ॥ २ ॥ दिसे तें तें सर्वहि

१ अगदीं; मुळींच २ माशांचें शरीर.

नासेल सर्वथा । अकारलें वृथा भास याचा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे दृश्या अतीत बोलती । तयाची प्रचीति घेई का रे ॥४॥

३६५ दृश्य मिथ्या याचा घेवोनी अनुभव । मग तुझा देव तुजपाशीं ॥ १ ॥ सद्गुरूचे पायीं वोळंगे सर्वस्वीं । मग तुज विश्वीं विश्वंभर ॥ २ ॥ दृष्टि सत्य तेव्हां दृश्य होतें सत्य । तुम्ही यथातथ्य शोध करा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे वाचा वोसरली परा । दृश्यपणा थारा तेथ कैंचा ॥ ४ ॥

३६६ दृश्यत्वींच देव सांपडतां जरी । शास्त्रार्थविचारीं कोण धावे ॥ १ ॥ पाहें विचारोनी आपुलीया देहीं । हिंडशील मही कासयासी ॥ २ ॥ नेत्रासी गोचर होता जरी आत्मा । भजनसंभ्रमा काय काज ॥ ३ ॥ बहिणी म्हणे दृश्य सर्वही मायिक । आत्मा तो सम्यक वेगळाची ॥ ४ ॥

३६७ तीर्थें तपें व्रतें अनुष्ठानें नाना । धरितां धारणा योग मुद्रा ॥ १ ॥ न सांपडे त्यासी तत्त्व आत्मयाचें । जगीं या तें साचें केविं घडे ॥ २ ॥ मास-उपवासीं नाना कृच्छ्रे चांद्रायणें । आत्मतत्त्व यानें दृष्टी न पडे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे चक्रें भेदुनीया मना । कोंडिती पवना जयालागीं ॥ ४ ॥

३६८ वैराग्यविरक्ति साधिती शम दम । धूम्रपानें नेम इंद्रियांचा ॥ १ ॥ परी तें न साधे आत्मतत्त्व तया । अद्यापि संशया न सांडिती ॥ २ ॥ राज्य त्यजूनीया बैसले वनांत । एक ते ध्यानस्थ सर्वकाळ ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देव प्रपंचीं असतां । तरी कां हे अवस्था भोगीत ते ॥ ४ ॥

३६९ एक दिगंबर हिंडताती नग्न । एक ते निमग्न सर्वकाळ ॥ १ ॥ परि त्या अद्यापि न सांपडे सत्य । सोलींव जें तत्त्व विवेकाचें ॥२॥ मुंडिती खंडिती दंडिती देहासी । एक मौनवेषीं हिंडताती ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जटा नखें वाढवूनी । हिंडती अवनी भ्रांतवेषें ॥ ४ ॥

३७० दृश्य नव्हे वस्तु हा खरा निर्धार । वेदेंही साचार हाचि केला ॥ १ ॥ सद्गुरु अंजन घालोनी पहासी । तरिच पावसी आत्मयासी ॥ २ ॥ सगुण मायिक नासेल सर्वथा । निर्गुण पहातां आढळेना ॥ ३ ॥ बहिणी म्हणे आतां विवेकाचा दीप । घेवोनी स्वरूप पाहें डोळां ॥ ४ ॥

३७१ विवेक-वैराग्य सद्गुरूची कृपा । होय तैं सोपा आत्मबोधू ॥१ ॥ नाहीं त्या संदेह निश्चय मानसीं । याचि साधनासी प्रवर्तावें ॥ २ ॥ श्रवणमनन सदा निजध्यास । पुढें होय त्यास साक्षात्कारू ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तुज पावावया निज । उपाय सहज हाचि असे ॥ ४ ॥

३७२ गीतार्थ पाहोन असत्य त्यजावें । सत्यासी भजावें आदरेंसी ॥ १ ॥ मग तूं सहज पावशील सुख । संसारींचें दुःख सर्व नासे ॥ २ ॥ माया-अविद्येचा नाश

विवेकानें । करीं तूं निर्वाण पावशील ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देहीं विरक्ति ठसावें । तरीच पुसावें परब्रह्म ॥ ४ ॥

३७३ वर्णाश्रमसेवा या वेदाचे निमित्तें । कर्म करी त्यातें मोक्ष साधे ॥ १ ॥ चित्त-शुद्धि होय विरक्ति सबळ । ज्ञानेंचि प्रबळ नाश त्याचा ॥ २ ॥ यथोचित कर्मफळाचा तो त्याग । कर्तृत्व-विभाग अहंत्यागें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे कर्मत्याग नाहीं कदा । करावें मर्यादा नुलंघोनी ॥ ४ ॥

३७४ वेदें प्रतिपाद्य केलें असे कर्म । मोक्षाचें हें वर्म पाहोनीयां ॥ १ ॥ परी ते नेणती करितां चुकलें । तेणेंचि पावले जन्म-मृत्यु ॥ २ ॥ ब्रह्मचर्य आणि गृहस्थ वानप्रस्थ । आणिक संन्यास वेदमतें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे वेद बोलिला नेटकें । क्रियेपाशीं सुखें दुःखें येती ॥ ४ ॥

३७५ वेदाऐसी नाहीं माउली आणीक । प्राणियां विवेक सांगितला ॥ १ ॥ परी ते नेणती वेदार्थाचें वर्म । चुकोनिया कर्म आचरीती ॥ २ ॥ वेदाऐसा कैंचा बाप या जगासी । कर्मीचि मोक्षासी पाववीतो ॥ ३ ॥ बहिणी म्हणे वेद मोक्षासी कारण । परी क्रिया जाण पाहिजे ते ॥ ४ ॥

३७६ ब्रह्मचर्यीं जया जाली निर्वासना । तेथेचेनीं जाणा मोक्ष तया ॥ १ ॥ निर्वासना मूळ असावी नेटकी । आश्रमीं विवेकीं वेद बोले ॥ २ ॥ गृहस्थाश्रमीं हेत निमालीया । तेथोनीच तया मोक्ष पाहे ॥ ३ ॥ वानप्रस्थीं विषय-वासना निरसली । मुक्ति हे साधली तेथें तया ॥ ४ ॥ संन्यास घ्यावया मूळ विषय-त्याग । येऱ्हवीं प्रसंग नाहीं खरा ॥ ५ ॥ बहिणी म्हणे वेद प्रमाण तो खरा । आश्रमीं निर्धारा मोक्ष व्हावा ॥ ६ ॥

३७७ वेदाचा आधार सर्वही आश्रमां । वेदासी उपमा नाहीं खरी ॥ १ ॥ यालागीं प्रमाण सर्वांसी हा वेद । आश्रमासी वंद्य महावाक्य ॥ २ ॥ वेद तेंची ज्ञान वेद तेंची ध्यान । वेद करी पावन वर्णमात्रां ॥ ३ ॥ वेद तोची जप वेद तोची तप । वेद तो स्वरूप आत्मयाचें ॥४॥ वेद तेंची तीर्थ वेद अनुष्ठान । वेद तो निर्वाण योगनिष्ठ ॥५॥ वेद तोची योग वेद तोची याग । वेद तो संयोग जीवात्मया ॥ ६ ॥ वेद तोची भाव वेद तोची देव । वेद तोची ठाव सर्वज्ञातें ॥ ७ ॥ बहिणी म्हणे वेद अमान्य जयासी । तैसीया खरासी घडे नर्क ॥ ८ ॥

३७८ वेदार्थ-विचारीं आत्मा दुरी नाहीं । सर्वांतरीं पाहीं ओतप्रोत ॥ १ ॥ परी ते नेणती कल्पनेचे योगें । इंद्रियांच्या संगें भ्रांत जाले ॥ २ ॥ आकाश व्यापक जैसें असे सर्वां । आत्मत्व अनुभवा तयापरी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जैसें अळंकारीं सोनें । आत्मा तेंची खुणें वोळखावा ॥ ४ ॥

३७९ आत्म्यावरी जग विस्तारलें सर्व । विश्वामाजीं ठाव असे तया ॥१॥ पहा अनुभवें आपुलिया मनीं । ब्रह्मीं ब्रह्मपणीं ब्रह्मानंदें ॥ २ ॥ उदकीं तरंग उगवले परी । तृषा ते न करी हरण कीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे बीजीं वृक्ष आहे खरा । विवेकें चतुरा पाहें बापा ॥ ४ ॥

३८० काष्ठामाजीं अग्नि जैसा असे गुप्त । आत्मा सर्वगत तैसा असे ॥ १ ॥ विवेकें करूनी पडिजेल ठायीं । महावाक्य पाहीं शोध लागे ॥ २ ॥ जळीं सूर्यबिंब दिसतसे जैसें । आत्मत्व हें तैसें वोळखावें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे आत्मा सर्वही व्यापक । परी तो निःशंक वेगळाची ॥ ४ ॥

३८१ पद्मपत्र जैसें उदकांत असोन । लिप्त नव्हे जाण जेणेंपरी ॥ १ ॥ तैसाची तो आत्मा विश्वाकार भासे । ज्ञानियासी दिसे वेगळाची ॥ २ ॥ दुधामाजीं लोणी असोनी अलिप्त । नभ अखंडित घटीं भासे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे आत्मा वोळखिजे ऐसा । सद्गुरु-परेशा वोळंगूनी ॥ ४ ॥

३८२ माया कोठूनिया जालिसे निर्माण । इचें अधिष्ठान वोळखावें ॥ १ ॥ सात्त्विक बुद्धिनें सद्गुरूची कृपा । वेदार्थ वेई पां विवेकेंसीं ॥२॥ कोठोनिया जाली कैसी विस्तारली । माया विवंचिली पाहिजे ते ॥ ३ ॥ बहिणी म्हणे माया सत्य कीं असत्य । विचारुनी तथ्य स्वीकारिजे ॥ ४ ॥

३८३ स्फूर्तिरूप जेथें मायेचा उद्भव । प्रपंचासी ठाव मूळ तेथें ॥ १ ॥ ब्रह्म एकलें तें गमेना म्हणोनी । स्फूर्ति हें चिंतनें स्वसंवेद्य ॥२॥ उदकीं बाभूळ होऊन निर्माण । तेणें तें जाण आच्छादिलें ॥ ३ ॥ तैसी जाली जाण ब्रह्मींचीच माया । लपोनिया तया प्रगटली ॥ ४ ॥ अग्निचे पांसाव धूम्राची उत्पत्ति । तयाची प्रदीप्ति लोप करी ॥ ५ ॥ डोळ्याचें पडळ डोळीयासी रोधी । काजळी ते बाधी दीपकासी ॥ ६ ॥ आंब वृक्षीं होय कां बरें निर्माण । तयासीच जाण आच्छादिलें ॥ ७ ॥ बहिणी म्हणे तैसी माया आच्छादित । सद्गुरूचा हस्त नाहीं तरी ॥ ८ ॥

३८४ सत्य म्हणों जरी मायेसी तत्त्वतां । तरी निश्चितार्थी असत्यची ॥ १ ॥ न कळेचि पार इचा विधातिया । वेदांतेंही ठाया नये खरी ॥ २ ॥ असत्य म्हणतां प्रत्यक्ष दिसत । कोण इचा अंत घेऊं शके ॥ ३ ॥ बहिणी म्हणे वाचा खुंटली वर्णितां । कोण तो तत्त्वाचा शोध करी ॥ ४ ॥

३८५ सत्यसत्यातीत मायेसी म्हणतां । आलीसें तत्त्वतां नागवण ॥ १ ॥ बीजेविण वृक्ष कीं द्विजेविण पक्ष । बळेंविण दक्ष केवीं घडे ॥ २ ॥ सूर्याविण रश्मी जळेंविण तरंग । पुष्पेंविण भृंग केवीं पाहें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे माया सत्य वा असत्य । दोहींसी अतीत केवीं घडे ॥४॥

३८६ वांझेच्या पुत्रासी नपुंसककन्या । दिधली त्याच्या लग्ना चला जाऊं ॥१॥ तैसी जाण माया सत्य ना असत्य । तिचें तें शाश्वत केवीं बापा॥२॥ मृगजळें जेवीं तृषा बोळविली । जिवें मेल्या भरली तरळ जैसी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मिथ्या म्हणों नेदी कदा । सत्य याचि शब्दा स्तब्ध ठेलें ॥ ४ ॥

३८७ ऐसा होय व्यवहार । जेणें राहे मन स्थिर ॥ १ ॥ हेंचि मायेचें निरसन । जाणे गुरुगम्य खूण ॥ २ ॥ राहिलीया तळमळ । तोचि उपदेश सबळ ॥ ३ ॥ शब्दज्ञानें करिशी सोस । तेथें कैंचा मायोनाश[१] ॥ ४ ॥ बहिणी म्हणे राहे मौन । हेंचि स्थिरप्रज्ञखूण ॥ ५ ॥

३८८ तळमळ निराकारी । जाली माया तेधी खरी ॥ १ ॥ हा तो अनुभव संतांचा । पाहें ग्रंथीं आहे साचा ॥ २ ॥ रूपीं वेद झाला मुका । इतरांचा कोण लेखा ॥ ३ ॥ नाहीं शब्दाचें तें काम । पाहा शेषें केला श्रम ॥ ४ ॥ बहिणी म्हणे शय्या जाला । तेव्हां अंगीकार जाला ॥ ५ ॥

३८९ हाचि पुराणीं विचार । केला बुद्धि करी स्थिर ॥ १ ॥ करी गुरु उपदेश । तेथें मौनेंची प्रवेश ॥ २ ॥ शब्दमाया नाहीं भिन्न । श्रुतीं सांगितलीं खूण ॥ ३ ॥ शब्द नव्हे रामराम । पार्वतीला सांगे शिव ॥४ ॥ बहिणी म्हणे ब्रह्मरस । सेवीं का रे सावकाश ॥ ५ ॥

३९० म्हणे राम ब्रह्मरूप नाहीं । तोचि खळवादी पाहीं ॥१॥ नामरूप दोन्ही एक । हाचि वेदींचा विवेक ॥ २ ॥ उपनिषदांचें सार । रामरूप निर्विकार ॥ ३ ॥ नाना इतिहास वार्ता । नामरूपींच तत्वतां ॥ ४ ॥ बहिणी म्हणे नामसार । हेंचि उन्मनी निर्धार ॥ ५ ॥

३९१ ऐका चौवाचें विवरण । स्थान मान कळा जाण । देह अवस्था निदान । संकलीत ऐकावें ॥ १ ॥ कोण स्वर कोण वाचा । अभिमानी ह्या देहाचा । शक्ति-स्थान अभिप्राय गुणाचा । बोलिजेल ॥२॥ प्रणवाचा कोण चरण । कोण वेद तेथींचा जाण । हें स्वानुभवें जया ज्ञान । स्वयें तो आपण परमात्मा ॥३॥ हें अनुष्टुप् कथन । पंचिकरणामाजीं विवरण । आशंका नुपजे ऐसियानें । करोनी जाण ठेविलें ॥ ४ ॥ नामें तो ज्ञानप्रकाश । जो कां ब्रह्मविद्येचा सौरसें । आत्मत्वाचा घोष । परम-हंस मुगुटमणी ॥ ५ ॥ त्यामाजीं कार्यकारण । काढियेलें वाचाविवरण । ते ऐकावीं स्थानमानें । संकलित मार्गें ॥ ६ ॥ जेथें महाकारण देह । तेथें तुर्या-वस्था होय । अभिमानी प्रत्यगात्मा पाहें । भोग हे स्वानंदाचा ॥ ७ ॥ स्थान तें मूर्धनी जाण । ज्ञान शक्ति जाणिजे खूण । शुद्ध सात्त्विक तो गुण । मात्रा जाण ओंकाराची । चौथा चरण प्रणवाचा । उद्भव अथर्वण वेदाचा । प्रकाश षोडश

---

१ मायेचा नाश. २ प्रसाद.

कळेंचा । बारा जनींचा राहिवासू ॥ ९ ॥ तेथोंचि हें जाण परावाचा । जेथें उल्लेख उन्मेषाचा । ओघ चाले सत्रावीचा । ब्रह्मानंद सुखाचा राहिवासू ॥ १० ॥ स्थान तें नाभिकमळ । अंतःकरण तें निर्मळ । हें परेचें निजस्थळ । जाणती कुशळ अनुभवी ॥ ११ ॥ पश्यंतीचा जेथें राहिवास । तेथें अष्टदळ कमळाचा विकास । अंगुष्टमात्रप्रमाण प्रकाश । दीपवत क्रीडतसे ॥ १२ ॥ कारण देह सुषुप्तीच्या अवस्था । प्रज्ञाभिमानी आनंदभोग तत्त्वतां । हृदयस्थान शक्ति देखा । गुण तामस वर्तत॥१३॥मकारमात्रा जाण।प्रणवाचा तिसरा चरण । वेद तो आपण।सामके जाणिजे ॥ १४ ॥ तेथें उन्मेषाचा ध्वनि । सूक्ष्म स्वर ये उमटोनी । पश्यंती नाम तिजलागुनी जाणावी सज्जनीं स्वानुभवें ॥ १५ ॥ आतां मध्यमा वाचा जेथ । लिंग देह जाणिजे तेथं । अवस्था ते विशेष । स्वप्न जाणिजे ॥ १६ ॥ अभिमानी तो तैजस प्रत्युक्त भोग सावकाश । कंठस्थानीं राहिवास । करी घोष महानाद ॥१७॥ तेथें जाण द्रवशक्ति । गुण तो रजोगुणस्थी । मात्रा ते उकाराची । प्रणवाचा दुसरा चरण ॥ १८ ॥ तेथें यजुर्वेद आपण । करी घोषाचें उच्चारण । परी वैखरीवांचून । न कळे कांहीं ॥ १९ ॥ आतां वैखरी नांदे जेथें । स्थूळ देह वर्ते तेथ । अवस्था जागृती वर्तते । अभिजाणिजे सुविश्व पैं ॥ २० ॥ युक्त भोग तेथींचा । राहिवास तो नेत्रींचा । गुण सात्त्विकाचा । मिश्रित साचा वर्तत ॥२१॥ मात्रा तीन अक्षरांची । महिमा ते प्रथम चरणाची । जे कां मूळ प्रणवाची । ऋग्वेदाची जाणिजे ॥ २२ ॥ तेथें वैखरीचें स्थान । करी बत्तिसाक्षरां उच्चारण । शब्दापशब्द आपण । कळती जाण उच्चारणीं ॥ २३ ॥ पुढें विस्तारें सांगता । तरी विस्तारेल ही वार्ता । म्हणोनि संकलित कथा । जाण तत्त्वतां सांगितली ॥२४॥ या चौवाचेचें एकाचि स्थान । व्यतिरेकान्वयें केलें आपण । त्यासी म्हणणें आत्मज्ञान । स्वरूपज्ञान कळावया ॥ २५ ॥ वरकड होसी तूं कैं ज्ञानें । धातमात[३] कवित्व बोधणें[४] । पुसों जातां अभिमानें । प्रवर्ते जाण मुष्टिघाता ॥ २६ ॥ परि या ज्ञानाचा सौरसु । मेघोचि तो मंदविलासु । भुलोनि सन्मानदाराच्या सुखासू । तैशा जनासी हें न मानत ॥२७॥ जया स्वहित करणें । तेणें शुद्ध भावार्थ धरणें । करावें अध्यात्मज्ञान शोधणें । जेणें लाभे निधान परब्रह्म॥२८॥ बहिणी म्हणे गुरुकृपा जेथें । ज्ञानासी काय उणें तेथें । परी निष्ठाबळ पाहिजे यथार्थे । तेव्हां भगवंत प्राप्त होय ॥ २९ ॥

३९२ चुंबक चालवी लोखंडा प्रत्यक्ष । क्लेश हे तयास जैसे नाहीं ॥ १ ॥ तेवीं आत्मा सर्व करोनी अकर्ता । पाहें तूं स्वचित्ता वोळखोनी ॥ २ ॥ सूर्याचेनी जेवीं भासे मृगजळ । जनक्रिया सकळ सूर्ययोगें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे आत्मा ऐसा जया कळे । तयाचा मावळे जन्ममृत्यु ॥ ४ ॥

---

१ मुद्दल, भांडवल. २ तेजस्वी. ३ कल्पित व चमत्कारिक गोष्टी. ४ समजावून सांगणें.

# १४ नाममहात्म्यपर अभंग.



३९३ नामसंकीर्तन सदा सर्वकाळ । अखंड प्रेमळ देह ज्याचे ॥ १ ॥ तयासीच भक्ति म्हणावी निर्धार । जाणती उत्तर ज्ञानवंत ॥ २ ॥ क्षण एक काळ जाऊं नेदी रिता । आवडी हे चित्ता पांडुरंगीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जीव जाईल सर्वथा । काळ जाऊं नेदी रिता नामाविण ॥ ४ ॥

३९४ जलाविण मीना होय प्राण सोटी । तैसें नाम पोटीं आवडे ज्या ॥ १ ॥ भक्ति हे तयासी सज्ञान बोलती । येर ते जल्पती वाउगेची ॥ २ ॥ तृषाक्रांता जेवीं उदकाची आवडी । तैसी जया ओढी संकीर्तनीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे वांझ इच्छिती बाळक । तैसें नामसुख आवडे त्या ॥ ४ ॥

३९५ भक्ति नाहीं हाटीं घेईजे विकत । हिंडतां वनांत सांपडेना ॥१॥ चित्ता-चिये साठीं भक्ति हे साधेल । आणिक जे बोल वायांवीण[1] ॥ २ ॥ भक्ति नाहीं पाहीं जाणिवेचे घरीं । धनाढ्यमंदिरीं सांपडेना ॥ ३ ॥ भक्ति नाहीं राजा-प्रधानाचे घरीं । भक्ति नाहीं पारीं चौधरींच्या ॥ ४ ॥ बहिणी म्हणे भक्ति साधावया एक । पाहिजे विवेक पूर्ण देहीं ॥ ५ ॥

३९६ भाव तेथें भक्ति, भक्ति तेथें ज्ञान । ज्ञानें समाधान होय चित्ता ॥ १ ॥ मग तूं सहज समाधि पावसी । चित्त नामापाशीं लीन होतां ॥ २ ॥ संतसमागमीं असोनी श्रवण । सदा सावधान अनुक्रमीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे भक्ति पाहिजे कारण । मग त्या निर्वाणपदप्राप्ति ॥ ४ ॥

३९७ भाव शुद्ध तरी मोक्ष तया शुद्ध । यासी ग्वाही वेद पहा तुम्ही ॥ १ ॥ अशुद्ध तो भाव करी घात सर्व । अंगीं वसे गर्व तयाचिया ॥ २ ॥ भक्ति हेचि मोक्ष भक्ति हीच मुक्ति । भक्ति ते विरक्ति सत्य खरी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे भक्ति पाहिजे सुदृढ । मग तया गूढ कासयाचें ॥ ४ ॥

३९८ गुरुमंत्र देव औषध भावार्थें । फळ एक चित्तें पाहें ऐसें ॥ १ ॥ याचिया निर्धारें भावार्थेंसी भज । हृदयींचें गूज सांगितलें ॥ २ ॥ पाषाणप्रतिमा भावें भजलीया । इच्छितसे तया फळ पावे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ज्याचा भावार्थ चोखट । तयासी वैकुंठ रोकडेंची ॥ ४ ॥

३९९ भावार्थ वाल्मिका आला तो फळासी । जाले सप्तऋषि भावार्थेंची ॥ १ ॥ यालागीं भावार्थ असावा साधकां । करितसे रंकां राज्यानेधि ॥ २ ॥ कौशिकासी

---

१ भय. २ व्यर्थ.

भाव फळा आला सत्य । भावार्थ अगत्य पाहिजे तो ।। ३ ।। बहिणी म्हणे भाव इच्छाफलदानी । पावसी निर्वाणीं मोक्षपदा ।। ४ ।।

४०० भक्तिबळें इच्छा पुरवितो देव । आला अनुभव पुंडलिका ।। १ ।। म्हणोनियां भक्ति असावें कारण । आहे नारायण भाव तेथें ।।२।। पक्क तुलसीपत्रा-आंत प्रवेशून । तुलसी भगवान तुका नये ।। ३ ।। द्रौपदीचीं वस्त्रें स्वयें जाला देव । पोह्यासाठीं गांव सोनीयाचा ।। ४ ।। भाजीचीया पानें तृप्त केले ऋषी । भावें गणिकेसी वैकुंठ तें ।। ५ ।। बहिणी म्हणे भाव तोचि आम्हां देव । नाहीं या संदेह अणुमात्र ।। ६ ।।

४०१ भावार्थाचें दावें देवाचिया गळां । तयासी मोकळा कोण करी ।। १ ।। विचारितां जन्म सोशी गर्भवास । द्वारपाळ त्यास करी बळी ।। २ ।। भावार्थाचे खुंटीं बांधिला हा देव । सोडी ऐसा राव कोण आहे ।। ३ ।। बहिणी म्हणे भावतंतु कोण सोडी । भावार्थ-परवडी देव जाणे ।।४।।

४०२ पांचां विषयांचा समूह एकत्र । होउनी परत्र अंतरलें ।। १ ।। यालागीं संगति उपाय ते भले । आपणही केले तरावया ।। २ ।। कुरंग तो जाण नादासी वेधला । प्राणासी मुकला क्षणामाजीं ।। ३ ।। स्पर्श करोनीयां सांपडला हस्ती । मारी नेम हातीं पहासी तूं ।। ४ ।। पतंग रूपासी भुलोनी दीपकीं । प्राणें गेला दुःखी होउनीयां ।। ५ ।। रसनेचा लोभ धरोनियां मीन । न लागतां क्षण जीवें गेला ।। ६ ।। भ्रमर गुंतला कमलीनी–गंधें । गेला प्राण वेधें तये वेळीं ।। ७ ।। बहिणी म्हणे पांचा विषय पांचजण । वेंचुनियां प्राण न सुटती ।। ८ ।।

४०३ नामेंविण क्षण जाऊं नेदी घडी । चित्तासी आवडी सर्वकाळ ।। १ ।। भजन हें तथा बोलिजे देवाचें । मनें कायावाचे समर्पिलें ।। २ ।। संतसमागमीं श्रवणाची आर्त । चित्तीं अखंडित प्रेमभाव ।। ३ ।। बहिणी म्हणे मन मेणें विषयसुख । नित्य ज्या हरीख नामपाठीं ।। ४ ।।



# १५ ब्रह्मकर्मपर अभंग.



४०४ तपाचें सामर्थ्य आहे बहु मोठें । पाहीं तूं वरिष्ठे मागील ते ॥ १ ॥ विश्वामित्रें सृष्टि केलीसे दुसरी । जाण तपावरी गायत्रीच्या ॥ २ ॥ वसिष्ठें धरित्री दर्भाचिये अग्रीं । ठेविली सामुग्री तपाची हे ॥ ३ ॥ सूर्य-तेज आलें समक्ष साक्षीसी तयाच्या तपासी कोण वर्णी ॥ ४ ॥ अगस्तीनें केलें आचमन सिंधूचें । तप हें तयाचें अति उग्र ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तप जयापाशीं असे । तयासी सायास कासयाचे ॥ ६ ॥

४०५ वर्णांमाजीं एक ब्राह्मण वरिष्ठ । ऐसें मार्गें श्रेष्ठ बोलियेले ॥ १ ॥ म्हणोनी ब्राह्मण पूजावे आदरें । मोक्षाचीं तीं[1] द्वारें प्राणियासी ॥ २ ॥ ब्राह्मणाचे मुखीं सदा वसे वेद । जाणताती भेद अर्थ त्याचा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देव वाहे ज्याची लाथ । हृदयीं विख्यात असे ठावें ॥ ४ ॥

४०६ ब्राह्मणाचे मुखें तृप्त होय देव । पहा अनुभव रोकडा हा ॥१॥ यालागीं ब्राह्मण वंदावें मस्तकीं । शास्त्रें समस्त कीं बोलताती ॥ २ ॥ ब्राह्मणाचे मंत्रें पाषाणीं प्रतिष्ठा । धरिलिया निष्ठा प्रगटे देव ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देव कलियुगीं हेचि । ऐसी हे वेदाची असे साक्ष ॥ ४ ॥

४०७ ब्राह्मणाचें तीर्थ प्राप्त होय जया । पृथ्वीचींही तया घडती तीर्थें ॥ १ ॥ यालागीं ब्राह्मण श्रेष्ठ सर्वांपरी । जयाचिये द्वारीं सर्व सिद्धि ॥ २ ॥ ब्राह्मणाची कृपा होय जयावरी । कल्याण तो वरी कल्प कोटि ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ज्याचे दर्शनेंचि पाप । जाय आपोआप जळोनियां ॥ ४ ॥

४०८ ब्राह्मणाची सेवा घडे एक क्षण । इच्छा होय पूर्ण अंतरींची ॥ १ ॥ म्हणोनी तयासी भजावें पूजावें । आदरें घालावें लोटांगण ॥ २ ॥ ब्राह्मणाचे काजें वेंचलिया प्राण । इंद्रपदीं जाण वास तया ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसे ब्राह्मण हे थोर । मोक्ष हा किंकर तयांपाशीं ॥ ४ ॥

४०९ ब्राह्मणाची आज्ञा देव वंदी शिरीं । मुक्ति आज्ञाधारी जयापाशीं ॥ १ ॥ यालागीं ब्राह्मण तारक कलियुगीं । धन्य तेचि जगीं सेविती त्या ॥ २ ॥ ब्राह्मणाचे देहीं मूर्त भगवान । वेद तो आपण मुखीं जया ॥ ३ ॥ बहिणी म्हणे त्यांचें काय वर्णूं एक । शरीर विवेकरूप त्यांचें ॥ ४ ॥

---

१ 'तीं' हा शब्द जुन्या प्रतींत आहे, व तो उक्त आहे. 'पाठभेद' सं० वि. ना. कोल्हारकर, २ पेक्षां

४१० चहूंवर्णांमाजीं वरिष्ठ ब्राह्मण । समीपता जाण मुक्ति त्यांसी ॥ १ ॥ ब्रह्मची ब्राह्मण बोलताती श्रुति । वचन वंदिती लोकत्रय ॥ २ ॥ ब्राह्मण जालीया नाहीं अधोगति । देव सर्व ध्याती ब्राह्मणासी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जें हें गायत्रीचें स्थळ । पहा या केवळ देह ज्यांचे ॥ ४ ॥

४११ ब्राह्मण कोणासी म्हणावे निश्चित । पहावा हा अर्थ विवेकेंची ॥ १ ॥ मग ते वंदावे भजावे सप्रेमें । मोक्षदानी नेमें वेदवाक्य ॥ २ ॥ जीव, देह, जाति, वर्ण, कर्म, धर्म । पहावें तें वर्म शोधोनियां ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ज्ञान । पांडित्य ब्राह्मणीं । विवेकेंकरोनी पहा चित्तीं ॥ ४ ॥

४१२ जीव हा ब्राह्मण म्हणावा इत्यर्थ । तरी येथें अर्थ सांपडेना ॥ १ ॥ सर्वांठायीं जीव सारिखाचि एक । पशु पक्षी देख चांडाळादि ॥ २ ॥ पुढें जीव होती मागें बहु झाले । ब्राह्मणत्व आलें नाहीं तया ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जीव प्राणिमात्रीं एक । ब्राह्मणत्व देख म्हणों नये ॥ ४ ॥

४१३ देहाचे ब्राह्मण म्हणों जरी आतां । न घडे तत्त्वतां विवेक दृष्टि ॥ १ ॥ विचारोनी आधीं ब्राम्हण तो कोण । मग तूं भजोन सुखें राहें ॥ २ ॥ देह हें सर्वांचे एकाचि जाणिजे । पंचभूतें सहजें तें सर्वांठायीं ॥३॥ तारुण्य वार्धक्य बालत्व देहासी । जाणावें जिवासी स्थान तेंचि ॥ ४ ॥ देह तेथें जीव जीव तेथें देह । ब्राम्हण तो काय म्हणों तया ॥५॥ बहिणी म्हणे सर्व योनींसी शरीरें । सारिखींचि बा रे विवंचितां ॥ ६ ॥

४१४ जरा मृत्यु भय सर्वांसीं समान । तरी ते ब्राम्हण म्हणों कैसे ॥ १ ॥ यालागीं विवेक धरोनी मानसों । ‘ ब्राम्हण ’ पदासी वोळखावें ॥ २ ॥ मातापितयाच्या जालिलें शरीरा । ब्रम्हहत्या नरा केविं नोहे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देह ब्राम्हण तो नव्हे । विवेक-वैभवें विचारितां ॥ ४ ॥

४१५ आतां वर्ण हाची ब्राम्हण म्हणावा । तरी तो अनुभवा नये कांहीं ॥ १ ॥ ब्राम्हण वेगळा वर्णाही अतीत । पहातां निश्चित भासतसे ॥ २ ॥ श्वेत तो ब्राम्हण क्षत्रिय आरक्त । वैश्य वर्ण पीत नाहीं ऐसें ॥३॥ कृष्ण वर्ण शूद्र नाहीं ऐसा भेद । आयुष्याचा बांध सारिखाची ॥ ४ ॥ बहिणी म्हणे वर्ण ब्राम्हण तो नव्हे । विवेचूनि पाहें मनामाजीं ॥ ५ ॥

४१६ आतां ‘ याती ’ लागीं म्हणावें ब्राम्हण । तरि तें निर्वाण नये चित्ता ॥ १ ॥ निरसोनी सर्व विचारा वेदांतें । उरे तें आयतें वोळखावें ॥ २ ॥ ऋषि श्रृंगी झाला मृगीचिये पोटीं । गौतम शेवटीं कुशास्तरणीं ॥ ३ ॥ जंबुक तो ऋषि

जन्मला जांबुळीं । वाल्मीकाची कुळी वारुळीं ते ॥ ४ ॥ कैवर्तकी-पोटीं व्यास तो जन्मला । विश्वामित्र जाला क्षत्रणीचा ॥ ५ ॥ वसिष्ठाचा जन्म उर्वशी-उदरीं । अगास्ति निर्धारीं कलशोद्भव ॥ ६ ॥ नारद प्रसिद्ध ठाउका सर्वांसी । दासी हे तयासी प्रसवली ॥ ७ ॥ बहिणी म्हणे याति नव्हेचि ब्राम्हण । ब्राम्हणाची खूण वेगळीच ॥ ८ ॥

४१७ म्हणों जरी आतां ब्राह्मण पंडितां । न मानें तत्त्वतां मना तेंही ॥ १ ॥ जाणता विवेक निवडी तो बरा । ब्राह्मण तो खरा ज्ञानवंत ॥ २ ॥ क्षत्रिय वैश्य शूद्र ब्राह्मणादि सर्व । पांडित्य अपूर्व करिती सर्व ॥ ३ ॥ पद-पदर्थांचें करिती विवरण । सर्व वर्ण जाण काव्यअर्थ । अविंधादिक ही करिती पांडित्य । ब्राह्मण त्या तथ्य कोण मानी ॥ ४ ॥ बहिणी म्हणे ऐसें वोळखावें जनीं । ब्राह्मण निर्वाणीं कोण ऐसे ॥ ५ ॥

४१८ आतां म्हणों जरी कर्म तें ब्राह्मण । चहूं वर्णीं जाण कर्म आहे ॥ १ ॥ म्हणोनी म्हणावें कर्मिक ब्राह्मण । आहे तेचि खूण वेगळीच ॥ २ ॥ आपुल्याचि कर्मीं वर्तताती वर्ण । तयासी ब्राह्मण म्हणों नये ॥ ३ ॥ बहिणी म्हणे कर्म विचारितां पाहें । ब्राह्मणत्व नोहे कर्मासी तें ॥ ४ ॥

४१९ शास्त्रासी प्रमाण आपुलालें कर्म । वर्णांचा स्वधर्म आचरती ॥ १ ॥ तयांसी ब्राह्मण कैसेनि बोलिजे । विचार हा कीजे मनामाजीं ॥ २ ॥ कोणे वर्णीं कर्म शास्त्र न बोलेची । आज्ञा समर्थांची सर्वांवरी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे वेदप्रमाणें चालती । सर्व त्या बोलती ब्राह्मण केवीं ॥ ४ ॥

४२० आतां धर्म यासी म्हणावें ब्राह्मण । तरि हें अप्रमाण दिसतसे ॥ १ ॥ ब्राह्मण ते भिन्न जाण ते जाणती । ज्ञानी ओळखती आत्मदृष्टी ॥ २ ॥ ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य-शूद्रां जाण । धर्म हा प्रमाण सांगितला ॥ ३ ॥ अन्नदानद्रव्यगोदानादि सर्व । चहूंवर्णीं भाव सारिखाचि ॥४॥ बहिणी म्हणे धर्म नव्हे तो ब्राह्मण । ब्रह्मपरीक्षण वेगळेंची ॥ ५ ॥

४२१ स्वर्गलोकप्राप्ति होय जया धर्में । ब्राह्मण उत्तम तेही नव्हती ॥ १ ॥ ब्रह्म जाणे तोचि ब्राह्मण बोलिजे । येर तें सहजें ब्रह्मबीज ॥ २ ॥ नाना यज्ञ दान अनुष्ठान तप । ब्राह्मणाचें रूप तेंही नोहे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे किती सांगावें मनासी । ओळखी हे कैसी ब्राह्मणाची ॥ ४ ॥

४२२ ब्राह्मण तो एक सांगेन इत्यर्थ । जेणें हा वेदार्थ सांठविला ॥ १ ॥ वेदांहीं प्रमाण तोचि असे केला । वरिष्ठ तो भला गुरु सर्वां ॥ २ ॥ थोर नाहीं दुजें

---

१ ' मनासी ' च्या ऐवजी ' जनासी ' असा शब्द असायला पाहिजे होता: परंतु जुन्या व नव्या प्रसिद्ध झालेल्या प्रतींतही ' मनासी ' हाच शब्द आढळतो; वास्तविक पहातां मनास बोध नसून जनाला आहे कारण बाईंना ब्राम्हणधर्म पूर्णपणें माहित होता; त्या ब्राम्हणच होत्या !

ब्राह्मणावांचाना । कैवल्य ज्याचेनी प्राप्त होय ॥ ३ ॥ मोक्षा अधिकारी जयाचेनि शब्दें । जळती प्रारब्धें दृष्टिमात्रें ॥ ४ ॥ ब्रह्म-ब्राह्मणासी नसे अणु भेद । साधा हें निर्द्वंद्व तयापाशीं ॥ ५ ॥ बहिणी म्हणे चिन्ह कोण त्याचें जाणे । विवेकें शहाणे वोळखती ॥ ६ ॥

४२३ गुणांत असोनी गुणांसी नातळे । क्रियेसी नाकळे अणुमात्र ॥ १ ॥ तोचि गा ब्राह्मण वोळखावा जनीं । द्वैत जया स्वप्नीं आढळेना ॥२॥ षडूर्मीरहित षड्-भाव नातळे । दोषांचेनि मेळें सांपडेना ॥ ३॥ बहिणी म्हणे सत्य न संडी सर्वथा । ब्राह्मण तत्वतां तोचि एक ॥ ४ ॥

४२४ निर्विकल्प जया समाधि जोडली । चित्तासी अमोलीं परब्रम्हीं ॥ १ ॥ तोचि एक खरा ब्राम्हण वेदार्थें । आणिक तीं मतें पाखंडाचीं ॥ २ ॥ सर्वांभूतिं एक आत्मा देखियेला । शांतीचा वोतिला मूर्तिमंत ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जैसं आकाश सर्वत्र । तैसा तो एकत्र जगामाजीं ॥ ४ ॥

४२५ अंतर्बाह्य एक अखंड अद्वय । प्रत्यक्ष प्रमेय अनुभवें ॥ १ ॥ तयासीच जाण म्हणावें ब्राह्मण । जयाचें निर्वाण परब्रह्मीं ॥ २ ॥ अनपेक्षा जयाचें आंदण हें जाण । करतल विज्ञान हातीं वसे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे काम क्रोध सर्व गेले । तेथेंचि राहिलें ब्राह्मणत्व ॥ ४ ॥

४२६ शमदम सर्व साधिले नवगुण । संतोषें संपन्न सर्वदा जो ॥ १ ॥ ब्राह्मण वरिष्ठ श्रेष्ठाचाही श्रेष्ठ । जयाचेनि भ्रष्ट मोक्ष पावे ॥ २ ॥ तृष्णा मोह दंभ गेला अहंकार । वृत्ति निर्विकार सर्व कर्मीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ज्याची निमाली वासना ब्राह्मण तो जाणा ब्रह्मनिष्ठ ॥ ४ ॥

४२७ ब्रह्मभाव देहीं सदासर्वकाळ । ब्राह्मण केवळ तोचि एक ॥ १ ॥ श्रुति स्मृति साक्ष करोनी बोलिले । नाहीं म्यां ठेविलें गुज कांहीं ॥ २ ॥ ब्रह्मींच सर्वदा वर्तती इंद्रियें । ब्राह्मण तो होय याचि अर्थें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ब्रह्मीं नांदे तो ब्राह्मण । यातीशीं प्रमाण नसे तेथें ॥ ४ ॥

४२८ हरिकथा करी म्हणे हरिदास । संतवृत्ति त्यास संत म्हणती ॥ १ ॥ क्रिये-पाशीं नाम आपण ठसावें । नलगे सांगावें सकळ लोकां ॥ २ ॥ सोन्याचे घडणार सोनार त्या म्हणती । वैद्य तो म्हणती वैद्यकीनें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तैसें ब्रह्म जेथें नांदे । ब्राह्मण तो वेदें प्रतिष्ठिला ॥ ४ ॥

४२९ ब्रह्म जाणे तोचि बोलिजे ब्राह्मण । वेदाचें वचन साक्ष यासी ॥ १ ॥ पहा अनुभव आपुलिया देहीं । शास्त्राचिया ग्वाही करोनियां ॥ २ ॥ द्वादशकला या जया अंगीं तेज । सूर्य तो सहज न बोलतां ॥ ३ ॥ राजचिन्ह अंगीं राजा तोचि

एक । करी जो कनक परिस तोचि ॥ ४ पुरवील काम तीच कामधेनु । वारील मरणु अमृत तें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तैसा ब्रह्माचा जाणता । ब्राह्मण तत्त्वतां तोचि एक ॥ ६ ॥

४३० ज्ञाननिष्ठ सदा लक्षी लक्षयुक्त । चित्त तें विरक्त विषयभोगी ॥ १ ॥ तोचि एक जगीं ब्राह्मण निर्धार । पहा चमत्कार मनामाजीं ॥ २ ॥ फलाचीहि आस नाहीं मनामाजीं । वर्ततां सहजीं स्वधर्मींचि ॥ ३ ॥ बहिणी म्हणे दुजें न देखें आणीक । ब्राह्मण तो एक वोळखावा ॥ ४ ॥

४३१ भक्ति ज्ञान आणी वैराग्य मानसीं । वेद जाण त्यासी प्राप्त जाले ॥ १ ॥ तोचि रे ब्राह्मण जाण ब्रह्मवेत्ता । आणीक तत्त्वतां द्विजोत्तम ॥ २ ॥ विरक्ति हे सत्य जया अंगीं भार्या । ज्ञानाग्नि ज्ञानिया साग्निक जो ॥ ३ ॥ गुरुवचनीं सर्व नित्यनैमित्तिक । अखंड विवेक आत्मयाचा ॥ ४ ॥ शांति दया क्षमा भाव तो निजबोध । अपत्यें प्रसिद्ध जया हो तीं ॥५॥ बहिणी म्हणे ऐसें देखोनियां चिन्ह । तयासी ब्राह्मण वेद बोले ॥ ६ ॥

४३२ सद्गुरूचें वाक्य तेंचि अग्निरूप । समिधास्वरूप वासना ते ॥ १ ॥ ऐसा तो साग्निक बोलिजे ब्राह्मण । विषयां मारून शेषभोक्ता ॥ २ ॥ अविद्या स्मृतीसी कामक्रोधयुक्त । होऊनी यथोक्त आश्रमी तो ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसे ब्राह्मण ते सत्य । वेदार्थ निश्चित हाचि खरा ॥ ४ ॥

४३३ सद्गुरुवचनीं ज्ञानाग्नि प्रगटला । हृदयीं राहिला जयाचिये ॥ १ ॥ तयासीच जगीं ब्राह्मण म्हणावें । सांगितलें स्वभावें मनाचिया ॥ २ ॥ विषयांचा होम ज्ञानाग्नींत करी । पूर्णाहूति खरी मनाची ती ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐशा चिन्हीं चिन्हांकित । ब्राह्मण निश्चित तोचि एक ॥ ४ ॥

४३४ एक ते ज्योतिषी एक ते पाठक । अग्निहोत्री एक तीर्थाटनी ॥ १ ॥ परब्रह्म जाणे तोचि कीं ब्राह्मण । देव तो आपण प्रत्यक्षचि ॥ २ ॥ एक ते पंडित वैदिक ते एक । गायत्री नेटक ब्राह्मण ते ॥३॥ बहिणी म्हणे एक वीर्यमात्र बीज । ऐसें तें सहज सांगितलें ॥ ४ ॥

४३५ पिंडब्रम्हांडासी करोनियां ऐक्य । मनीं महावाक्य-बोध झाला ॥ १ ॥ तयासी ब्राह्मण बोलिजे साचार । ब्रह्मसाक्षात्कार प्रत्यक्ष हा ॥ २ ॥ मी-तूंपणाचा सबलांश सांडिला । जीव शिव केला ऐक्य ज्ञानें ॥ ३ ॥ महाकारणादि देह चार पाहें । शोधोनियां जाये तूर्यपदा ॥ ४ ॥ सोहं हंस मंत्र अखंड उच्चार । समाधि साचार अखंडत्व ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ब्रह्मवेत्ते हे ब्राह्मण । यांचिया दर्शनें मुक्ति जोडे ॥ ६ ॥

४३६ एकाचा निश्चय गुरुवचनीं मुक्ति । एक ते मांडिती निर्गुणध्यान ॥ १ ॥ परि आहे मोक्ष वेगळाचि जाण । ज्ञानी ते निर्वाण साधिती हो ॥ २ ॥ सगुणचि मोक्ष एकाचिये मतें । आकाररहित मोक्ष म्हणती ॥ ३ ॥ एक ते भाविती मोक्ष भक्ति ज्ञान । वैराग्य साधन म्हणती मोक्ष ॥४॥ एक सिद्धलिंगाचि म्हणतात मोक्ष । शास्त्र तेंचि मोक्ष म्हणती एक ॥ ५ ॥ एक ते स्वाचारें मोक्ष प्रतिष्ठिती । फलत्यागी म्हणती मोक्ष एक ॥ ६ ॥ मनोजय एक कल्पिताती मोक्ष । ध्यानाचा तो पक्ष मुक्ति म्हणती ॥ ७ ॥ एक महत्तत्त्व विचारें स्थापिती । मद्यमांस घेती मोक्षहेतु ॥ ८ ॥ एक ते इंद्रियें आचरती यथेष्ठ । तोचि मोक्ष स्पष्ट मानिताती ॥ ९ ॥ एक ते वेदाचे पठणोंचि म्हणती । मोक्ष एक म्हणती प्रपंचातें ॥ १० ॥ एक क्लेशें जाणा दंडिती देहासी । म्हणती मोक्षासी हेतु हाचि ॥ ११ ॥ एक ते पंचाग्नि धूम्रपान वनीं । मोक्ष हाचि जनीं स्थापिताती ॥ १२ ॥ एक ते संन्यासी जटिल तापसी । मोक्ष हा तयासी स्थापिती ते ॥ १३ ॥ एक पंचीकरणें पहाती सर्वदां । म्हणती मोक्षपदा हेंचि मूळ ॥ १४ ॥ एक मौनी जपी तपी अनुष्ठानी । भावितातीं कोणी मोक्ष येणें ॥ १५ ॥ एक पंचमुद्रा लाविती आपण । म्हणती मोक्ष जाण येणें होय ॥ १६ ॥ एक तीं दैवतें ध्याती नानापरी । मोक्ष हा अंतरीं मानिताती ॥ १७ ॥ बहिणी म्हणे मोक्ष आहे तो निराळा । जाणती ते कला ज्ञानवंत ॥ १८ ॥

४३७ नानापरी जन कल्पिताती मोक्ष । परी तो प्रत्यक्ष नसे कोणा ॥ १ ॥ वासनेच्या क्षयें मोक्ष तो सांपडे । 'तत्त्वमसि' जोडे आत्महित ॥ २ ॥ त्वंपद तत्पद ऐक्य जैं होईल । ' असि ' पदीं मूळ सांपडेल ॥ ३ ॥ बहिणी म्हणे वृत्ति होती जैं निश्चळ । तुटे तैं पडळ प्रपंचाचें ॥ ४ ॥

४३८ श्रोत्र आणि त्वचा चक्षु जिव्हा घ्राण । ज्ञानेंद्रियें जाण पांच ऐसीं ॥ १ ॥ याहुनी वेगळा आत्मा तो निश्चयें । अनुभवें पाहें मनामाजीं ॥ २ ॥ वाचा पाणि पाद शिश्न आणि गुद । कर्मेंद्रियें सिद्ध पांच ऐसीं ॥ ३ ॥ अंतःकरण मन बुद्धिचित्त चौथें । अहंकार येथें पांचवा तो ॥ ४ ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध जाण । विषय दारुण पांच ते हे ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसा पंचाविसां शोध । तत्पदींचा बोध करीं मना ॥ ६ ॥

---

१ याठिकाणीं नव्या वहीत ' भ्रष्ट ' असा शब्द आहे. जुन्या वहीचीं पानें फाटल्यामुळें तीत हा अभंग आम्हांस पहाण्यास मिळाला नाहीं. परंतु अर्थदृष्ट्या 'स्पष्ट' हा शब्दच युक्त दिसतो.'दास-विठू'कोल्हारकर. २ या ठिकाणीं ' उक्त ' म्हणजे योग्य या अर्थाचा शब्द पाहिजे होता. 'हेतू' हा सप्रयोजक दिसत नाहीं. सं. 'दास-विठू'कोल्हारकर !

४३९ पंच कोश आणि ताप जे त्रिविध । ईषणा प्रसिद्ध हारपल्या ॥ १ ॥ तयासी ब्राह्मण बोलिजेती सत्य । विचारोनी सत्य सांगितलें ॥ २ ॥ षडूर्मी आणीक षड्भाव देहींचें । विचारेंही साचे वोसंडीले ॥ ३ ॥ बहिणी म्हणे इच्छा-निरास हा जेथ । ब्राह्मण तो सत्य ब्रह्मवेत्ता ॥ ४ ॥

४४० वाचे लक्ष याचा जया अंगीं बोध । 'सत्' शब्द स्वानंद सांपडला ॥१॥ तोचि ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण बोलिजे । विज्ञान सहजें देह त्याचें॥२॥ ज्ञप्ति अखंडता पूर्ण-ता बाणली । समाधि लागली असंप्रज्ञ ॥ ३ ॥ बहिणी म्हणे चिन्ह हेंचि ब्राह्म-णाचें । निश्चयें शास्त्राचे सांगितलें ॥ ४ ॥

४४१ सत् शब्दीं समर्पी स्वधर्माचें फळ । होउनी अढळ ब्रह्मनिष्ठ ॥ १ ॥ तयासी ब्राह्मण म्हणों आम्ही शुद्ध । मोक्ष तो प्रसिद्ध भेटी होतां ॥ २ ॥ अहंकार अंगीं जयासी न साहे । कर्तेपणीं नये दुजेपण ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसे ब्राह्मण भेटतां । ब्रम्हसायुज्यता घरां आलें ॥ ४ ॥

४४२ देव अंतरला योगही लोपला । भाव दुऱ्हावला प्राणियासी ॥ १ ॥ काय करावें तें संचित वोखटें । विषय गोमटे वाटताती ॥ २ ॥ नाम नये मुखीं नाव-डेचि भक्ति । जिवासी विरक्ति चिंता देते ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संत साधु महानु-भाव । नावडे तो ठाव पातक्यासी ॥ ४ ॥

४४३ जडलेंसें चित्त विषयीं सर्वदा । नये ब्रम्हबोधा आत्मनिष्ठे ॥ १ ॥ पूर्वील संचित नाहीं शुद्ध ज्याचें । देह पातकाचे वोतीव ते ॥ २ ॥ अहंकार देहीं काम क्रोध लोभ । आवडे अशुभ कर्म ज्यासी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे श्रेष्ठां न मानी प्रमाण । तेचि एक हीन वोळखावे ॥४॥

४४४ अंधालागीं जेवीं उदयेला भानु । कोल्हिया चंदनू व्यर्थ जैसा ॥ १ ॥ ज्ञानहीन तेवीं आत्मा हा प्रत्यक्ष । नये मना साक्ष मूर्खपणें ॥ २ ॥ चंद्राचा प्रकाश कावळ्यांसी पाहें । वानरांसी काये वस्त्रें होतीं ॥ ३ ॥ बहिरियासी काय गीत तानमान । श्वानासी प्रमाण जयापरी ॥ ४ ॥ नपुंसका जेवीं पद्मिनी सुंदरा । प्राणाविण नरा भोग जैसा ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तैसा सन्मार्ग मूढासी । बोधितां तयासी सिद्ध नाहीं ॥ ६ ॥

४४५ नाहीं जया हेत प्रीति ते सुबुद्धि । वैराग्याचा विधि ठाउकी हे ॥ १ ॥ तया ज्ञानप्राप्ति न घडे सर्वथा । मोक्षाची ते कथा केवीं तेथें ॥ २ ॥ काय तो संदेह असे या अर्थासी । पाहिजे क्रियेसी अंगीं बळ ॥ ३ ॥ बहिणी म्हणे हेत धरी जैसा भक्त । तेणेंचि तो मुक्त होय भावें ॥ ४ ॥

४४६ घृतासी तो संग अग्नीचा जालिया । मीठ घातलीया जलामाजीं ॥ १ ॥ संगाचा स्वभाव लागला जयासी । सामर्थ्य तेजासी सहज जाण ॥ २ ॥ लोखंड परिसा झटाटलें जेव्हां । मोघासी तें किंवा वृक्षवल्ली ॥ ३ ॥ बहिणी म्हणे चंद्र पौर्णिमेसी द्रवें । सिंधूसी हेलावे सहज येती ॥ ४ ॥

४४७ हिंगाचिया संगें कापूर नासला । लवणें विध्वंसिला क्षीरयोग ॥१॥ म्हणो नियां संग करावा तोंवरी । जो हो सौख्य-कारी प्राणियासी ॥२॥ केशरकाजळांसी संगत जालीया । काजळाचा तया संग लागे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संग धरावा तो ऐसा । मोक्ष तो आपैसा होय जेणें ॥ ४ ॥

४४८ चंदनाचा संग जालिया निंबासी । चंदनत्व त्यासी ठसावलें ॥ १ ॥ तैसा संतसंग कळला जाणिजे । विवेक हा कीजे मनामाजीं ॥ २ ॥ पुष्पाचे संगतीं तंतूचाही मान । तुलसीसंगें जाण मृत्तिकेतें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे संग करीं रे नेटका । धरूनियां टेका आत्मनिष्ठा ॥ ४ ॥

४४९ ब्रम्हत्वाची खूण जप गायत्रीचा । जो सर्व वेदाचा मूळमंत्र ॥ १ ॥ तयाहून परतें आहेसे सांगतीं जाणावे ते मतिमंद हीन ॥ २ ॥ गुणसाम्य ऐसी म्हणती मूळमाया । गायत्री ते जया ब्रम्हरूप ॥ ३ ॥ अकार उकार मकाराचें बीज । ओंकाराचें निज उन्मनी हे ॥ ४ ॥ इजपासुनीया जाले वेदविद । गायत्री प्रसिद्ध वेदमाता ॥ ५ ॥ बहिणी म्हणे जया गायत्रीचा जप । तो ब्रह्मस्वरूप केवळ जाणा ॥ ६ ॥

४५० वर्णाश्रम धर्म शुद्ध आचरावा । भगवंत धरावा एका भावें ॥ १ ॥ ऐसें जो न करी ब्राम्हणाचा तो धर्म । जाणावा अधम पापदेही ॥ २ ॥ आधीं स्नान-संध्या गायत्रीचा जप । करावा निष्पाप अष्टोत्तरशत ॥ ३ ॥ त्यावरी मग तर्पण करावें । धर्म हा स्वभावें विप्रालागीं ॥ ४ ॥ गीता रामनाम जपावें सादर । घेवोनी विचार प्रेमभावें ॥ ५ ॥ मग यथाविधि देवाचें पूजन । धूपदीप जाण मंत्र-युक्त ॥ ६ ॥ नैवेद्य वाढोनी वैश्वदेव कीजे । प्रांतीचें ठेविजे स्विष्टकृत ॥ ७ ॥ नैवेद्य करोनी स्विष्टकृत कीजे । शेवटींचें दीजे बलिदान ॥ ८ ॥ तये काळीं कोणी आला जो अतीत । जाणावा भगवंत देवरूप ॥ ९ ॥ आधीं पूजा त्याची मग इत-रांची । त्याउपरी भुक्तीची पंक्ति कीजे ॥ १० ॥ ग्रासोग्रासीं देव आठवावा जाण । न करावें भोजन असाक्षी तें ॥ ११ ॥ बहिणी म्हणे येणें कर्मब्रम्हनिष्ठ । रोकडें वैकुंठ प्राप्त त्यासी ॥ १२ ॥

---

१ संत बहिणाबाईंचे वेळी ' माघ फाल्गुन॥ वसंतऋतु ' असा प्रघात असावा असें या चरणावरून मानणें प्राप्त आहे.

४५१ वेद तो जीवात्मा । वेद तो परमात्मा । ब्रह्मसुखमाहिमा । ज्याचेनी हा ॥ १ ॥ वेद नव्हता जेव्हां ब्रम्हांड कैंचें तेव्हां । सुखदुःख भोगणें जीवा । कासया पाहें ॥ २ ॥ ओंकार ब्रम्हींचा बिंदु । तेथुनी उपजला वेदू । त्रिगुणेंसी वाढला भेदू । ब्रम्हांडाकारें ॥ ३ ॥ ऊर्ध्वमूळ अधोशाखा । प्रसवला वेद देखा । खांद्या पत्रपुष्प सर्वथा । निर्माण जाल्या ॥ ४ ॥ छंदपदजटाक्रम । अरण्य-ब्राम्हण जाण । विस्तारला वेद आपण । ब्रम्हस्वरूप ॥ ५ ॥ कर्म तेंचि ब्रम्ह जाण । ब्रम्ह तेंचि कर्म आपण । कर्मब्रम्ह नाहीं भिन्न । वेदार्थ बोले ॥ ६ ॥ तत्त्वार्थ वेदींचा अर्थु । वेदांताचा मातितार्थु । जेणें निरसे संसार भेदू । अद्वयबोधें ॥ ७ ॥ अद्वय ऐसें हें वचन । दुसरें नव्होचि हें जाण । स्वसंवेद्य अवघा आपण । सर्वीं सर्वत्र ॥ ८ ॥ भूतमात्रीं व्यापक । तोचि तूं वर्तत् देख । व्यातिरेकान्वयें सुख । अनुभवें पाहें ॥ ९ ॥ बहिणी म्हणे वेदान्वयें । ज्ञान तें निखळ लाहे । वरकड तें मालिन होये । अंधाचिये परी ॥ १० ॥

४५२ कर्माआदि अंतीं मध्यें ब्रम्हभाव । जाणे तो अनुभव ज्ञानियाचा ॥ १ ॥ ऐसिया स्थितीचे ब्राम्हण ते खरे । येर ते पामरे वोळखावे ॥ २ ॥ ॐकार आदरीं तत्कारें समर्पीं । सत्कारें स्वरूपीं ऐक्य करीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तेही ब्रम्हची निभ्रांत । अनुभवोनी तथ्य लीन होय ॥ ४ ॥

---

# १६ श्रीक्षेत्र पंढरी-श्रीपंढरीनाथ-पर अभंग.



४५३ ब्रम्हांड पंढरी हे आजी जाली खरी । मुखीं नाम घेतां हरि हरि ॥ १ ॥ सुख सुखावलें कोणा । सांगूं गे माये । जिकडे पाहें तिकडे माझा हरि भरला आहे ॥ २ ॥ सरली भ्रांति; हारपला देहभाव । महामहासीही नुरे जेथें ठावाठाव ॥ ३ ॥ गेलें मीपण हारला भावाभाव । बहिणी म्हणे देखियला पंढरीचा राव ॥ ४ ॥

४५४ माझा दीनानाथ दीनबंधु हरि । नांदे भीमातीरीं पंढरीये ॥ १ ॥ विटे नीट उभा समचरण साजिरे । पाऊलें गोजिरीं सुकुमार ॥ २ ॥ वैजयंती माळा रुळतसे गळां । कांसेसी पिंवळा पीतांबर ॥ ३ ॥ भाळीं ऊर्ध्व पुंड्र कानीं कुंडलें गोमटीं । चंदनाची उटी सर्वांगासी ॥ ४ ॥ शिरीं टोप साजे रत्नांचा साजिरा ।

काढियेला तुरा मोतियांचा ॥ ५ ॥ शोभती दंतपांक्ति जैशा हिऱ्यांच्या ज्योति । बहिणी म्हणे तया १याती हृदयामाजीं ॥ ६ ॥

४५५ जन्मोनियां जोडा जोडिली संसारीं । सांपडली तीरीं चंद्रभागे ॥ १ ॥ घनःश्याम मूर्ति सांवळी डोळस । उभी सावकाश विटेवरी ॥ २ ॥ नामरूपातीत चैतन्य शाश्वत । आत्मस्वरूपस्थित प्रगटली ॥ ३ ॥ वेदा अगोचर श्रुतीहूनिया पर । निर्गुण निर्विकार पहातो गे ॥ ४ ॥ अखंड चिद्धन दिसे सर्वसाक्षी । बहिणी तया लक्षी हृदयामाजीं ॥ ५ ॥

४५६ लाचावलें मन नव्हे त्या वेगळें । देखिलें सांवळें परब्रह्म ॥ १ ॥ जाली तन्मयता हालेना पापणी । घेत असे धणी स्वरूपाची ॥ २ ॥ विसरलें मन आपलें आपण । पडोनि ठेलें शून्य मी-तूंपणा ॥ ३ ॥ नाठवे तें मीपण पडला विसरू । इंद्रियव्यापारू पारूषला ॥ ॥ ४ ॥ राहिलीं इंद्रियें अचेतन वृत्ति । मना आत्मस्थिति लागलीसे ॥ ५ ॥ लागल्या पैं वृत्ति खुंटली हे गति । बहिणी तें भोगिती आत्मसुख ॥ ६ ॥

४५७ चालतां पाऊल पंढरीचे वाटे । ब्रम्हसुख भेटे रोंकडोंचि ॥ १ ॥ पहातां एसें सुख नाहीं त्रिभुवनीं । तें पहावें नयनीं पंढरीसी ॥ २ ॥ गाता हरिनाम । वाजवितां टाळी । प्रेमाचे कल्लोळीं सुख वाटे ॥ ३ ॥ दिंडीचा गजर होतो जयजयकार । मृदुंग सुस्वर वाजताती ॥ ४ ॥ हमामा टिपरी घालिती हुंबडी । होवोनियां उघडी विष्णुदास ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसा आनंद वाटेचा । कोण तो दैवांचा देखे डोळां ॥ ६ ॥

४५८ चला झटझटा वोसंडुनी वाट । पंढरी मूळपीठ दूरी आहे ॥ १ ॥ सोडा आडकथा वोसंडा मारग । वाट पांडुरंग पहातसे ॥ २ ॥ स्वहितांची जया असेल तांतडी । तेणें घडी घडी काळ साधा ॥३॥ गेलिया दिवस पडले अंधारी । ही ना तैसी परी थार नाहीं ॥ ४ ॥ पडो देह राहो, धरावा निर्धार । पांडुरंगीं भाव सांडूनये ॥ ५ ॥ बहिणी म्हणे आजी जावें वेळोवेळ । तरीच पर्वकाळ साधिजेला ॥६॥

४५९ सर्वांगव्यापिनी भीमेचा माहिमा । वर्णावया ब्रह्मा अनिर्वाच्य ॥ १ ॥ धन्य ते दैवाचे पंढरीचे लोक । घेती प्रेमसुख विठोबाचें ॥ २ ॥ भीमा–चंद्रभागासंगम जे ठायीं । वानावा तो काई माहिमा तेथें ॥ ३ ॥ त्याहीवरी जेथें पंढरीचा देव । काय सांगूं भाव क्षेत्रमाहिमा ॥ ४ ॥ तिहींचा संगम घडे जये ठायीं । सांगावा तो काई माहिमा त्याचा ॥ ५ ॥ ऐसीया क्षेत्रींचा माहिमा ऐकतां । पापाचिये वार्ता स्वप्नीं नाहीं ॥ ६ ॥ स्नानदान घडे देवाचें दर्शन । तेथें जन्ममरण

---

१ वाट.

काय करी ॥ ७ ॥ फिरे सुदर्शन सदा सर्वकाळ । काळ आणि वेळ कैंची तेथें ॥ ८ ॥ स्नानालागीं देव येताती मिळूनि । बैसुनी विमानीं मध्यान्हींसी ॥ ९ ॥ ऐसा क्षेत्रमहिमा कोण वर्णी सीमा । नकळे अधमा असोनियां ॥ १० ॥ धन्य पुंडलीक धन्य त्याचा भाव । क्षेत्राचा अनुभव वाढविला ॥ ११ ॥ बहिणी म्हणे पुण्य पाहिजे तें गांठीं । न्हावयातें भेटी विठोबाची ॥ १२ ॥

४६० धन्य ते दैवाचे वारकरी साचे । अंकित विठोबाचे जन्मोजन्मीं ॥ १ ॥ ऐसियांची भेटी होतां हितगोष्टी । सुखाचिया कोटी हेळावती ॥ २ ॥ कोण सांगूं पुण्य पंढरीच्या लोकां । अखंड श्रीमुखा न्याहाळीती ॥ ३ ॥ चंद्रभागे स्नान देवाचें दर्शन । अखंड कीर्तन महाद्वारीं ॥ ४ ॥ करिती जयजयकार मिरवे दिंडी-भार । गर्जे पैं अंबर नामघोषें ॥ ५ ॥ प्रपंचपरमार्थ अवघा सुखरूप । कळि-काळा मुख स्वप्नीं नाहीं ॥ ६ ॥ तुळसीवृंदावन पद्मरांगोळिया । कुंकुमाच पाहा सडे द्वारीं ॥ ७ ॥ कामधाम अवघें जालें विठ्ठलरूप । पंढरीचे लोक विठ्ठल पैं ॥ ८ ॥ वोखदासी पाप न मिळे पाहतां । ब्रह्मसायुज्यता पंढरीये ॥ ९ ॥ जीवन मुक्तदशा पंढरीं पाळणीं । ब्रह्म हें गोठणी विठ्ठल वेषें ॥ १० ॥ पंढरीवरून येती जाती जीव । मुक्तीचा निर्वाह पशुपक्ष्यां ॥ ११ ॥ बहिणी म्हणे आम्ही धन्य जालों सुखी । येतां नाम मुखीं पंढरीचें ॥ १२ ॥

४६१ पंढरीचें सुख काय सांगों आतां । जेथें चारी वाचा वोसरल्या ॥ १ ॥ जेथें पुंडलिकें केला राहिवास । धन्य त्याचा वंश मातापिता ॥ २ ॥ पंढरीचा महिमा कोण करी सीमा । वर्णावया ब्रह्मा अनिर्वाच्य ॥ ३ ॥ बहिणी म्हणे क्षेत्र पंढरीसारिखें । ऐसें हें न देखें भूमंडळीं ॥ ४ ॥

४६२ उदंड ऐकिला उदंड गाईला । उदंड देखिला क्षेत्रमहिमा ॥ १ ॥ पंढरी-सारिखें नाहीं क्षेत्र कोठें । जरी तें वैकुंठ दाखविलें ॥ २ ॥ ऐसी चंद्रभागा ऐसें भीमातीर । ऐसा विटेवर देव कोठें ॥ ३ ॥ ऐसें वाळुवंट ऐसी हरिकथा । ठाईं ठाईं देखा दिंडीभार ॥ ४ ॥ ऐसे हरिदास ऐसें प्रेमसुख । ऐसा नामघोष सांगा कोठें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे आम्हां अनाथांकारण । पंढरी निर्माण केली देवें ॥ ६ ॥

४६३ चोविसां मूर्तीसी आसन मुद्राध्यान । पांडुरंग जाण निर्गुणरूप ॥ १ ॥ ज्याचे पायीं जन्म देवां आणि तीर्थां । मूर्ति ते तत्त्वतां विठोबाची ॥ २ ॥ वेदां आणि शास्त्रां अकार हा मूळ । सर्वांचें समूळ पांडुरंग ॥ ३ ॥ विटेचा संकेत पांचवी अवस्था । ब्रह्मसायुज्यता शुद्धरूप ॥ ४ ॥ करीं हात दोन्ही खुणाची दाखवी । अनेक एकत्वीं पहा कैसें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तया लुब्धलें हें मन । धन्य जया खूण कळों आली ॥ ६ ॥

४६४ तीर्थी तीर्थराव ती एक पंढरी । पाहतां पृथ्वीवरी आणिक नाहीं ॥ १ ॥ धन्य ते दैवाचे घेती प्रेमसुख । सदा नामघोष मुखीं वसे ॥ २ ॥ भीमा चंद्रभागा दोहींचा संगम । नांदे मेघश्याम पांडुरंग ॥ ३ ॥ पुण्यपुष्पावती तीरीं वेणूनाद । सप्रेम गोविंद क्रीडा करी ॥ ४ ॥ बैसोनी विमानीं येती देव तिन्ही । काळ हा साधुनी मध्याह्नींसी ॥ ५ ब्रह्ममय क्षेत्र पंढरी पट्टण । म्हणोनी श्रेष्ठ जाण बहुतां गुणें ॥ ६ ॥ कर्मब्रह्मकाशी नामब्रम्ह पंढरी । सर्व ब्रह्मगिरी खलुविद ॥७॥ पंढरी-माझारीं ब्रम्हत्रयवास । म्हणोन विशेष पंढरी हे ॥८॥ बहिणी म्हणे पंढरी सर्वांही वरिष्ठ । ऐसा श्रुती स्पष्ट बोलताती ॥ ९ ॥

४६५ धन्य धन्य ते पंढरी । जेथें नांदतो श्रीहरि ॥ १ ॥ धन्य धन्य चंद्रभागा । जेथें वास पांडुरंगा ॥ २ ॥ धन्य धन्य ते पद्माळ । जेथें राहिले गोपाळ ॥ ३ ॥ धन्य धन्य वेणूनाद । जेथें क्रीडतसे गोविंद ॥ ४ ॥ धन्य धन्य वाळुवंट । जेथें उभा पायीं विट ॥ ५ ॥ धन्य धन्य पुंडलिक । हरि साधियेला देख ॥ ६ ॥ धन्य धन्य पुष्पावती । जेथें वृंदा हे श्रीपती ॥ ७ ॥ बहिणी म्हणे धन्य धन्य । पांडुरंगीं जे अनन्य ॥ ८ ॥

---

# १७ ( हरिभक्तमहिमा ) पंढरीमहात्म्य.



४६६ ऐका हरिभक्ताचा महिमा । केली पुंडलीकें थोर सीमा । गवसणी घातली व्योमा । पुरुषी पुरुषोत्तमा साधिलें ॥ १ ॥ पुंडलिकाऐसा पतित । नसे त्रिभुवनीं अपवित्र । पितराची मर्यादा न पाळित । गालीप्रदानें समर्पी ॥ २ ॥ पितरें जें सांगावें । तें पुंडलिकें न ऐकावें । शिव्यागाळीस द्यावे । आणि संपादावें पापासी ॥ ३ ॥ ज्या पितराचेनि हा संसारू । सुखाचे भोगिजे सुखतरु । त्या पितरांचे मांडिले चारु । ऐसा पुत्र निपजला ॥ ४ ॥ ऐसें करितां किती एक दिवशीं । असोनि चालिला वाराणशीं । सर्वे कर्मभोग घेवुनी पुत्र विवशी । क्रमित वाट चालिला ॥ ५ ॥ तंव भाग्योदयकाळ आला । पापाचा संग्रह तुटला । उभयांचा भोग सरला । दिवस उदेला पुण्याचा ॥ ६॥ जेविं गाय सांपडे वाघा । ते हरि बळेपैं गा । अवचट धावणें पावे वेगा । तेविं या उभयवर्गी देव पावला ॥ ७ ॥ जेविं

पाषाणीं फुटे झरा । कीं वांझ प्रसवली पुतरा । तेल्हातीं केस अंतरा । उपजला मोह पुंडलिका ॥ ८ ॥ देखोनि पवित्राचरण । पुंडलीक त्रास घेत मानून । म्हणे मी घोर पापी गहन । चुकलों भजन पितरांचें । कोण पाप होतें ताटीं । पितृ-व्यांशीं केली आटाआटी । ऐसा कळवळोनी पोटीं । पाय कवटाळी पितरांचे ॥१०॥ म्हणे काय करावी वाराणशी । मातापितर हेचि माझी काशी । मुरडोनि आला माण देशासी । अटक वनासी प्रार्थिलें ॥ ११ ॥ सभोंतीं बारा योजनें । देखोनी अंतीं दंडकारण्य । स्वनी येती पक्षी जाण । न पडे कदा दृष्टीसी ॥ १२ ॥ अत्यंत वृक्षाची दाटणी । झेपावल्या दिसती गगनीं । जेथें सूर्याचे दर्शनीं । मोकळीक असेचिना ॥ १३ ॥ ऐसें भयानक वन । तेथें पुंडलीक राहिला जाण । पाहोनी सरोवराचें जीवन । केलें नामग्रहण चंद्रभागा ॥ १४ ॥ तेथें आरंभिली सेवा । पुंडलिका उपजला भावा । मानित मातापिता देवा । जडला सद्भावा चरणीं त्यांच्या ॥ १५ ॥ ऐसे जाले कितिएक काळ । तंव देखिलें नारदें एके वेळ । म्हणे हा तो येथें प्रबल । कोण भक्तराव उदेला ॥ १६ ॥ देखोनि पुंडलिकाची निष्ठा । जडली देहा पूर्ण काष्टा । दृश्य सासेनीया अनिष्टा । नेणो हृदयस्था भेटी जाली॥१७॥ देखोनियां भरतमुनि । जाला हर्ष मुक्तअंतःकरणीं । थोर कौतुक वाटलें मनीं । अश्रु नयनीं लोटतां ॥ १८॥ नारदें देखोनी निष्ठा । त्वरें गेला वैकुंठा । म्हणे नवल देखिलें भगवंता । हर्ष चित्तां न समाये ॥ १९ ॥ सप्रेमें दाटला कंठ । बोलतां कांपती ओठ । नयनीं होत अश्रुपात । म्हणे भगवंत काय जालें ॥ २०॥ देवें अलं-गिला हृदयीं । नारदासी म्हणे सांग कांहीं । नवल वर्तलें लवलाहीं । तें गुज कांहीं सांगपां ॥ २१ ॥ तंव नारद म्हणे नारायणा । मी गेलों होतो भ्रमणा । तेथें देखिलें नवल जाणा । त्या वचना ऐकावें ॥ २२ ॥ मृत्युलोकाठायीं । दंडकारण्य नाम पाहीं । मानदेश अभिधानेंही । तेथें ठायीं देखिलें ॥ २३ ॥ भ्रमण करित गेलों तेथें । तंव अवचितां देखिलें नवलातें । संतोष वाटला चित्तातें । तें तुज हृदयीं ठाउकें ॥ २४ ॥ तया अरण्यामाझारीं । द्विज एक पितृसेवा करी । त्याची देखोनियां भजन-कुसरी । काय वानूं थोरी तयाची ॥ २५॥ वायु उफराटा नेववेल हें भूगोल पालथें घालवेल । अग्निप्रवेशही करवेल । परी तद्भक्ति-नवल सांगवेन ॥ २६ ॥ विषाचे कवल घेववती । सद्दा समुद्र कोरडे करवती । परी तद्भक्तीचे अपार शक्ति । तें चांज तुजप्रती काय सांगों ॥ २७ ॥ वरकड साधनें ते काये कोण त्याचें नवल पाहें । साधनापरीसया पाहें । मज तो नव्हे साध्यता ॥ २८ । त्याची भक्ति देवा पहातां । नेणें पावाल तादात्म्यता । कीं हे ब्रह्मसायुज्यता

१ तळ हाती ( ? ) २ पूर्ण. ३ मावत नाहीं. ४ कौशल्य. ५ इतर; बाकीचे ६ साधता ( ? )

आली तत्त्वतां रणांगणासी ॥ २९ ॥ ऐकोनी भक्तीचें रहस्य । देवाचे उचंबळलें मानस । हातीं धरूनिया नारदास । गुप्त रूपेंसी निघाले ॥ ३० ॥ सेजीं होती रुक्मिणी । तीसही साकळण-करूनी । गरुडासही सोडूनी । निघाले चक्रपाणि नारद ॥ ३१ ॥ पहा हा देव भक्तशिरोमणि । भक्तासाठीं चालिला चरणीं । उडी घातली वैकुंठाहुनी । आला क्षणीं मान देशीं ॥ ३२ ॥ सर्वे नारदा माझारिया । वन उपवन दावितसे देवराया । अवचित दाखिलें भक्तराया । तया पुंडलीकासी ॥ ३३ ॥ देवें देखोनी पुंडलीकासी । विस्मित झाला थोर मानसीं । पुंडलीक न देखंचि तयासी । चाड मानसीं धरोचिना ॥ ३४ ॥ मग नारद बोलिला मात । पुंडलिका आले रे भगवंत । जयासाठीं येवढे क्लेशार्थ । तो धावत आला पाहें ॥ ३५ ॥ पुंडलीक जाला एकनिष्ठ । फिरोनी न करीच दीठें । दिली भिरकावुनी वीट । तीवर वैकुंठ उभें ठेलें ॥ ३६ ॥ ठेवोनियां हात कटीं । टाकलें ब्रह्म विटीं । नखाग्रीं लावुनी दृष्टि । ब्रम्ह सृष्टि न्याहाळित ॥ ३७ ॥ नेणो मुद्रा लागली खेचरी । तटस्थता लागली शरीरीं । दृष्टि ठेवुनी पुंडलिकावरी । जाला अंगभरी श्रीविठ्ठल ॥ ३८ ॥ जयाच्या अंतरीं प्रवेशे देव । तयासी पुसीं संसाराचा ठाव । व्यापकपणें नांदे स्वयमेव । देखोन सद्भाव भक्तीचा ॥ ३९ ॥ पुंडलिकाची देखोन भक्ति । धावोनि आला वैकुंठपति । पुंडलिकाची निजस्थिति । प्रवेशला चित्तीं । हारे त्याचे ॥ ४० ॥ देखोन पुंडलिकाचा भावो । वास केला तया ठावो । वाहविला कीर्तीचा महिमा वो । पंढरी नाम स्थापियलें ॥ ४१ ॥ येरीकडे वैकुंठभुवनीं । उठोनी पाहे जंव रुक्मिणी । तंव न दिसे चक्रपाणि । थोर चिंतनीं पडियेली ॥ ४२ ॥ गरुडासी जंव पाहे । तंव तो द्वारींच उभा आहे । मग म्हणे कटकंटा माये । काय झालें कळेना ॥ ४३ ॥ कोणीकडे निजें केलें । नेणो कोणाचें धावणें काढिलें । ऐसें कोण सांकडें पडिलें । मौनेंच गेले श्रीपति ॥ ४४ ॥ गरुडासी म्हणे रुक्मिणी । आज विपरीत गमतें गा मनीं । न पुसतां गेले चक्रपाणि । भक्तशिरोमणी कोण भेटला ॥ ४५ ॥ तंव जाला हाहाकार । देव मिळाले सवळें । म्हणती थोर जालें नवल । नेणो गोपाळ कोठें गेले ॥ ४६ ॥ नित्य दर्शना पडिलें पाणी । उदास झाली वैकुंठ भुवनीं । जैसी विधवा अलंकारोनी । कोण जनीं मंडिता ॥ ४७ ॥ देव करिताती रुदन । रुक्मिणी आक्रंदती गहन । थोर प्रळय मांडिता जाण । न लगे मार्ग भगवंताचा ॥ ४८ ॥ तंव अकस्मात नारदमुनि । रुक्मिणीनें देखिला नयनीं । पुसती जाली तयालागुनी । दीनवाणी जगन्माता ॥ ४९ ॥ वैकुंठींचे सकळ देव । हाहाकृत देखिला भाव । मग सांगितला

१ नियंत्रण. २ दृष्टि, नजर. ३ हाय ! हाय ! ४ तत्काळ. ५ वाया जाऊं लागलें.

निर्वाह । चिंता न करा म्हणतसे ॥ ५० ॥ मृत्युलोकाचे ठायीं । पुण्यशील देश पाहीं । पुंडलीक नामें द्विजदेही । करी निर्वाण अनुष्ठान ॥ ५१ ॥ महा वृक्षांची दाटणी । अग्रें झपावती गगनीं । रवि पहातां नयनीं । सर्वकाळ अंधारू ॥ ५२ ॥ ऐसीया वनाचे ठायीं । पुंडलीक ब्राम्हण पाहीं । पितृसेवा निर्वाही[1] । चंद्रभागा-सरोवरीं ॥ ५३ ॥ त्याचा पहावया भाव । गेला वैकुंठींचा राव । देखोनि भक्ति-भाव । देवाधिदेव राहिवासले ॥ ५४ ॥ देखोन पुंडलीकाची निष्ठा । नेणो चांगली पूर्ण काष्टा । उणें आणुनी वैकुंठा । राहिवासले देखा वैकुंठपति ॥ ५५ ॥ ऐकोनी नारदाची मात । धावोनि आले देव तेथें । विटीं देखोनि भगवंत । मौन मांडित राहिले ॥ ५६ ॥ श्रुतिशास्त्रश्रवण । करिती ब्रम्हादिक गण । परी तो नारायण । अणुमात्र वदेना ॥५७॥ मग म्हणती रे कटकटा । कोणी देखिली पुंडलीकनिष्ठा । उभें केलें वैकुंठा । चमत्कार मोठा भक्तीचा ॥ ५८ ॥ नाना उग्र साधनें । एक साधिती प्राणपानें । ब्रह्मांडीं नेला आत्मा जाणें । तेथेंही नारायण साधेना ॥५९॥ या वेगळे अनेक । करिती साधनें सोसून दुःख । परि भगवंत न सांपडे देख[2] । तो कोणे सुखें रातला ॥ ६० ॥ ऐसा करितां विचार । ज्ञानें निवडितां साारासार । तंव सांपडला भक्तीचा आगर । सेवा थोर पितरांची ॥६१॥ मग म्हणती हा भक्ति-राणा । जाणे ब्रह्मप्राप्तीच्या खुणा । प्रत्यक्ष साधिला वैकुंठराणा । खिळून वदन उभा केला[3] ॥६२॥पहा तें मूळ दंडकारण्य । त्याहींवरतें ब्रह्मारण्य । तीर तरी चंद्रभागा जाण । देखोनि मन आनंदे ॥ ६३ ॥ ऐसीयावरी हा भक्तराणा । उदेला दिसे रवि जाणा । देवें जाणुनी पुंडलीक-खुणा । राहिवास जाणा केला सुखें ॥ ६४ ॥ ऐसा जाणोनि अंतर्भाव । देवेंही केला निर्वाह[4] । ठेविलें पंढरपूर नांव । वसविलें गांव पुंडलीकाचें ॥ ६५ ॥ रुक्मिणीसहवर्तमान । आले समस्त ऋषिगण । दुजें केलें वैकुंठभुवन केलें नामग्रहण भूवैकुंठ ॥ ६६ ॥ ऐसी चंद्रभागा ऐसें भीमातीर । ऐसें वाळूवंट पुंडलीक भक्तवीर । ऐसे देव ऐसें नगर । जयजयकार कोठें महाद्वारां ॥ ६७ ॥ ऐशा पताका ऐशीं निशाणें । शंखभेरी वाजती गहने । ढोल दमामे तुरे जाणे । टाळ मृदंग वाजती ॥ ६८ ॥ घरोघरीं तुळसीवृंदावन । पद्मांकित रांगोळी जाण । कुंकुमार्चित सडे गहन । त्रिकाळ जाण पूजा करिती ॥ ६९ ॥ धन्य धन्य तेथींचे लोक । नगर नागरीक देख । पतंग भृंग पशुपक्षादिक । तरुवर धन्य झाले ॥ ७० ॥ क्षेत्रावरून जाती येती । हो का नर-पशु-पक्षि-याति । पंचक्रोशीमाजीं जे सांपडती । त्यासी अधोगति नसेचि ॥ ७१ ॥ या पंढरीचा महिमा ऐकतां । नासे कोटी ब्रह्महत्या । या पंढरीस वास करितां । चिंता तयासी कासयाची

१ खरी स्थिति. २ कठिण. ३ खरी करून दाखवी. ४ मर्यादा.

॥७२॥ ऐसी कथा ऐसें निरूपण । या पंढरीचें करितां श्रवण । तेणें बेचाळीस कूळ होय उद्धरण । जन्ममरण चुकलें त्या ॥ ७३ ॥ इतुका पुंडलीकाचा महिमा । वाढला भक्तिरसप्रेमा । थोर केली भक्तीची सीमा । पुरुषीं पुरुषोत्तमा साधिलें ॥ ७४ ॥ बहिणीचा निजभाव । जाला पंढरीसी निर्वाह । पांडुरंगीं जडला भाव । जाला ठाव निजपदीं ॥ ७५ ॥

---

# १८ पतिव्रताधर्मपर अभंग



४६७ पतिव्रता धर्म ऐका गे साजणी । धन्य ज्या गोर्तिणी पुण्यशील ॥ १ ॥ येगोंचि श्रवणें मुक्ति होय जीवा । पतीविण देवा नाठविती ॥ २ ॥ आपणां आपण ओळखिलें जिनें । धन्य तेचि जाणें पतिव्रता ॥ ३ ॥ प्रपंच परमार्थ चालवी समान । तिनेंच गगन झलियेलें ॥ ४ ॥ कर्म तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि कर्म । ऐसें जिनें वर्म जाणियेलें ॥ ५ ॥ अखंडित ध्यास भगवंताचा चित्ता । तेचि पतिव्रता तिन्ही लोकां ॥ ६ ॥ रागद्वेष मनीं जाणिवेचा फुंँ । न धरिजे संग अधर्माचा ॥ ७ ॥ इंद्रियाच्या वृत्ति विधीनें सांवरी । न दिसे अंतरीं द्वैतभाव ॥ ८ ॥ साधुसंतसेवा पतीचें वचन । पाळी तेचि धन्य पतिव्रता ॥ ९ ॥ शांतिक्षमादया पाळी भूतकृपा । जाणोनी स्वरूपा पतीचिया ॥ १० ॥ पतीचें वचन अमृतासमान । धन्य तिचा जन्म मातापिता ॥ ११ ॥ बहिणी म्हणे तिनें जिंतिलें संसार । वैकुंठींचा थोर केला तिनें ॥ १२ ॥

४६८ परपुरुषाचें काय सांगों सुख । हरे सर्व दुःख संसाराचें ॥ १ ॥ म्हणोनीया संग धरावा तयाचा । सकळ सुखाचा सुखदाता ॥ २ ॥ परपुरुषाचें देखतां चरण । उँपरमे मन सुखावोनी ॥ ३ ॥ परपुरुषाचें देखतां स्वरूप । कोटि सूर्यदीप हारपती ॥ ४ ॥ परपुरुषाचें सुख लाधे जरी । उतरोनी करीं सीस ठ्यावें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे काय न कळे पुण्य केलें । सुख हें लाधलें परपुरुषाचें ॥ ६ ॥

४६९ पतीचीया बोला सर्वस्वें उदार । न भंगे उत्तर जीव जातां ॥ १ ॥ धन्य ती संसारीं जाति गोत-कूळ । वैकुंठींचें मूळ तियेलागीं ॥ २ ॥ कायावाचा-

---

१ कुलस्त्रिया. २ ज्ञानाचा. ३ अभिमान. ४ जिंकला. ५ आश्रय. ६ परमेश्वराचें. ७ तुष्ट होई. ८ मस्तक.

मनें पतीसी शरण । खेळे ब्रह्मज्ञान तिचे द्वारीं ॥ ३ ॥ पापपुण्य कांहीं न विचारितां मनीं । पतीच्या वचनीं जीव देई ॥ ४ ॥ विधीचें भजन अखंड शेजारीं । जैसी ते कामारी दासी पाहें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तिनें उभयही कुळें । तारीयेलीं बळें पतिधर्में ॥ ६ ॥

४७० ऐका ग साजणी स्वहिताच्या कोणी । सांगतां हें मनीं धरा बाई ॥ १ ॥ आपुल्या संसारा कांहीं हित करा । सांगताहें धरा मनाभाव ॥ २ ॥ पाहिजे तें पुण्य सुकृताचे कोडी[2] । तेव्हां लागे गोडी परपुरुषीं ॥ ३ ॥ परपुरुषीं रातली[3] स्वप्रेमें मातली । तिची काय बोली येरें[4] आतां ॥ ४ ॥ स्वसुखें रातली जनांत नाहली । निघूनियां गेली लोकाचारीं ॥ ५ ॥ क्रियानष्ट धर्म आचरूं लागली । वाळीसी टाकिली गणगोतीं ॥ ६ ॥ न कळे याति-कुळ-नांवरूप कोण । गेली पैं रिघोन त्याजसवें ॥ ७ ॥ तियेचेनि नांवें फोडावी घागरी । नाहीं ते संसारीं बहिणी म्हणे ॥ ८ ॥

४७१ ऐसी कोण आहे उदार जीवाची । गोडी घेत याची मनोभावें ॥ १ ॥ आपुलेनि हातें घरां लावी आगी । मग सुख भोगी संगें त्याच्या ॥ २ ॥ जनवाद लोक बोलती अपार । न संडी निर्धार संग त्याचा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे कायावाचामनें प्राण । परपुरुषालागोन रातलीसे ॥ ४ ॥

४७२ सांडियेली लाज लौकिकव्यवहार । मांडियेले चार परपुरुषीं ॥ १ ॥ आतां आम्हांसवें काय जनां चाड । कासयाची भीड धरूं बाई ॥ २ ॥ लोकलाज शंका सारिला पडदा । परपुरुषीं सदा रंळी करूं ॥ ३ ॥ मान-अपमाना नाहीं आम्हां काज । एकांताचें गुज सेवूं बाई ॥ ४ ॥ बहिणी म्हणे तोंड नलगे दावावें । ऐसें केलें देवें काय करूं ॥ ५ ॥

४७३ धन्य त्रिभुवनीं वंद्य पतिव्रता । जी निजहिता प्रवर्तली ॥ १ ॥ ऐसीयाची भेटी होतांचि लौकरी । पापाची बोहरी होय तेणें ॥ २ ॥ स्वपति जिनें वोळखिला चित्तीं । धन्य ती जगतीं त्रिभुवनीं ॥ ३ ॥ श्रवणीं तोचि ऐके मननीं तोचि देखे । निजध्यास सुखें घेत असे ॥४॥ अणुमात्र वृत्ति नव्हे तिची भिन्न । सदा समाधान स्वामिसुखें ॥ ५ ॥ दृश्यत्व तिमिरा सारोनियां मागें । सदा स्वामिसंगें उभी शेजीं ॥ ६ ॥ स्वामीचें बोलणें खुणाचि जाणणें । मौनेंचि करणें विहित कर्म ॥ ७ ॥ बोलतां तें मौन अकारा ना शून्य । गुण ना निर्गुण वर्ततसे ॥ ८ ॥ अद्वैतानिराळें ब्रह्मांडावेगळें । ते सुखसोहाळे भोगीतसे ॥ ९ ॥ जीवनाचें

---

१ सेवक. २ वीस ही संख्या. ३ रममाण झाली. ४ दुसरी. ५ घागर फोडावी म्हणजे मेली असें समजावें. ६ लडिवाळपणानें धरलेला हट; विनोद. ७ नाश.

जीवन असंगीं समाधान । त्रिपुटी विलक्षण नांदतसे ॥ १० ॥ ज्ञेय-*ज्ञप्तीज्ञान राहिले संपोन । निजानंदघन होउनी ठेलें ॥ ११ ॥ होउनी ठेली वृत्ति अवघी पोरूषली । तेथें कोण बोली बोलूं आतां ॥ १२ ॥ ऐसी स्थिति जया स्त्रीशी वा पुरुषा । धन्य तेचि देखा पतिव्रता ॥१३॥ बहिणी म्हणे धन्य तेचि जन्मा आली । कीर्ति विस्तारली त्रिभुवनीं ॥ १४ ॥

---

# १९ करुणापर अभंग.



४७४ मोठेपण तुझें घेतलें विकत । अजामिळें सुत पाचारीतां ॥ १ ॥ वर्म हें कळलें अकस्मात तुझें । नामेंच पाविजे तुझे पायीं ॥ २ ॥ गणिका शुकासी पाचारितां अंतीं । अहेतुक चित्तीं पावलासी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तुझी किल्ली सांपडली । आतां व्यर्थ बोली करूं नये ॥ ४ ॥

४७५ तुज पावावया मार्ग असंख्यात । बावरलें चित्त होतें माझें ॥ १ ॥ नाम निःसंदेह सांपडलें वर्म । आतां माझें प्रेम पालटेना ॥ २ ॥ कर्मीचें कचाटें वोसंडील कोण स्त्रीदेह तो जाण असे माझा ॥ ३ ॥ योगाच्या अभ्यासें आड येती सिद्धि । तयामाजीं बुद्धि स्थिर नोहे ॥ ४ ॥ ज्ञान तों अगम्य नयेची समता । तेथें नव्हे चित्ता समाधान ॥ ५ ॥ बहिणी म्हणे नाम आम्हां ये सांगातीं ।याची माझी गति एक झाली ॥ ६ ॥

४७६ नामरूप दोन्ही जावळीं भावंडें । एकासवें घडे घात एका ॥ १ ॥ पहा तो अनुभव जाणोनी अंतरीं । दिसे अलंकारीं सोनें जैसें ॥ २ ॥ आकारासी नांव जोडलें निश्चित । निराकार तेथ दुजें कायी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे स्वरूप नामाही वेगळें । भावी त्या कळे गुह्य गोष्टी ॥ ४ ॥

४७७ भीमानिकटदेशीं तूं पुंडलीका वर देसी । जडजीवतारक परियेसी पांडुरंग ॥ १ ॥ कटीं कर ठेवुनि वचनें । उद्धरसी जगरचने । साधुसंगती धावसी सुचनें तूं पांडुरंगा ॥ २ ॥ न दिसे योगतपें सहसा । मुक्तिपद हरि तूं विरसा बहिणी म्हणे दीनतारका जगदीशा । तूं पांडुरंगा ॥ ३ ॥

४७८ संचिताचें पुरें वाहवलें होतें । नाम अवचितें सांपडलें ॥ १ ॥ धरोनी आधार निघालें बाहेरी । जालासी कैवारी पांडुरंगा ॥ २ ॥ अविद्येच्या डोहीं होतें

---

१ नष्ट झाली. २ खटपट. ३ टाकील. ४ निवृत्त; विन्मुख; *ज्ञेय. जाणावयास योग्य (ज्ञप्ति) ज्ञाता; जाणता.

मी बुडालें । नाम तुझें जालें तारूं मज ॥ ३ ॥ बहिणी म्हणे भ्रम-भोंवरीया आंत जातां जीव तेथं नाम आलें ॥ ४ ॥

४७९ भ्रमाचिया सर्पें डंखीयलें मज । धांव चतुर्भुज गारुडीया ॥ १ ॥ पाहतोसी काय जीवहत्या शिरीं । पडेल निर्धारीं पांडुरंगा ॥ २ ॥ विषय-वाघुरी सांपडलें आंत । कामाग्निही तेथ साह्य झाला ॥ ३ ॥ बहिणी म्हणे व्याधें करुनी सिद्ध बाण । लाविला निर्वाण पाहूं नको ॥ ४ ॥

४८० तुम्ही आम्ही सुखें होतों एके ठायीं । कोणते अन्यायीं सांपडलों ॥ १ ॥ तुझ्याचि हितानें वाढला संसार । आम्ही कां रे दूर अंतरलों ॥ २ ॥ महत्वाचे असे केले आम्हां भक्त । म्हणसी आम्ही मुक्त बद्ध तुम्ही ॥ ३ ॥ बहिणी म्हणे नको आम्हांपुढें शब्द । सांगतां हा वाद हारविसी ॥ ४ ॥

४८१ तुजपाशीं फार असे चतुराई । आम्हांपाशीं कायी उणें आहे ॥ १ ॥ तुम्ही आम्ही एक एकाचि गांवींचे । विसरलों त्यानें फळ मागें ॥ २ ॥ तुझेठायीं ऐसें नसावें सर्वथा । थोरपण वृथा वागवीसी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मूळ आम्हां तो न सांडे । नका होऊं वेडे पांडुरंगा ॥ ४ ॥

४८२ फार दिवस आम्हीं पाहियेली वाट । होईल, बोभाट वियोगाचा[१]॥ १ ॥ नाहीं तुम्हां आस आमुचीये जरी । आतां आम्ही तरी वांटा घेऊं ॥ २ ॥ उचित हें बापा तूज नव्हे ऐसें । कळोनियां ओपैसें आलें मना ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देवा भेटलियाविण । होय माझा प्राण कासाविस ॥ ४ ॥

४८३ पदरासी कांहीं लागो नेदी ढका । भय कांहीं नका धरूं पोटीं ॥ १ ॥ असेल आमुचें तेंचि मागों हरी । भेटी क्षणभरी एक देईं ॥ २ ॥[२] माझें चित्त मज पुरेल दिधलें । परि न घे दिलें लक्षकोटी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे भेटी देईं तूं एकदां कासयासी वादा प्रवर्तसी ॥ ४ ॥

४८४ विचारावें मनीं न देतां जिरेल । कासयासी बोल बोलवितां ॥ १ ॥ तुम्ही बुडवाल आम्ही बुडों नेदुं । भेदोनी वेवादू चुकवावा ॥ २ ॥ वेदशास्त्र-गाही दाखवूनी घेऊं। कासयासी जीवूं कष्टविसी ॥३॥ बहिणी म्हणे भेट पळों नको दूर । गांवांतील हेर सखे माझे ॥ ४ ॥

४८५ भला म्हणोनिया टाकिला विश्वास । भेटी ही सायास नेदीसी गा ॥ १ ॥ धरीन पदरीं अकस्मात तूज । जाईल हे लाज जनामाजीं ॥ २ ॥ बहिणी म्हणे तुज ठिकाणीं लाविलें । भेटी देईं बोले आर्त जीवीं ॥३॥

४८६ उदंड रडती तुझें नांवें देवा । बुडविलें सर्वां प्राणियांसीं ॥ १ ॥ रिणें-बोड्या हरी जाणतोसी मुळीं । तुजसी निराळीं झातों कां रे ॥ २ ॥ भेटीचे कारणें

---

१ आपोआप, सहज. २ कर्ज बुडविणारा.

करितों नवस । तैसी नव्हे कांस घातली म्यां ॥ ३ ॥ बहिणी म्हणे भेट न सांगें जनासी । माझेंचि मजसी देईं देवा ॥ ४ ॥

४८७ ठेवणें मागती वडिलांचें लोक । म्हणोनि भीक मागतोसी ॥ १ ॥ सोंग-संपादणी आहे मज ठाऊकी । तुम्ही म्यां पारखी असे केली ॥ २ ॥ ठेवण्याचा लोभ धरूनी अंतरीं । अंबऋषीवोरी गर्भ दहा ॥३॥ राहण्याची ( ? ) आस धरूनी ध्रुवाला । नेवूनी गोंविला अढळपदीं ॥ ४ ॥ बहिणी म्हणे एका देऊनीयां सिद्धि । अंतरींची बुद्धि कुडी खरी ॥ ५ ॥

४८८ मागतां मागतां जन्म गेले तेरा । आतां क्षण धीरा नव्हे चित्ता ॥ १ ॥ दे माझें ठेवणें आण म्यां घातली । नको फार बोली करूं आतां ॥ २ ॥ देईन मी जीव तुझे पायीं आजी । करावी तजविजी होई तैसी ॥ ३ ॥ असोनियां नेदी होंचि दुःख वाटे । देईन कपाटें महाद्वारीं ॥ ४ ॥ कोठील तुमचा कारभार देवा होईल हा ठेवा अनर्थासी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे आतां करीन भंडाई । पांडुरंगा पायीं आण माझी ॥ ६ ॥

४८९ मागणें मागतां ज्ञानदेव क्लेश । पावला बावीस जन्म जाले ॥ १ ॥ परी तुझें मन ' देईन ' न म्हणे । बहुत बळें तेणें उगवलें ॥ २ ॥ चवदा शतें झालीं वंदे ( ? ) चांगदेवा । तव्हां त्वां केशवा फेडी केली ॥ ३ ॥ बहिणी म्हणे माझे जन्म गेले तेरा । परि फजीतखोरा तूं न देसी ॥ ४ ॥

४९० नामदेवा खेचरा घातला हवाला । परि रोख त्याला तूं न देसी ॥ १ ॥ ऐसा तूं विठ्ठला जालासी रे शेट । करूनी बोभाट देसी जना ॥ २ ॥ असंख्यात किती सांगावे कष्टती । न देसी श्रीपति ज्याचें त्यासी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देवा तू होसी समर्थ । आम्ही कीं अनाथ जीव होऊं ॥ ४ ॥

४९१ न बोलसी बोल फुकाचा तूं एक । पाहसी कौतुक तूं डोळां ॥ १ ॥ जाईन मी आतां घालुनीयां धुळी । कासयासी कळी वाढविसी ॥ २ ॥ नाहीं तरी म्हण आपुलीया तोंडें । किती तुजपुढें बोल बोलूं ॥३॥ बहिणी म्हणे चाल करूं चौघा-चार । बैसोनी वेव्हार निवडीती ते ॥ ४ ॥

४९२ सर्व आम्ही तुज सारखीं समान । एका देसी धन भाग त्याचा ॥ १ ॥ त्यासी दिला तैसा देईं माझा मज । मग कोण तुज बोल ठेवीं ॥ २ ॥ जाले जरी श्रेष्ठ मानें थोर लेखूं । वांटा सर्वा येकू सारिखाची ॥ ३ ॥ बहिणी म्हणे एका भावा दिला वांटा । मी काय धाकुटा सांग मज ॥ ५ ॥

---

१ करितां; खातर. २ वाईट, खोटी, कुढी. ३ कपाटे न देईं म्हणजे द्वारे बंद करूं नकोस. ४ हा शब्द 'वंथे' असा असावा असें वाटतें वंथे म्हणजे वडिलोपार्जित संपत्तीचा वांटा ५ चार चौघापुढें खटला माडून न्याय मागूं.

४९३ घेतला आपुला विश्वास देऊनी । द्यावें ऐसें मनीं न ये तुझ्या ॥ १ ॥ ठिकाण आम्हांसीं न दिसे सर्वथा । पाहतां पाहतां जन्म गेले ॥ २ ॥ ठेवणें पुरिलें कोणतीये ठायीं । आम्हां देश तोही सांपडेना ॥ ३ ॥ बहिणी ह्मणे देवा पाहिलें म्यां फार । अविश्वासें दूर अंतरलें ॥ ४ ॥

४९४ न देसी तें माझें भांडवल हरि । येक तरी करीं पांडुरंगा ॥ १ ॥ आण वाहूनियां देईं मज क्रिया । सोडीना मी पायां मनांतूनी ॥ २ ॥ विश्वासघातकी ऐसें मज वाटे । फांसे हातीं विटेवरी उभा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे पांचामध्यें घेई आण । मग मी जाईन कळे तेथें ॥ ४ ॥

४९५ कितीएक लोक मागतांची मेले । तैसें हें न चाले पांडुरंगा ॥ १ ॥ घेईन निश्चयें न सोडीं सर्वथा । विश्वास हा आतां काय तुझा ॥ २ ॥ अवचीत येथें पडिलासी दृष्टी । पाहतां हे सृष्टि अकस्मात ॥ ३ ॥ आतां कोण तुझा धरील विश्वास । बहुत होय आयुष्य पुंडलीका ॥ ४ ॥ फार शीण त्याचा घेतला अच्युता । त्याच पुण्यें आतां देखिलासी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे लोभ आतां सांडीं हरि । थोरपणा धरीं पांडुरंगा ॥ ६ ॥

४९६ अनामिक क्रिया दिसे तुझे अंगीं । बुडविलें संगीं सर्व माझें ॥ १ ॥ जीवहत्या तुझे माथां होसी फार । हत्यारी साचार नाम तुझें ॥ २ ॥ उदंडची घरें बुडविलीं वाटोळया । किती बाळया भोळया नागविल्या । ३॥ बहिणी म्हण तुझे नांव निसंतान होईल तो कोण वाचे गाती । ४ ॥

४९७ सत्यभामा ऋण मागतां न देसी । दिधलें द्विजासी दान तिनें ॥ १ ॥ परि तूं न देसी ठेवणें लोभिष्टा । ऐकतां मोठा खेद वाटे ॥ २ ॥ देवकी वसुदेव भागले मागतां । जालासी तत्त्वतां पुत्र त्यांचा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे गाई राखिसी नंदाच्या । ठेवणें कोणाच्या हातां न ये ॥ २ ॥

४९८ तुझ्या थोरपणा कोण लावी हात । वाटतें मनांत धरावेंसें ॥ १ ॥ धरोनीयां बंदी ठेवावें हृदयांत । सोडवील तेथ कोण दुजें ॥ २ ॥ विवेक राखण ठेवीन जवळी । हृदयाची टाळी देवोनियां ॥ ३॥ बहिणी म्हणे माझें देई भांडवल । ऐकोनीयां बोल आतां तरी ॥ ४ ॥

४९९ षड्गुणैश्वर्ये थोर तूं जालासी । नावडे आम्हांसी काय तैसें ॥ १ ॥ लक्ष्मी यश कीर्ति औदार्य वैराग्य । ज्ञानेंचि तें सांग सर्व झालें ॥ २ ॥ हेंचि भांडवल आहे तुझे हातीं । येणें तूं श्रीपति म्हणविसी ॥ ३ ॥ करोनी अकर्ता जैसा तूं आहेसी । मज काय तैसी कळा नये ॥ ४ ॥ जैसा तूं व्यापक सर्वांठायीं हरि । मी काय बिचारी नव्हे तैसी ॥ ५ ॥ जैसा तूं वरिष्ठ त्रैलोक्यनयाक । मीही तैसी एक काय नोहे

१ होती ( ? ).

॥ ६ ॥ परी आम्हां सेव्य नव्हे तें भूषण । सेवकत्वें जाण क्रीडा करूं ॥ ७ ॥ बहिणी म्हणे काय वाटतसे बरें । भीक मागे पोरें ऐसें हरि ॥ ८ ॥

५०० पुरोनियां धन बांधिलें विटानें । निघेना ठेवणें बोल तरी ॥ १ ॥ कोण्योपाडें उभा राहिलासी नेणें । महाग बोलणें फार झालें ॥ २ ॥ पन्नासां चिऱ्यांनीं बांधीलें मांचोनी । निघेना म्हणोनी बोल तरी ॥ ३ ॥ कारणदेहाच्या पाडिलें अंधारीं । निघना बाहेरीं कामकाज ॥ ४ ॥ नाहीं आराणुक पहावया मज । कांहीं तरी गुज बोल एक ॥ ५ ॥ बहिणी म्हणे आतां नको व्यर्थ पिटूं । काय जोड जोडूं भागलासीं ॥ ६ ॥

५०१ तुम्हां आम्हां चौघे सांगतील आतां । चला पंढरीनाथा उठा वेगीं ॥ १ ॥ बहु भीड केली आमुची उचित । भलेपण येथं कोण पुसे ॥ २ ॥ सहा चौघे अठरा सांगूं दोघेजण । घातलीसे आण उठा वेगीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जाणें बाहेर लागलें । घरांत बुडविलें कोण सोसी ॥ ४ ॥

५०२ थोरपणा आम्हीं दिधली तिलांजुळी । तुज वनमाळी पाहिजे तो ॥ १ ॥ तुजहुनी बरे आम्ही एकापरी । पहातां विचारीं आपुलिया ॥ २ ॥ बद्धमुक्त कोणा न म्हणों सर्वथा । तुजपाशीं कथा हेचि असे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे लोक विस्तारणें तुज । आम्हीं तों सहज वर्ततसों ॥ ४ ॥

५०३ भांडणाची रीती आयाकिली संतीं । सोडवील हातीं धरोनीयां ॥ १ ॥ हा काय देईल विचारीं मनासी । येणें कोणत्यासी रोंख दिलें ॥ २ ॥ निवृत्तीचे हातीं पावलें हें तया । ज्ञानदेवाचीये सोई पाहे ॥ ३ ॥ वासिष्ठाचे हातें पावलें श्रीरामा । ऐसें काय तुम्हां ठावें नाहीं ॥ ४ ॥ नारदाचें हातें दिधलें बहुतां । रोंख नाहीं देतां जाला कोणा ॥ ५ ॥ चांगदेवाप्रती मुक्ताईकडून । देवविलें जाण ज्याचें त्यासी ॥ ६ ॥ बाबाजीचे हातीं तुकोबाचें रिण । फेडविलें जाण येणें त्त्वरें ॥ ७ ॥ ऐसे किती सांगूं युगायुगीं तुज । बोलियलें गुज संतसाधु ॥८॥ बहिणी म्हणे आतां त्या तरी दाविजे । येथें रोंख माझें फेडावया ॥ ९ ॥

५०४ असों चिंताग्रस्त प्रेमाचिया आशें । वाटे देव ऐसें कृपा करो ॥१॥ प्रवेशोनी अंतरीं कोणाचिया तरी । कोण म्हणे धरीं कांस माझी ॥ २ ॥ नाशील हें माझी कोण दरिद्रता । कोण भवव्यथा निवारील ॥३॥ बहिणी म्हणे ऐसी सदा चिंताग्रस्त । काय करी नाथ पंढरीचा ॥ ४ ॥

५०५ तुकारामरूपें प्रत्यक्ष बोलत । होईं सावचित्त सावधान ॥१॥ पाहें परतोनी आपुलिया दिठी । सांगितली गोठी एक कानीं ॥ २ ॥ तयाचा उच्चार करूं नये वाचे । झालेंसें चित्ताचें समाधान ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मना केलासे प्रकाश । अस्ता उदयास ठाव नाहीं. ॥ ४ ॥

---

१ कोणत्या महत्त्वाच्या कार्याकरितां २ पक्कें बांधून.

०६ ठेवुनी कर माथां उपदेशी । तत्पदत्वंपद प्रणवासी ॥ १ ॥ तो म्यां साठविला हृदयभुवनीं । सद्गुरुकर वरदानी ॥ २ ॥ मायातम नाशी क्षणें एकें । निरसी शास्त्रविवेकें ॥ ३ ॥ तत्समरूप याचें मज बोधी । स्वरूपीं मानस रोधी ॥ ४ ॥ त्रिगुणीं देह वर्ते परतंत्रें । बोधी पंचकयंत्रें ॥ ५ ॥ होतें जीवधर्मीं परदेशीं । ते नेले मोक्षपदाशी ॥ ६ ॥ तापत्रयव्यथा मज बाधी । दिधली शांति-समाधि ॥ ७ ॥ बहिणी म्हणे ऐसा सद्गुरु दाता । न संडीं जीव जातां ॥ ८ ॥

---

# २० टोणग्याचे अभंग



५०७ मूर्खाशी बोलतां कोण सुख चित्ता । म्हणोनी वार्ता सांडावी ते॥१॥आपुल्या आनंदीं असावें सर्वदा । करावी गोविंदासवें मात ॥ २ ॥ उचलोनी धोंडा पाडावा चरणीं । तैसी मात जनीं घडों नये ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सदा दावा या दोघांसी । आहे परमार्थासी प्रपंचाचा ॥ ४ ॥

५०८ जयासी स्वहित करणें असे मनीं । तेणें द्यावी जनीं पाठी जगा ॥ १ ॥ म्हणो मग जग वेडें अथवा मूर्ख । आपुलें तें सुख सांडों नये ॥ २ ॥ सांडावी ते लाज जनलोकाचारीं । जयासी श्रीहरि पाहिजेल ॥ ३ ॥ म्हणवावें जनीं प्रपंचीं भ्रष्टला । परी स्वहिताला सांडों नये ॥ ४ ॥ बहिणी म्हणे जन त्रिविध प्रकार । आपुले स्वाचार सांडों नये ॥ ५ ॥

५०९ आकाश कडकडी मेरू गडबडी । परी सुख-गोडी सांडों नये ॥ १ ॥ ऐसीया निर्धाराजवळीं वसे देव । न धरावा संदेह कांहीं मना ॥ २ ॥ पृथ्वी जरी बुडे डगमगल्या दिशा । परी जगदीशा सोडूं नये ॥ ३ ॥ शीत उष्ण जरी वरुषे हा पाऊस । तरी कासावीस होऊं नये ॥ ४ ॥ वायु जरी सुटे ब्रह्मांडही फाटे । तरी आत्मनिष्ठे भंगूं नये ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तेथें जीव तो कायसा । ऐसी पूर्ण दशा आचरावी ॥ ६ ॥

५१० भ्यावें तों शरीरा शरीर हें मिथ्या । तेथें आतां चिंता कासयाची ॥ १ ॥ विचारावें मना आपुल्या आपण । धरावें निर्वाण निज रूपीं ॥ २ ॥ जिवाशीं जों भ्यावें अविनाशी दिसे । जन्ममरण फांसे कोण भोगी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे येथें लटिकें मीपण । करी जन्म-मरण येरझारा ॥ ४ ॥

५११ जिवाचा उदार देहाचा झुंजार । तयासी संसार काय करी ॥ १ ॥ परी हा निर्धार असावा कारण । मग नारायण जवळीं भेटे ॥ २ ॥ कायावाचामनें दृढ

जाला जीवें। तयासी आघवें हेंचि मव्हते॥ ३ ॥ बहिणी म्हणे सती उभी शिळेवरी। तियेसी माघारीं काय खंती ॥ ४ ॥

५१२ तोंवरी ह्या गारा झगमगती सैरा। नाहीं जंव 'हिरा' दृष्टीपुढें ॥ १ ॥ मग तो निवाडा आपैसीं कळेल। जाळावे ते बोल क्रियेविणें ॥ २ ॥ तोंवरी ह्या शिंपा दिसती सोज्ज्वळा। जोंवरी न कळा मोतियांची ॥ ३ ॥ बहिणी म्हणे नाहीं फुकाचें बोलणें। करोनी दाविणें क्रिया तैसी ॥ ४ ॥

५१३ वरीवरी सांग सांगाव्या त्या गोष्टी। जव नाहीं भेटी आत्मज्ञानीं ॥ १ ॥ कासयासी वेष धरी नाना सोंग। जगीं तैसीं ढोंगें खर श्वान ॥ २ ॥ काय सांगोनियां लांब लांब गोष्टी। जोंवरी न भेटी आत्मत्वाची ॥ ३ ॥ बहिणी म्हणे मज दिसती कथैना। जोंवरी न मना अनुताप ॥ ४ ॥

५१४ बोलवती बोल फुकाचे प्रबळ। परि प्रेम-बोल दुर्लभ ते ॥ १ ॥ काय त्या सांगणें व्यर्थ ज्ञान-गोष्टी। नाहीं जंव भेटी स्वानुभवीं ॥२॥ ज्ञान सांगवेल ब्रह्म दाखवेल। स्वानुभव-बोल दुर्लभ ते ॥ ३ ॥ नाना जपतप करिती अनुष्ठान। परि ब्रह्मज्ञान गिंवसेना ॥ ४ ॥ षड्दर्शनाचीं दाखविती सोंगें। वैराग्यही अंगें बोलवेल ॥ ५ ॥ बहिणी म्हणे कळा दाववेल ज्ञानें। परि तें प्रेम-खुण वेगळीच ॥ ६ ॥

५१५ करवेल भगवें वागाविती जटा। परी आत्मनिष्ठा वेगळीच ॥ १ ॥ जाणावया वर्म बहु पुण्य पाहिजे। मग वरी साजे बाह्य क्रिया ॥ २ ॥ करवेल मुंडन विषय-भोग-त्याग। परि न कळे अंग स्वानुभवींचे ॥ ३ ॥ टाकवेल शिखा-सूत्र-घरदार। अनुभव साचार अगम्य परी ॥ ४ ॥ लय लक्ष मुद्रा कळेल आसन। अनुभव जाण वेगळाची ॥ ५ ॥ बहिणी म्हणे येथें भलगे परिहार। कळे तो विचार बोलतांची ॥ ६ ॥

५१६ संत म्हणवितां लाज नसे चित्तीं। जोंवरी आसक्ति विषयांची ॥ १ ॥ गाढवाचे परी दिसे जिणें त्याचें। काय त्यासि याचें घेउनी फळ ॥ २ ॥ संत म्हणवितां घडतें पातक। भोगी जंव सुख विषयाचें ॥ ३ ॥ रागद्वेषनिंदा भूतांचा मत्सर। करावा नुच्चार संत तेणें ॥ ४ ॥ लोभ दंभ मान विषयांचा आदर। संत तो साचार बोलों नये ॥ ५ ॥ बहिणी म्हणे वृत्ति नाहीं जों विराल्या। तो संत-सोहळा अधःपाता ॥ ६ ॥

५१७ कृमि भृंगी-न्यायें धाले जे धारणा। तोचि एक जाणा ब्रह्मनिष्ठ ॥ १ ॥ एऱ्हवीं ते बोल बोलावे फुकाचे। काय सांगीवेचें शब्दज्ञान ॥ २ ॥ चकोर-चंद्र न्यायें होये हें मन। संतपदज्ञान तरिच सत्य ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सिंधुलवण-न्याय-भेटी। घडे तेव्हां गोष्टी ब्रह्मत्वाची ॥ ४ ॥

५१८ शस्त्राचे पैं घाय सोसवती सदा। परी जननिंदा सोसवेना ॥ १ ॥

---

१ चकाकतात. २ अफाट; फार. ३ कल्पित गोष्टी. ४ सांपडेना; मिळेना.

ऐसिया साधनें रोंकडेंचि फळ । ब्रह्म हें केवळ प्राप्त होय ॥ २ ॥ करवतो दान तप व्रत स्नान । जननिंदा जाण सोसवेना ॥ ३ ॥ योग याग तीर्थ करवेल अनुष्ठान । जननिंदा जाण सोसवेना ॥४॥ बहिणी म्हणे जन निंदोत सकळ । आत्मत्वा निश्चळ ठेवीं मन ॥ ५ ॥

५१९ आमुच मिळणीं मिळूं नका कोणी । विषय-सांगातिणी बाईयांनो ॥ १ ॥ नव्हे तैसें बळ विवेक विचार । नका करूं चार जन्मांमाजीं ॥ २ ॥ जंव आहे तुम्हां मागील बोभाट । तंव कांहीं नीट होऊं नका ॥ ३ ॥ जन-लाज शंग आहे जों मनास । तोंवरी उदास होऊं नका ॥ ४ ॥ सासर माहेर आहे जंव तुम्हां । कुंथोनियां प्रेमा आणूं नका ॥ ५ ॥ बहिणी म्हणे नका फजिती कुळाची । करूं या जीवाची वायांवीण ॥ ६

५२० मूर्खासवें गुज अधमासी उपकार । स्त्रियांसी विचार सांगों नये ॥ १ ॥ वाळुवियेपरी शिरे पाणी जैसें । दुर्जनासी तैसे उपदेश ॥ २ ॥ तक्षकासी दूध स्त्रियासंगें गुज । खडकावरी बीज पेरों नये ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसे जाणावे चांडाळ । हित त्या केवळ काय कळे ॥ ४ ॥

५२१ आणिकां उपदेश सांगे वरच्या रीतीं । आपण ते चित्तीं न धरी कांहीं॥१॥ ऐसे ते जाणावे मंदमति हीन । तयां ब्रह्मज्ञान काय करी ॥ २ ॥ वरवर सांगे जनां ब्रह्मज्ञान । स्वयेंचि पाषाण कोरडाची ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तया नाहीं आत्मशुद्धि । येरां सांगे बुद्धि मूर्खपणें ॥ ४ ॥

५२२ आम्हां जितेंचि मरणें । मेलेपण जीत जाणें ॥ १ ॥ काय करूं ऐसें जालें । तुकारामें मज केलें ॥ २ ॥ शब्द आमुचा खुंटला । निःशब्द उदया आला ॥ ३ ॥ बहिणी म्हणे शक्ति नाहीं । शक्तीविणें वर्तूं देहीं ॥ ४ ॥

---

१ वर्तन; आचार. २ व्यर्थ; फुकट. ३ वर सांगितल्या रितीप्रमाणे.

## २१ स्फुट अभंग.



५२३ नव्हे करणीची आहाच । जीवें पायीं जडलों साच ॥ १ ॥ आतां टाकिलें करावें । शरण केशवासी जावें ॥ २ ॥ देउनी प्रपंचासी फांटी । पाय तुझे धरिले कंठीं ॥ ३ ॥ वैरी छळिती गांजिती । परी पाय तुझे चित्तीं ॥४॥ नखीं देती जरी सुया । तुज न सोडीं देवराया ॥ ५ ॥ जरी केला सहकारी । बहिणी म्हणे दया करीं ॥ ६ ॥

५२४ भक्तिभाव आम्हीं बांधिलासे गांठीं । तेणें आम्हां तुटी कासयाची ॥१॥ गाऊं नाचूं प्रेमें हरिनाम कीर्तनीं । भावोनियां जनीं जनार्दन ॥ २ ॥ खाऊं वाटूं लुटूं उदारासारिखें । सरे ऐसें देखें नाहीं नाहीं ॥ ३ ॥ कोणाचिया घरां जावें धाया ध्याया । स्वप्नीं भोगावया दैन्य नाहीं ॥ ४ ॥ बहिणी म्हणे भक्ता कासयाची चिंता । पाठीसी असतां पांडुरंग ॥ ५ ॥

५२५ तूं माझी माउली तुझें मी बालक । करितें कौतुक नामीं तुझिया ॥ १ ॥ तूं माझी गाउली मी तुझें वांसरूं । करितें हुंकारूं तुझे नामीं ॥ २ ॥ तूं माझी कुरंगी मी तुझें पाडस । करीं रात्रंदिवस ध्यान तुझें ॥ ३ ॥ तूं माझा चंद्रमा मी तुझें चकोर । उल्हास हा थोर देखोनीयां ॥ ४ ॥ तूंचि माझा मेघ मी तुझें चातक सदा मज हरिख स्मरणीं तुझे ॥ ५ ॥ तूं माझा सज्जन मी तुझी सांगाती । अखंड हें चित्तीं ध्यान तुझें ॥ ६ ॥ बहिणी म्हणे माझा तैसा प्राणसखा । तुकाराम देखा सर्व धनी ॥ ७ ॥

५२६ षट्शास्त्र-श्रवण सत्संगसेवन । देव तयाहून आणिक नाहीं ॥ १ ॥ शिष्टासी सन्मान शास्त्रांचा अभिमान । असे तोचि जाण ब्रह्मनिष्ठ ॥ २ ॥ बहिणी म्हणे कर्में ब्रह्म जया मानें । तोचि पैं जाणें ब्रह्मरूप ॥ ३ ॥

५२७ धन्य तें गोकूळ धन्य ते गोपाळ । धन्य लोकपाळ पुण्यशील ॥ १ ॥ धन्य तोचि देश धन्य तोचि वंश । जेथें हृषिकेश अवतरले ॥ २ ॥ धन्य तीच माता धन्य तोचि पिता । जन्म कृष्णनाथा ज्याचे कुशीं ॥३॥ धन्य त्या गोपिका कृष्णीं तन्मयता । धन्य ती सरिता कृष्ण पोहे ॥ ४ ॥ धन्य वृंदावन धन्य गोवर्धन । चारी नारायण गायी सदा ॥ ५ ॥ धन्य तो दिवस धन्य तोचि मास जन्मला अविनाश कृष्णसखा ॥ ६ ॥ बहिणी म्हणे धन्य नरनारी बालक । घेती कृष्णसुख सर्वकाळ ॥ ७ ॥

---

१ वरवर. ( आम्ही ) आहाच करणीची नव्हे साच पायीं जीवें जडलों हा भावार्थ.

५२८ बाटाविलें तुवां अवघें गोकुळ । क्रिया हे आकळ तुझी देवा ॥ १ ॥ ऐसा तूं लाघवी क्रियानष्ट जाण । ब्रह्म तुज जाण म्हणती ऐशा ॥ २ ॥ चोरटा खांणोरी देहाचा पाईक । शिंदळांचा नाईक क्रिया तुझी ॥ ३ ॥ निलाजिरें जिणें हेडसांविती नारी । गोसेडीसी तरी सोडीं देवा ॥४॥ संपादिसी मुखें झांकिसी आक्रिया । लटिकें करिसी तया साक्षीभूत ॥ ५ ॥ बहिणी म्हणे हरी न कळे तव लीला । ऐसा तूं गोपाळा अनाचारी ॥ ६ ॥

५२९ अवघी कुळकोटी आहे मज ठावी । विश्वास गोंसावी कोण शोभा ॥ १ ॥ न बोलवें आतां लाज आपणांसी । आम्हां हृषीकेशी मायबापा ॥ २ ॥ अवघी परंपरा जाणवली मज । वायां योगिराज म्हणवीसी ॥ ३ ॥ मुळींचा गोंवळ गोवळ्यांची क्रिया । भजे तुज ऐशिया कोण सांगे ॥ ४॥ धुंरटे घाणेरे वोंगळ गोवळी । खासी उष्टावळी तया मुर्खांची ॥ ५ ॥ बहिणी म्हणे देवा न बोलावें वर्म । सांगतां तव धर्म लाज वाटे ॥ ६ ॥

५३० प्रसंगासारिखें बोलवितो देव । देखोनियां भाव जना ऐसा ॥ १ ॥ काय करूं यासी दुर्बुद्धीचें कोडें । भोगणें हें पुढें आहे तया ॥ २ ॥ ब्राह्मण म्हणवीती मद्यमांस सेविती । मेसाई पूजिती वश्य कर्मीं ॥ ३ ॥ जारण मारण स्तंभनमोहन । जीवहिंसा कारण विषयालागीं ॥ ४ ॥ आपुला स्वधर्म सांडोनियां मार्ग । सेवेला निजांगें अधर्मांचे ॥ ५ ॥ सकर करिती गुरुकृपा म्हणती । पाप न म्हणती परद्वारीं ॥ ६ ॥ ज्याचें खाती तया माराया उठती । शंका न धरिती स्वामियाची ॥ ७ ॥ बहिणी म्हणे ऐसे न पडो दृष्टी । ज्यांचेनी ही सृष्टि सर्व बुडे ॥ ८ ॥

५३१ अवतारांच्या पंक्ति ही लीला कवणाची । जाणती हें साची अनुभवी ॥ १ ॥ आणिकांसी न कळे जाले लठ्ठ थोर । पाहिजे तो शूर ज्ञानवंत ॥ २ ॥ सत्रावीस काय उन्मनी बोलती । प्रेम वाहे म्हणती कोणा सांगों ॥ ३ ॥ मूळमाया निवृत्ति गुणत्रय प्रकृति । कवणासी म्हणती सांग कैसें ॥ ४ ॥ अद्वय जें होतें द्वैतासी आणिलें । कोणाचेनि आलें जाणावया ॥ ५ ॥ एक हा अनेक अनेक हा एक । अन्वय व्यतिरेक कैसा सांग ॥ ६ ॥ बहिणी म्हणे याची केली ब्रह्मकळा । म्हणोनी अंबेला शरणांगत ॥ ७ ॥

५३२ देहयंत्र वाहे हरी । निजभक्त वाजवी कुसरी ॥ १ ॥ वाचा तारा लाविल्या हरी । एक स्वरें वाजवी चारी ॥ २ ॥ इंद्रियरंध्रें केलीं प्रगट । मनसारी लावुनी

---

१ अत्यंत ज्ञानी; परब्रह्म २ अघाशी ३ शिपाई ४ हेटाळणी करितात. ५ सोडीत नाहींस ६ गौळी. ७ घामट, हीन. ८ एक क्षुद्र देवता मनाला आनंद देण्यासारखी.

नीट ॥ ३ ॥ ओंकारध्वनि सूक्ष्मनाद । मातृका पिळोनी शुद्ध ॥ ४ ॥ बहिणी म्हणे अनुभव घ्यावा । वाजवी कोण तो पाहो ॥ ५ ॥

५३३ निंदक हरिभक्त हे माझे सांगाती । जीवाहुनी प्रीति भेटी होतां ॥ १ ॥ तयांचा संभ्रम होतसे मज घरीं । वैकुंठ यापरी वंघावया ॥ २ ॥ जैसें हें हरिभक्ता आतिथ्य करावें । तैसेंचि स्वभावें निंदकासी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे माझे दोघेही जिवलग । कर्मभोग वांटा आला ॥ ४ ॥

५३४ हरिभक्त तेचि जाणावे वो तुम्हीं । जेव्हां भागवतधर्मी विधियुक्त ॥ १ ॥ वेदविधिमार्गा नुलंघी सर्वथा । अखंड हे आस्था भूतमात्रीं ॥ २ ॥ कर्म वोसंडीती देहाचेनि छंदें । अखंड आनंदें क्रीडताती ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसे जिवलग ते माझे । भेटतां सहजे सुख होय ॥ ४ ॥

५३५ निंदक भेटतां दुणावें हरीख । भक्ताही विशेष सुख वाटे ॥ १ ॥ निंदक सांगाती येणेंपरी बापा । करिती निष्पापा गुरुभक्ता ॥२॥ सुवर्णाचा मळ काढितांचि पुटी । पडियेली तुटी हीणा जेवीं ॥ ३ ॥ आरसा उजळ करितांचि देख । मळ तो निःशेष जाय जेवीं ॥ ४ ॥ निंदकें निंदितां कर्ताकर्म जळे । आम्हांसी आकळे परब्रह्म ॥ ५ ॥ बहिणी म्हणे निंदक देखें जेव्हां डोळां । आनंद-सोहळा करितसें ॥ ६ ॥

५३६ हरिभक्त निंदक जन्मले एके ठायीं । वांटा तया पाहीं भागा आला ॥ १ ॥ ज्याचें कर्म त्यानें केलेंचि पाहिजे । न करितां सहजें दोष होती ॥ २ ॥ म्हणोनि निंदकें निंदाचि करावी । तया तोचि जीवीं आठो असे ॥ ३ ॥ हरिभक्तें भजन करावें आदरें । संतांची सादर पूजा कीजे ॥४॥ कावळ्याचा धर्म टोंचावें ढोंपरा । मौक्तिकाचा चारा काय त्यासी ॥ ५ ॥ श्वानाचा स्वभाव गुरगुर करावी । पिसाळल्या जिवीं प्राण घ्यावा ॥ ६ ॥ हंसाचा स्वभाव पय-पाणी निवडी । विष्टा तो चिवडी केवीं घडे ॥ ७ ॥ बहिणी म्हणे तैसें ज्याचें कर्म त्यानें । करावें म्हणणें न लगे तया ॥ ८ ॥

५३७ हरिभक्ता सन्मार्ग दिधला हा वांटा । निजभक्तनिष्ठा पुण्यवंत ॥१॥ दया हे करावी भक्तिपुरःसरें । रामनाम त्वरें मुखीं गावें ॥ २ ॥ संतांचें पूजन शास्त्रांसीही मान्य । अखंड अर्चन ब्रह्मपूजा ॥ ३ ॥ गंगा गोदावरी काशी तीर्थयात्रा । तेणेंचि पवित्रा देह करी ॥ ४ ॥ भूतमात्रीं भाव सांडोनी मीपण । आठवी जो चरण राघवाचे ॥ ५ ॥ बहिणी म्हणे कर्म हेंचि भागा आलें । दुसरा न चाले उपाय हो ॥ ६ ॥

५३८ रालभाली कळा शिकविलें ज्ञान । स्वधर्माचरण काय सांडी ॥ १ ॥ तैसा

---

१ पहावा. २ टाकतात. ३ कमी दर्ज्याचें सोनें. ४ आठव; स्मृति.

जो स्वभाव निंदका हरिभक्ता । सांडी तो हे वार्ता स्वप्नीं नव्हे ॥ २ ॥ मर्कटांसी जरी सुखासन दिधलें । तरि का सोहळे तया माने ॥ ३ ॥ श्वानाचिया अंगा लाविला चंदन । उकीरडा-शयन न करी कायी ॥ ४ ॥ घुली उंदरांसी ठेवनी मंचकीं । काय उकीर शेखीं काढिल्लीना ॥ ५ ॥ सर्प विंचवांसी शर्करादि दूध । काय देतां शुद्ध विष नोहे ॥ ६ ॥ वाघुळासी घरीं आणूनि ठेविलें । उफराटी टांगिलें न संडी तें ॥ ७ ॥ बहिणी म्हणे तैसें अभक्तस्वभाव । शिकविल्या ठाव न सांडिती ॥ ८ ॥

५३९ तैसी अभक्तासी गुरुकृपा जाली । शेखीं व्यर्थ गेली फळेचिना ॥ १ ॥ निंदाची करितां वाचा नारायणा । तेथें नारायणा कोण स्मरे ॥ २ ॥ श्वानाचें तें शेंपूट शतवर्षे नलिके । घालितां न चुके वक्रदशा ॥ ३ ॥ गर्वे करोनियां मस्तक लववेना । तो संतचरणा केविं लागे ॥ ४ ॥ लोकांचीं अकर्मे विचारी मानसीं । तेथ भगवंतासी कोण चिंती ॥ ५ ॥ ऐसा परोपरी अकर्माचे लागीं । वाढलासे जगीं द्वेषासाठीं ॥ ६ ॥ बहिणी म्हणे ज्याचे कर्म तोचि करी । तयासी श्रीहरी काय करी ॥ ७ ॥

५४० भक्ताचें आचरित आपणाचि होय । भगवंताची सोय स्मरोचिना ॥ १ ॥ कीर्तनीं आदर-शांतिक्षमा वरे । देह जातां कैसें दंडेळेना ॥२ ॥ भक्ति आणि ज्ञान वैराग्य वोतलें । प्रेम वोसंडलें सर्वकाळ॥३॥क्रिया कर्म जें जें अर्पी ईश्वरासी। अखंड वाचेसी रामराम ॥ ४ ॥ अवाच्यता बोल नयेचि मुखासी । केविं पतिव्रतेसी परपुरुषीं तें ॥ ५ ॥ सर्वांभूतीं भाव सारिखाचि धरी । नमस्कार करी भूतमात्रा ॥ ६ ॥ भगवंता मनीं संता लोटांगण । आठवी चरण श्रीगुरूचे ॥७॥ बहिणी म्हणे ऐसें भक्त आचरित । तयासी भगवंत जवळींच ॥ ८ ॥

५४१ भक्तां अभक्तांसी कोण गति होय । आयका उपाय तोही एक ॥ १ ॥ कर्तृत्वासारिखें प्राप्त होय फळ । देतसे कृपाळ पाहोनियां ॥ २ ॥ येणें क्रमें भक्त आचरे जरी हा । तरी तया पहा विष्णुपद ॥ ३ ॥ देहीं असोनियां विदेही तो जाणा । सत्यसत्य खुणा वेदमतें ॥ ४ ॥ भक्तां भवपाश बांधूं न शकती । तयांसी श्रीपति रक्षितसे ॥ ५ ॥ बहिणी म्हणे भक्त तेचि जाण मुक्त । तयांसी भगवंत प्राप्त जाला ॥ ६ ॥

५४२ निंदक तेही फळ घेती कर्तृत्वासी। । निंदितां संतांसी नानापरी ॥ १ ॥ नसतां अपराध संतजनां निंदी । सहस्र गोवधीं दोष थोडा ॥ २ ॥ संतांसी मत्सर करी सर्व काळ । दोष ते सबळ अंगीं आले ॥ ३ ॥ असेल अपराध संतां-अंगीं थोर । बोलतां तो अपार दोष होती ॥ ४ ॥ असतां अपराध आणों नये मुखां ।

---

१ उकरून माती काढणें. २ शेवटीं; अखेरीस. ३ आनंद, करमणूक. ४ कळमळत नाहीं. ५ आचरण.

वदतां त्रिदोखा पात्र झाले ॥ ५ ॥ एवढे अपराध थोर जरी जाले । भला जोचि बोले दोषी खरा ॥ ६ ॥ संताचा महिमा न कळे कोणासी । म्हणोनि दोषासी आरोपावे ॥ ७ ॥ बहिणी म्हणे असे दोषि तोचि नर । घाली संतावर लटिके दोष ॥ ८ ॥

५४३ लटिके दोष जरी संतांसी आरोपी । जाणावा तो पापी कुष्टी होय ॥ १ ॥ तयाचिया कुष्ठा नाहींची निवृत्ति । चंद्र-सूर्य फिरती जंवर पाहें ॥ २ ॥ नसतांचि संतछळणा जो करी । जाणावा तो वैरी श्रीहरींचा ॥ ३ ॥ देखवेना डोळां उत्कृष्ट हें पाहें । रचितो उपाये नानापरी ॥ ४ ॥ निंदा वाद भेद वाढवी मत्सर । सदा करकर संतांसवें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसें अभक्ताचे गुण । सहजाचि जाण उमटती ॥ ६ ॥

५४४ नसतेचि दोष आरोपितां संतां । जाती अधःपाता रौरवासी ॥१॥ जन्मो–जन्मीं किडे नर्कांतील होती । क्षणही विश्रांति नाहीं जीवा ॥ २ ॥ कन्याविक्र-याचा दोषही तो थोडा । करिती जे पीडा साधकासी ॥ ३ ॥ सहस्र गोवध तेंही पाप थोडें । संतनिंदीं जोडे अगणित ॥ ४ ॥ पिता-माता-वध करूं बापा सुखें । दोष हे विशेषें संतनिंदीं ॥ ५ ॥ देउळें मोडिती अग्रहारा जाळिती । तेही दोष जाती क्षणमात्रें ॥ ६ ॥ संतनिंदा दोष न जाय सर्वथा । नेतो अधःपाता ब्रह्मादिकां ॥ ७ ॥ बहिणी म्हणे संतनिंदेनें अभक्त । रवि-शशी भ्रमत तंवर पीडे ॥ ८ ॥

५४५ स्वधर्मे आपुल्या असतां स्वगृहीं । कोणी निंदा पाहीं करूं नये ॥ १ ॥ निंदितां तयाचा शस्त्राविणें वध । केला हा वेवाद वेदमुखें ॥ २ ॥ जेणें वाचे-निंदा करावी संतांची । त्या वाचे यमाची सुरी वाहे ॥ ३ ॥ जयं वाचे निंदा वाकुल्या दाखवी । ते वाचा रौरवीं पचे खरी ॥ ४ ॥ जे मुखें शिव्या घाल्या संत-वृंदा । ते वाचे आपदा नानापरी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे यांसी नव्हे अप्रमाण । वेदाची हें खूण सत्य माना ॥ ६ ॥

५४६ विठू माझा लेंकुरवाळा । संगें लेंकुरांचा पाळा ॥ १ ॥ तुका घेतो कडिये-वरी । नामा करांगुळी धरी ॥ २ ॥ एकनाथ खांद्यावरी । कबिरातें हातीं धरी ॥ ३ ॥ गोरा कुंभार मांडीवरी । चोखा जिवा बरोबरी ॥ ४ ॥ पुढें चाले ज्ञाने-श्वर । मागें मुक्ताई सुंदर ॥ ५ ॥ बहिणी म्हणे बा गोपाळा । करिसी भक्तांचा सोहाळा ॥ ६ ॥

५४७ पूजावें कशानें जेथें तेथें तूं देवा । अन्नगंध पुष्प धूपादीपादि सर्वां॥१॥पूज्य पूजक जगदाभास जाला सगुणीं । म्हणोनियां तूतें भजों कोंदडपाणी ॥ २ ॥ दुजें

१ त्रिदोष. २ ठेवूं नये. ३ जोंपर्यंत.

तुजविण देखों तरीच अर्पावें । सर्वांठायीं ओतप्रोत व्यापियेलें देवें ॥३॥ बहिणी म्हणे तुझें तुज अर्पितां लाज । वाटे रामा परी तुझें राखावें गूज ॥ ४ ॥

५४८ मुक्तचि शरीर दग्धपट जैसा । उरला तो तैसा देहासंगें ॥१॥ ऐसे साधुसंत वोळखावे कैसे । अखंडित पिसे नामीं जाले ॥ २ ॥ जनांहिसारिखें वर्तति वेवहारीं । असोनी संसारीं देहातीत ॥ ३ ॥ बहिणी म्हणे नामीं अखंडित लीन । देह हें भूषण कधीं नेणें ॥ ४ ॥

५४९ रामा तूं माझा जिवलग सांगाती । क्षणीं मज अंतीं अंतरसी ॥१ ॥ ऐसींये संकटीं पावसी न पाहें । तरी देह जाय तुझ्या माथां ॥२॥ रायाचें लेंकरूं रंकानें गांजावें । हें तों स्वभावें नवल वाटे ॥३॥ बहिणी म्हणे तुझें ब्रीद काय झालें । सांगा कोणीं नेलें हिरोनियां ॥ ४ ॥

५५० कवणे ठायीं असे कवणे ठायीं नसे । ऐसें तों सांगतां चोजवेना ॥ १ ॥ यालागीं सद्गुरु वोळंगितां भावें । आत्मा तो स्वभावें कळावया ॥२ ॥ कोण याचें गांव कोण याचें नांव । नकळे स्वयमेव काय करूं ॥ ३ ॥ कोण याचें स्थळ कोण याचें कूळ । कोण याचें बळ कळेचिना ॥४॥ कोण याची माता कोण याचा पिता । अमुक तत्त्वतां कोण जाणे ॥ ५ ॥ बहिणी म्हणे कोणा पुसूं याचा कथा । ऐसें विवंचितां कल्प गेले ॥ ६ ॥

५५१ गुरुवर्णन करितां बोले । सभा देखोनी मुलेंबाळें ॥१॥ नाहीं भेटला सद्गुरु । लोकाचारें उपदेश करूं ॥ २ ॥ नानामतें सांगे गोष्टी । तत्त्वज्ञान बोले मेटीं ॥ ३ ॥ परि अनुभवमतें बोल । तेथें राहिले सकळ ॥४॥ उपदेश करी जनां । गुरु न करीं स्त्रीजना ॥ ५ ॥ शूद्र अथवा स्त्रीविरहित जाती । जो मानी गुरुस्थिती ॥६॥ तो जाणावा राक्षस । जो घेत स्त्रीउपदेश ॥ ७ ॥ सभेमाजीं ऐसें बोले । सभा देखोनी मिथ्या जळे ॥ ८ ॥ जेथें विकल्प तुटला । तेथ वर्णभेद मिथ्या बोला ॥९॥ बहिणी म्हणे ऐशा जन्मा । स्वप्नीं न करा संभाषणा ॥ १० ॥

५५२ काळभयें लंकापति सागरीं दुर्गं रचुनी वसे । चक्र फिरे भंवतें दिनरात्रीं तो मग यमा गवसे ॥१॥ ज्यासी पराक्रमें देव बंदीं घालुनी हासतसे । तो मरणाप्रती सांपडला अरे प्रयत्न वृथाचि असे ॥२॥ होईल मग तें शेवटींचें पाहुनी स्वानुभवो । साध्य असो कीं असाध्य हो परी प्राक्तन दोहींसरिसें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे न चुकेल विधीचें लेखन पूर्वील हो । प्रयत्न वृथा परी कीजे पुरुषें प्रयत्न पराक्रम- हो ॥ ४ ॥

५५३ कोठें गेला हा स्वामी काय करूं । गरुडा न दिसे कृष्ण विचारूं । हाहाकार जाला थोरू प्रीतिकारू । सांडिला निजवारु ॥१॥ तुजविणें रे गोविंदा देह पाहें । वियोगें

प्राण हा कोण वाहे । धीर नोहे मज पाहें मग धाय टाकुनी रडे माये ॥ २ ॥ अहो सखीये तिमिर आलें डोळां । तेणें योगें शेजारीं निद्रावला । कोठें गेला घननीळ हा पुष्पमाळा टाकिली मज गळां ॥३॥ करीं माळा घेऊनि रडे बाळा । कृष्ण झाला सांग हो काय वाहिला । वास जाला काय माळा मनीं पाहतां विवेकें कृष्णीं मेला ॥४॥ बहिणी म्हणे चुंबन देतां माळे तव तद्दता बांधिलें पुष्प गळे । परिमळ कृष्ण कळे नेला बोले । शरीर टाकी बळें ॥ ५ ॥

५५४ लाज नाहीं येथें येऊनि संसारा । नरकाचा थारा भोगावया ॥१ ॥ किती मरमर सोसणें अघोर । नेघे तो विचार स्वहिताचा ॥ २ ॥ कासया संपत्ती जळो जळो जिणें । दिसे लाजिरवाणें एकाविणें ॥३॥ हत्ती घोडे दासी छत्रीं शेषासन । जळो हें भूषण एकावीण ॥४॥ सोयरे धायरे जळो इष्टमित्र । अवघे अपवित्र एकावीण ॥ ५ ॥ बहिणी म्हणे तनु अवघी हे चांगली । एकावीण गेली जन्म वायां ॥६॥

५५५ विषय ब्रम्हरूप तेव्हां सत्य होती । जैं लाहे आत्मस्थिति स्वस्वरूपीं ॥१॥ तेव्हां तो जाणावा ब्रम्हनिष्ठ खरा । नातळे विकारा देहबुद्धि ॥२ ॥ इच्छा मावळेल अहंता गळेल । वासना विरेल स्वस्वरूपीं ॥३॥ जिव्हाउपस्थांचा पडे ज्या विसरु । इंद्रियव्यापारू पारुषेल ॥ ४ ॥ बहिणी म्हणे वृत्ति पावती निवृत्ति । विषय तेव्हां होती ब्रम्हरूप ॥ ५ ॥

५५६ पृथ्वी ही गिळिली उदकानें पाहीं । तेजें उदक नाहीं ऐसें केलें ॥ १ ॥ महा विपरीत प्रळयो मांडिला । ब्रम्हाग्नि लागला ब्रम्हत्वासी ॥ २ ॥ वायूनें तेज गिळिलें एकसरा । ब्रम्हांड पसारा शुकशुकाट ॥ ३ ॥ मग त्या आकाशें गिळियला वायो । ऐसा हा प्रळयो थोर जाला ॥४॥ यासी तो प्रळयो बोलिजे निश्चयो । महाप्रळय भयें पुढें आहे ॥ ५ ॥ आकाश गिळिलें विष्णु महद्भूतें । कैसें विपरीत जालें देखा ॥ ६ ॥ विष्णु म्हणायासी जो कोणी उरला । तयाचीया बोला ठाव नाहीं ॥ ७ ॥ ऐसा अवघा परी होऊन आभास । पूर्ण सावकाश नांदतसे ॥ ८ ॥ नित्य आनंदघन दाटे परिपूर्ण बोले खंब्रम्ह वेदवाणी ॥ ९ ॥ बहिणी म्हणे कैसें विपरीत केलें । दुःख तेंचि जालें सुखरूप ॥ १० ॥

५५७ रकारासी दीजे काना । व्यंजनानें उच्चारणा ॥ १ ॥ म्हणे यंत्र बीज युक्त जें कां शंकराचें उक्त । पुढें काना रकारानें । करूं मुखीं उच्चारणें ॥ ३ ॥ तथावरी मकरासी । देई काना उच्चारासी ॥ ४ ॥ याला देऊनी व्यंजन । मग करीं उच्चारण ॥ ५ ॥ मन उफराटे अंतीं । साहीं अक्षरीं विश्रांति ॥ ६ ॥ बहिणी म्हणे न सांगतां । मंत्र सांगितला आतां ॥ ७ ॥

५५८ कापुराचें जैसें अंतर्बाह्य शुद्ध । किंवा तें प्रसिद्ध रत्न जैसें ॥ १ ॥ तैसें ज्याचें चित्त सारिखें सर्वदा । संत तया वदा सर्वभावें ॥२॥ सुवर्णाचिये अंगीं जैसा

नाहीं मळ । चंद्रमी निश्चळ धृति जैसी ॥३ ॥ बहिणी म्हणे पूर्ण ब्रह्म निर्विकार । तोचि हो साकार संत जाणा ॥ ४ ॥

५५९ दुसरियाचें दुःखें शिणे ज्याचें चित्त । तोचि एक संत वोळखावा ॥ १ ॥ तयासी पुसतां हरील तो शीण । दुःख घे हिरोन रोकडेंची ॥ २ ॥ परोपकार जया जालासे विभागी । शांति हे सर्वांगीं डोलतसे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे नाहीं आपुलें पारिखें । वर्ततो विवेकें ज्ञानदृष्टि ॥ ४ ॥

५६० सराफापासी घेतलें सोनें । न व्हावें कोणे भिडे त्याचे ॥ १ ॥ जोखून पहावें कसोटीसी । घ्यावें कसीं आगळें तें ॥ २ ॥ जयानें घेतलें त्याचे भिडे । नागवण घडे झांकिलीया ॥ ३ ॥ कसीं कसोटीच्या आलें । जाणावें तें बरव्या मोलें ॥ ४ ॥ टांकसाळीं कसिलें नाणें । बहिणी म्हणे तेंचि खरें ॥ ५ ॥

५६१ नलगे घ्यावें सोंग टोपी मुद्रा धरणें । भक्ति ही कारण असों द्यावी ॥ १ ॥ तेथें सर्व सिद्धि नांदती स्वभावें । आपुलाल्या दैवें घ्यावें येथें ॥ २ ॥ नलगे योगयाग नलगे भोगत्याग । असावा अनुराग भक्तिसंगें ॥ ३ ॥ नलगे जपतप दान तीर्थाटणें । भक्ति असो दृणें एकनिष्ठ ॥ ४ ॥ नलगे ज्ञान ध्यान नग्न पैं हिंडणें । भक्ति हें कारण असों द्यावी ॥ ५ ॥ बहिणी म्हणे आम्हां भक्ति तेचि मुक्ति । ऐशा वेदश्रुति गर्जताती ॥ ६ ॥

५६१ [अ] तया म्हणूं भाग्यवंत । जया खंत विठ्ठलाची ॥१॥ नामधन जयागांठीं । तोचि कोटीनारायण ॥ २ ॥ तोचि जाणा छत्रपती । ध्यास चित्तीं विठोबाचा ॥३॥ तरती दर्शनें त्याच्या जीव । तोचि देव मुमुक्षूंचा ॥ ४ ॥ बहिणी म्हणे काळशास्ता । तोचि नाम गातां मुखीं सदा ॥ ५ ॥

---

# २२ पदें–गौळणी.



५६२ देवकी कहे सुन बात भ्रतारो सुनिके आवे कंस रे । जागि मानिमें लेकर झालो श्रीधर नहीं जसवदापाल रे ॥ १ ॥ झलके जावो जी तुम बसुदेवा आयेंगे कंसबिखार । डंखबिखें प्राण लेवे सबके कहा करो बिचार ॥ २ ॥ अध्धी रातभयी है जमुना आये मेघ तुसार । पावमें बेरी कुलपो कैसें जाना नंदके बार ॥ ३ ॥ बली बली बारो राखते है अब कहा करे अविनाश रे ॥ ४ ॥ अपने कर हरि लेकर देवकी देत भ्रतारो हात रे । बेरी तबही तूट परी है बंधन तुटो पासे रे

॥ ५ ॥ बहिनी कहे जीस कृष्ण कृपा उस कहा करे जमपास रे । बेरी कुलपों आपही खोलत जावत है अविनाश रे ॥ ६ ॥

५६३ ये गोकुल चल हो कहत मुरारी । मेघतुसार निवारे फनिधर सेवा करे बलहारी ॥ १ ॥ बसुवा अपने कर दोन्हो पालख योंही किन्हो । जमुनाके तट आयके देखें पूरन निरंजनो ॥ २ ॥ पूरनरूप यो देखे जमुना जानीये सबही भाव । दोही ठोर भई जमुना नीर तब जानत यो हरिभाव ॥ ३ ॥ जैसा परवत वैसो नीर हवो जानी के आस । पाव लगे जमु कहे जायगे सब दोस ॥४॥ जिस-चरनको तीरथ शंकर माथा रखाया नीर । वो चरन अब प्राप्त भये हो ये जान उधार ॥ ५ ॥ बहिनी कहे जिसकू हरि भावे उसकू कालही धोके । बसुदेवा-कर आपही मुरारी काहे कुं संकट आवे ॥ ६ ॥

५६४ बसुदेवा तब बारन आवें सोवें गोकुलनंद । दरवाजा आप खोलत है रे आवत गोविंद ॥ १ ॥ जीस दरवाजें लोहोकें सांकल--कुलपों तोड रखाये । सबजन सेवक सोवे तबही वसुदेव घर जाये ॥ २ ॥ तब ये माया प्रगट भई है जसोदा सुत भई हे । और सोवे माया ठोर धरी हे ॥ ३ ॥ जसोदा कूं जहां निद्रा लगी है जानेके गोकुल नाथ । आवे घर के वसुदेवा तांहां माया लीनी हात ॥ ४ ॥ धांकत हैं मन कांपत है तन फेर चले मथुराकूं । निकसे तब या देखत सब कुलुपो हांवत वाकूं ॥ ५ ॥ बहिनी कहे तव माया लेकर जाया फेर मथुरा । देवां की कर लेकर दीन्हीं दरवाजे रखे फेरा ॥ ६ ॥

५६५ बसुदेव जब देखें हरिकूं चार भुजा श्रीमुरारी । कहत है शाम तुमारो दरशन वांच्छित रातदीन सारी ॥ १ ॥ तुमकू बचन सुनावें दारो सेवक सोवा । तुम रूप छोडो देवा हमसे कंसकु है दावा ॥ २ ॥ अबही सुनो गोपाल भयोजी अब मारत कंस । सबही लरके मारत जावो वो रोवत है हरि पास ॥ ३ ॥ चार भुजा तुमको गोविंद चक्र गदा और शंख । पद्महि कौस्तुभ देखत तब वो मारेगा छोडो मेख ॥ ४ ॥ जय कृष्ण कृपाल स्वामी बचन सुनोजी हमारा । उस रूपो जब देखे कंस प्राणसु लेवे तेरा ॥ ५ ॥ बहिनी कहे हरि प्रगट भयो है, उदरमें कारण कौन । पुण्यकी वेला प्रगट भई है वोही कारण जान ॥ ६ ॥

५६६ जय कृष्ण कृपाल भयोजी नहीं कीये जप तप दान । मै गृहीं ब्रम्हन पूजन कीया भूमि नहि गौदान ॥ १ ॥ तुम क्यौं प्रगट भयो कहा जानो । अर्चन वंदन नहि कछु पायां हाय अचंबा मान ॥ २ ॥ अन्न दियो तब या रासि नहि देवन पूजो भाव । तीरथ यात्रा कछु नहीं जोडी कहा भयो नवलाव ॥ ३ ॥ बनधारी

---

या प्रकरणांत थोडा अपुरेपणा मुळांतच आहे. 'संपादक'.

और निरबाना है पत्र लिखावत जान । नंगाह पाव नंगा देहहि बनबन जावत रान ॥ ४ ॥ परबतमांहै जोगी होकर छोड दियो संसार । धूमरपान और पंचाग्नी साधन बैठे जलकी धार ॥ ५ ॥ बहिनी कहे कहा जलमका संचित प्राप्त भये इस बेला । चारभुजा हरि मुजको दिखाया येही कहो वननीला ॥ ६ ॥

२६७ सुनो कहत है शाम सुजानो पुण्य विना नहीं कोई । जिसके पल्लो जप-तपदान है पावै दरसन वोही ॥ १ ॥ तुम सब बात सुनोजी चित्तकुं ठोर धरोजी हरिके आये देये ही बाण कहोजी ॥ २ ॥ फूल बिना फल जलबिना अंकुर बिन पुरुष नहीं छाया । जल बिन कमलिनी रवि बिन तेज अंगीं तंहां सब आया ॥३॥ तरु तंहां बिन बिज तंहां तरूं है दिपके पास प्रकास । नर तांहीं नारी फुल तांहीं फल है पुण्य तांहां अविनास ॥ ४ ॥ बहिनी कहे जिसकू हरि आवे केही है पुण्यकी रास । शांती क्षमा उस घरमें सोवे सबही संपत दास ॥ ५ ॥

५६८ ये गोविंद प्राप्त भयो कहा काज । व्रत नहि जानत तप नहि जानत कारागारमें बिराज ॥ १ ॥ पूरब जनम तप करत है तब वरद मिलो बनमाली । मेरे पेटमें प्रगटो निरगुन योही मांगत बाली ॥ २ ॥ बहुतहि निकट मांडी तब हरि करुना कर है जान । तीन जनममें मेरे उदरमें आऊं बर दियो उस रात ॥३॥ उस तपके लीये उदरकूं आये जन । कोहि कृष्ण भयो है येही तपके कारन ॥ ४ ॥ तपव्रतदान बिन बिहिन सेवा कृष्ण न आवे संग । संग बिन नाहि मुक्ति जिवाकूं येही कहत श्रीरंग ॥ ५ ॥ बहिनी कहे उस वसुदेव देवकीकु देव मुक्ति । वयसों तप बिन प्राप्त नही वे साधूकी संगती ॥ ६ ॥

५६९ ये अजब बात सुनाई भाई । गरुडको पंख हिरावे कागा लक्ष्मी चरन चुराई ॥ १ ॥ ये सूरज को बींब अंधारे सोवे चंदरकूं । आग जलावें । राहुके गिन्हो भोगी कहारे अमृत ले मर जावे ॥ २ ॥ कुबेर सोवें धनकें आस हनुमान जोरू मंगावें । वैसें सबही झुटा है निंदाकी बात सुनावे ॥ ३ ॥ समींदर तान्हो पीरत कैसों साधू मांगत दान । बहिनी कहे जन निंदक है रे बाको साच न मान ॥ ४ ॥

५७० सब ब्रजनारी सुने हरि जनमों नंद जसोदा पेट । चलवो चल उस हरि कुं देखें मिल निकलत है थाट ॥ १ ॥ नारी आरती करमे गावत नाम संगलें लागा छेद । हलदिर तेल लीये कर माहे मिलने चले गोविंद ॥ २ ॥ अपने अपने घर तोरन गुढिया धरत है जनमें सुत । नंदको भाग कोउ न जाने भेटी होवे अनंत ॥ ३ ॥ घर घर गावत राग रागिनी ठोर ठोरे भयी भार । वो मुख कहा कहूं अपने मुखसें आवे न जाने पार ॥ ४ ॥ ब्रज जन नारी मंगल

गावत चिर लुटावें भाट । गौ धरत और सुन्ना दान करत है बाट ही बाट ॥ ५ ॥ कुंकुम केसर चुव्वा चंदन फूल गुलालकी शोभा । देखत इंदर फणींदर महेंदर गावत हैं सब रंभा ॥ ६ ॥ नाद न भेरी तालही जब झट नादनें अंबर गाजे । नाना सुर बजावत छंदे ढोल दमामें बाजे ॥ ८॥ बहिनी कहे हरिजन्म को कहा कहूं हरि जानें । छंद प्रबंध सुनावत नारी देह भाव नहि जाने ॥ ९ ॥

५७१ कंटकको मल्लमर्द । दैतन को सिर छेद । सुत तेरा नंद कृष्ण । तोही जानी हैं । गोपिनको प्राणनाथ । भक्तनकू करे सनाथ । शास्तरकी ऐसी बात । संत जानी है ॥ १ ॥ धरमका रक्षन आया । पापकू सब डार दिया । वोही कृष्ण सुत भया । बात ये सत्य मानी है ॥ २ ॥ सुत मत कहो नंद । ब्रह्मसो येही गोविंद । बहिनीका भाट प्रबंध । सत्य सुनाईये ॥ ३ ॥

५७२ जीस आस जोगी जग । जीस आस छोड भाग । जीस आस ले बैराग बनबास जात हैं ॥ १ ॥ जीस आस पान खावे । जीस आस गंग जावे । जीस आस धरत सोवें । जपतपही करतु है ॥ २ ॥ जीस आस शिर मुंडे । जीस आस मुच्छ खांडे । जीस आस होत रेडे । जलममें वसतु है ॥ ३ ॥ वोही सत्य जान नंद । प्रगट भया है गोविंद । पुण्यही तेरा अगाध । बहिणी ये कहत है ॥ ४ ॥

५७३ जमुनाके तट धेनु चरावत गावत है गोवालरी । गीत प्रबंध हास्य विनोद नाचत है श्रीहरि ॥ १ ॥ मै येरी देखत मय नंदलाल कांसे पीत वसन है झलाल । कानोंमें कुंडल देति ढाल । सिरपर मोरपिसा चंदलाल ॥ २ ॥ अबीर गुलाल सबके माथा हार सुवास पिनाये । जाई जुई चंपन कोमल चंदन चंपक लाये ॥ ३ ॥ छंद धीमाधीमा सुनावत है हरि बंध गयो मेरे प्रान । बहिनी कहे सब भूल गये मेरा हरीसें लगा हे मन ॥ ४ ॥

५७४ मरनसो हक रे है बाबा । मरनसो हक है ॥ ध्रु० ॥ काहे डरावत मोहे बाबा । उपजे सो मर जाय भाई मरन धरन सा कोई बाबा ॥१॥ जनन मरन ये दोनो भाई मोकले तनके साथ । मौती पुरे सो आपही मरेगें बदनामी झुटी बात ॥ २ ॥ जैसा करना वैसा भरना संचित ये हि प्रमान । तारनहार तो न्यारा है रे हकीम वो रहिमान ॥ ३ ॥ बहिनी कहे वो अपनी बाता । काहे करे डौर । ग्यानी होवे तो समज लेवे । मरन करे आप दूर ॥ ४ ॥

५७५ सच्चा साहेब तूं येक मेरा काहे मुजे फिकीर । महाल मुलुख परवा नही क्या करूं पील पथीर ॥ १ ॥ गोविंद चाकरी दकरी । पकरी पकरी तेरी ॥ ध्रु० ॥ साहेब तेरी जीकीर करते माया परदा हुवा दूर । चारो दील भाई पिछे रहते हैं

बंदा हुजूर ॥ २ ॥ मेराभी पन सटकर साहेब पकरे तेरे पाय । बहिनी कहे तुमसे गोविंद तेरे पर बालि जाय ॥ ३ ॥

५७६ वैसी राम बढाई । सब जानो तुम भाई ॥ धृ० ॥ देव करे सो कहा न होवे सुनरे मूढो अंध । सीला मनुख भई जीस पावो गणिका छुटा बंद ॥ १ ॥ रावन मारके बिभिषण लंका । यह पाई राज्य कमाई । राक्षसकू अमराई दीयो । ये वैसी राम नबाई ॥ २ ॥ पहरादों बिख समिंदर बुरना परबत लोट दिया है । आगी जलावे पिता उसका सत्वसें राम रखावें ॥ ३ ॥ पानी माहें गजकू छोडे सावज मारन भाई । उसको रन्यो कुटनी मुक्तो करता राम सो वोही ॥ ४ ॥ मिराको बिख अमृत किया फत्तरकू दूध पिलाया । स्वामी विख चढे तब रामराम ऐसो बीरद् पढाया ॥ ५ ॥ शनि को रूप लीया राम राखो भक्त को सीस । ब्रह्म न सुदामा सुन्नोकी नगरी वैस करे जगदीश ॥ ६ ॥ वैस भगत बहुत रखे तब-कहा कहुजी बढाई । बहिनी कहे तुम भगत कृपाल हो जो करे सो सब होई ॥७॥

५७७ सांगितलें करीं रे । सुमना सांगितलें करिं रे । धृ० । शांति मनीं धरीं क्रोध दुरी करीं । वासना विवरीं सुमना । सांगितलें ॥ १ ॥ देव सखा करीं भाव मनीं धरीं । भक्तिसी तूं वरीं रे । सुमना ॥ २ ॥ बहिणी म्हणे जरी नायकसी तरी । पडसील तूं दुरी । सुमना ॥ ३ ॥

५७८ भवभ्रम निरसीं रे बापा । भवभ्रम निरसीं रे । धृ० । काय करूं इतरें । बहु ज्ञानें । चित्तभ्रया तूं रे बापा ॥ १ ॥ सिद्धि अनेका । नाना परिच्या । येथें तें न सरे ॥ बा० ॥ २ ॥ शास्त्रप्रसिद्धी कामुक बुद्धि । येणें काय तरे ॥ बा० ॥ ॥ ३ ॥ पांचही मुद्रा । लाविती नेत्रीं । भाल विलोकित रे ॥ बा० ४ ॥ दशनादि प्राण । गोंवुनी राहे । तेथें चिन्न विरे ॥ बा० ५ ॥ तें सुख साधुनि । घे नरदेहीं पुढील धाव पुरे रे ॥ बा० ६ ॥ बहिणी म्हणे तुज सद्गुरु वरदा विण तें तें दुर्गम रे ॥ बा० ७ ॥

५७९ अरे चित्ता चिंतनें तेंचि कीजे । व्यास पराशर चिंतुनि गेले तें हृदयीं स्मरिजे ॥ १ ॥ भ्रकुटीचे करीं चिंतन तें अली तदुपरी रमिजे । चिंतुनियां हरी चिन्मय होशील हेंचि मला उमजे ॥२॥ दैत्यसुतें हरी । चिंतियला तरी राक्षियला परिजे । द्रौपदीचे अती संकट वारुनी काय तुला नुमजे रे ॥३॥ बहिणी म्हणे कितीं सांगों मना तुज हित मनीं धरिजे । चिंतन भक्ती वरिष्ठची आहे सांग बरे समजरे ॥ ४ ॥

५८० जटा ना कंथा शिंगी ना शंख । अलख भेक हमारा बाबू । झोली ना पत्र कान में मुद्रा गगन पर देख थारा ॥ १ ॥ बाबा हमतो निरंजन वासी । साधुसंत

योगी जागलो हम क्या जाने घरवासी ॥ ध्रु० ॥ माता ना पिता बंधू ना भगिनी गण गोत ओ सब न्यारा । काया ना माया रूप ना रेखा । उलटा पंथ हमारा । बाबा ॥ २ ॥ थोती ना पोथी जाती ना कुल । सहजी सहज भेक पाया । अनुभव पत्रिसी सिद्ध की खादी उनकी ध्यान लगाया ॥ ३ ॥ बोध बलपर बैठा भाई देखत है तिन्ह लोक । ऊर्ध्व नयन की उलटी पाती । जहा प्रकाश आनंद कोटी ॥४॥ भाव भगत मांगत भिक्षा तेरा मोक्ष कीर रहा दिखाई । बहिणी कहे मै दासी संतनकी । तेरे पर बलि जावे ॥५॥

५८१ देखोनियां स्वरूप सुखावलें मन । पहातां जालें समाधान । शामसुंदर कांती । सर्वांगीं विभूति । नाम जयाचें उमापति ॥१॥ माथां जटाभार । वाहे गंगेचें नीर । रूप जयाचें अगोचर ॥ २ ॥ मस्तकीं डोळा । भाळीं चंद्रकळा । अर्धांगीं शोभे शैल्यबाळा ॥ ३ ॥ रुंड माळा गळां । त्रिपुंड पिंवळा । मुख साजिरें रविकळा ॥ ४ ॥ वहन वृषभ साजे । त्रिशुळ डमरू गाजे । शोभती कैसे योगिराजे ॥ ५ ॥ सिंगी स्फुरण करी । साजे मेखळा वरी । स्मशानवारू तयापरी ॥ ६ ॥ बहिणीचा स्वामी एक । त्रैलोक्यनायक । वसे सदा हृदयीं देख ॥ ७ ॥

५८२ स्थान मानातीता रूप वर्णापरता । वर्तवी स्वसत्ता हरिहर हरि रे । त्रिगुणी या कळसी मोहना श्रीदेवा शेषादिकां न वर्णवे रे । परत वाचा । जेथें रिघु नव्हे वेदाचा अगुणरूपधारी तूंचि बा रे । तो तूं आम्हां कैसें निज रूप दाखविसी । धन्य तुझा महिमा हरि रे ॥ १ ॥ तुज नमो निश्चिता ब्रह्मबोधा । न कळसी मन- बुद्धिभेदा । गुरुवाक्य अनुभवी जाणवी जो । खुणें तयासी न दिसे आपदा । ध्रु० । सप्तही पाताळें दशदिशा मंडळें चंद्र सूर्य तुझे उदरीं । तारागृहवरुणादि करी बावळी देख सामाविलीं तुवां श्रीहरी । विराटस्वरूपा अनुपान कळसी निजरूपा दाखविसी नयनीं कुसरी । चतुर्भुज कैसा नयनीं दाखविसी काय वर्णू तुझी थोरी ॥ २ ॥ सहजसिद्धा सच्चिदानंदकंदा । विश्वतारका स्वामी तूं हरि रे । काय पुण्य केलें न कळे कवणे जन्मीं लाधलों आम्ही तुज रे. । केवीं आम्हां तूं लाधसी कृपाळा कंस आहे तुज शत्रु रे । मारिलीं बालकें जेष्ठें तुजहुनी । तें लोपी चतुर्भुजरूप रे ॥ ३ ॥ दैवहीना कायेची मागणी होय अभागी या राज्यपद हें । कामधेनु काय सावे दारिद्र्यासी मिष्टान्न रोगी या पाहे । कल्पतरुतळीं काय असोनियां । दैव जवें साह्य नोहे । ऐसे आम्हा तूं केंवी होसी प्राप्त माझें मज कळलें हें ॥ ४ ॥ ऐकोनियां स्तवन दोघांचें पैं कैसे संतोषला कृष्णराणा । तपसामुर्ग्रानें तुम्हीं मागितलें मजला होईल नारायण । मग मी तीन वेळां पुत्र झालों तुमचा तिसरा गे हाची जाणा । म्हणोनियां रूप दाखविलें चतुर्भुज बहिणी जाणे त्याची खुणा ॥ ५ ॥

५८३ दों दिनकी है दुनीया रे बाबा । दों दिनकी है दुनीया ॥ ध्रु० ॥ ले अल्लाका नाम कूल धरो ध्यान । बंदे ना होना गुंग । गाव रतन येही सार । नई आवेगा दुजे बार । वेगी करा है फिकीर । करो अल्लाकी जिकीर ॥ २ ॥ करो अल्लाकी फिकीर । तव मिलेगा गामील पीर । बहिणी कहे तुजे पुकार । कृष्ण नाम तमे हुसीयार ॥ ३ ॥

५८४ भावना जयाची जयें ठायीं जैसी । फळप्राप्ति तैसी होय तया ॥ १ ॥ काय तो संदेह असे या अर्थासी । पाहिजे क्रियेसी अंगीं बळ ॥ २ ॥ ज्ञानप्राप्तीलागीं भजेल जो नार । ज्ञानचि निर्धार होय तया ॥ ३ ॥ बहिणी म्हणे हेत धरि जैसा भक्त । तेणेंचि तो मुक्त होय भावें ॥ ४ ॥

---

# नाच.



५८५ मनमोहना । कृष्ण कान्हा । यादव कुळभूषणा । गोकुळमंढणा । देवकीनंदना । मुनिमानसमोहना । त्रिभुवनसदना । आनंदवदना । गोपीमनरंजना । संकटभंजना । अरिकुळहनना । गुणनिधाना ॥१॥ कृष्णा नाच रे वेल्हाळा । म्हणती गोपी बाळा । थैं थैं ताल या । तोडीती । मिळोनीयां सकळां । छंदें नाचती । वाजविती । घागरिया खुळखुळा । करितसे नवला । यशोदा म्हणती भला भला ॥२॥ हरि जगज्जीवना । कृपाघना । यमुनाजलखंडणा । गोवर्धना गोकुळरक्षणा । दावानलप्राशना । गोपीप्रियकान्हा । मधुसूदना । पूर्णकामनिधाना । अकळाकळ निर्गुणा । चैतन्यघना । स्तविती गोपांगना ॥ ३ ॥ आनंदवदना । पुतनाशोषणा । रिठासुरमर्दना । भवमोचना । गुणविहीना । योगीजनपालना । धर्मरक्षणा पापछेदना । भक्तजनउज्जीवना । मदनमोहना । त्रिपुटीभेदना । न करवे वर्णना ॥ ४ ॥ हरि गोविंदा । परमानंदा । परनारीवेधका । नित्यानंदा । बालमुकुंदा । मोक्षपददायका । सच्चिदानंदा । आनंदकंदा । वैकुंठनायका । हरिगुण भरिता । देवकीसुता । पांडवप्रतिपालका ॥ ५ ॥ कृष्णारामा । मेघःश्यामा । पुरुषीं पुरुषोत्तमा । आत्मारामा । पूर्णकामा । योगीजनविश्रामा । व्यापकव्योमा । नकळे महिमा । वर्णितां हा ब्रह्मा । हरिनिजधामा । जय परब्रह्मा । काय वर्णूं तुझा महिमा ॥ ६ ॥ गौळणीबाला । मिळुनी सकळा । खेळविती

गोपाळा ॥ भक्तिजिव्हाळा । दाविती कळा । नाचविती सांवळा थैं थैं ताळा । हरिगुण बाला करिती स्तुति वेल्हाळा । तो सुख सोहळा । पाहती डोळां । बहिणी त्या गोंवळा ॥ ७ ॥

२

५८६ जय जय कृष्ण कृपाला हो जी नही किया जप तप दान । जिस गृहीं ब्राह्मन पूजन नहि रे भूमि नही गोदान ॥ १ ॥ तुम क्यौं प्रगट भयो कहा जानो । अर्चन वंदन कछु पालो होय अचंबा मानो ॥ २ ॥ अन्न दियो उसकू रासि नही रे देवत पूजो भाव । तीरथ यात्रा नहि कछु जोडी कहा भयो नवलाव ॥ ३ ॥ बनधारी और निरपानो है पत्रालिखावत जान । नंगाहि पाव नंगा देहही बनबन धुंडत रान ॥ ४ ॥ परबतमां हैं जोगी होकर छोड दियो संसार । धूमरपानें पंचाग्नी साधन बैठे जलकी धार ॥५॥ बहिणी कहे कहा जन्मको संचित प्राप्त भये हसवेला । चार भुजा हरि मुजको दिखाया येई कहो घननीला ॥ ६ ॥

---

# २३ पाळणा-पंचतत्त्वाचा



५८७ जो जो रे जो जो बाळा । प्रिये घालीं वेल्हाळा । उन्मनीं नीज लागो डोळां । हकू हकू घालीं ज्ञानकळा ॥ ध्रु० ॥ प्रपंच नाशवंत याचा नाहीं रे भरं-वसा । कन्यापुत्र गृहदारा हा तव भवबंधफांसा । दृश्य हें मायाजाळ हा तव काळाचा वळसा । सावध होई बाळा परतोनी पाहें कसा ॥ १ ॥ प्रथम स्थूळ देह ऐक तुज सांगतां । पृथ्वी आप तेज वायु नभ पांच तत्त्वतां । पंचभूतें हीं स्थूळ पांचा गुणांचीं पाहतां । पाहें तरी तूं नव्हसी बा यावेगळा समस्तां ॥ २ ॥ ऐसे हे स्थूळ देह पांचा भूतांचे जाण । एक भूत पांचा ठायीं क्रमीं पंचवीस गुण । मेळ-वुनी वांटियली गुणसाम्यता करून । ऐक आतां वेगळालीं सांगें भिन्न भिन्न ॥३॥ आकाशाचा गुण पांच काम क्रोध लोभ मोह । भय हें पांचवें रे हें तूं जाणसी संदेह हें तरि तूं नव्हसी तूं तंव अनामीक पाहें । सांडीं हा भ्रांतिवेश सद्गुरुवचनीं राहें ॥ ४ ॥ आकाशावांचून वायु जन्मला जाण । वायूचे पांच गुण । ऐक तुज सांगेन । चलन वलन आकुंचन । प्रसरण धावणें । हे तरी तूं नव्हेसी तूं यावेंगळा जाण ॥ ५ ॥ वायू पोटीं पाहें तेज जन्मलें आपण । तेंहि रे पांचा गुणीं आथिलें जाण । क्षुधातृषा अळस निद्रा मैथुन पांचवा गुण । हे तरि तू नव्हेसी तूं यावेगळा जाण ॥ ६ ॥ तेजापोटीं आप पाहें आपाचेही पांच गुण । शुक्र शोणित लाळ मूत्र

स्वेद पांच जाण । ऐसें हें कळसूत्र देह-पंचक जाण । हे तरी तूं नव्हेसी याचा साक्षी अनुभविसी ॥ ७ ॥ आपापोटीं पृथ्वी जाली पांचा गुणीं विस्तारली। अस्थीमांसत्वचानाडी रोम पांचवी केली । या गुणें तूं आथिलासी घेवुनी मी-पणाची खोली । हे तरी तूं नव्हेसी ऐसी जाण ज्ञान-किली ॥ ८ ॥ ऐसें हें पंचक जाण तूं या पंचकावेगळा । नाहीं तुज नाम रूप देह पंचकी लाधला । तूं तंव यासी साक्षीभूत । तूं तया अलक्ष सकळा । ऐसें बा रूप तुझें । निजीं नीज लागो डोळा ॥ ९ ॥ ऐसे हें स्थूल देह आणिक तीन आहेत । लिंग कारण महाकारण एक याचा वृत्तांत । सांगता तूं सावधान । दृढ देईं बाळा चित्त । जेणें तुज निज लागे हरे चौऱ्यांशीचा खेद ॥ १० ॥ आतां लिंगदेहे जेणें संसृती धरिलें । अंतःकरण चतुष्टय चौहु वृत्तीसी वरिलें । इंद्रिय दशक जाण पंचप्राण आथिले । पांचहि विषय जाण तुझें रूप यावेगळें ॥ ११ ॥ प्रथम निर्विकल्प कैसा विषय आठवे । तें तुझें अंतःकरण व्यानआधारें उद्भवें । श्रोत्रद्वारें वाचा प्रवेशे स्वभावें । शब्द गुणी आकाश यासी तो लिंगदेह स्वभावें ॥ १२ ॥ संकल्प विकल्प मन व्यान वायोची जाण । ज्ञानत्वचाइंद्रियासी पुरुष विषय संघर्षण । प्राणी हे इंद्रिय तेथें कर्म चालितसे जाण । हे तरी त नव्हेसी याही वेगळा सुजाण ॥१३॥ कल्पाकल्पित द्वैत मन या निश्चयासी येणें । ते तुझिया बुद्धि पाहें उदान वायोची गुणें । इंद्रियचक्षुद्वारें पाद इंद्रिया चलन । रूप विषयो तेजीं मुरे याही वेगळा त जाण ॥ १४ ॥ निश्चयासी विसर नोव्हे तेंचि जाण तव चित्त । प्राणवायांसंगें जिव्हा इंद्रियाचे सहित । शिस्न या इंद्रिय दारें रसगुण ओपी-निर्मून । हेंही बा तूं नव्हेसी । तूं या वेगळा निश्चित ॥ १५ ॥ मीपण सृजवी जो तोचि तुझा अहंकार । अपान वायोचिनी योगें घ्राणेंद्रिये निर्धार । इंद्रिये गुद द्वारें गंध गुण क्षिति स्थिर । हा तूं नव्हेसी तूं या वेगळा निर्धार ॥ १६ ॥ ऐसे हे लिंग देह एका जीवात्मयाचे । सूक्ष्म पंचभूत पंचवीस कळांचे । भवसिंधु तारावया गुरु साध्य आमुचे । तुकाराम कृपादानें तारियलें साचे ॥ १७ ॥ तैसे हे देहद्वय तुझें तूंच बा जाणनी । तरी तूं आपणासी कोण ऐसा मी नेणसी । ते तुझे विसरे देह नाम कारण त्यासी । हेही वा तूं नव्हेसी तूं या वेगळा असती ॥ १८ ॥ अंतःकरणीं स्फूर्ती राहे । निवांत व्यान वायूसंगें । व्यापोनि नाभिस्थान श्रवणद्वार तेणें भंगे । नायकती शब्द कान निःस्तब्धता होय वेगें । हा तुझा कारणदेह याचा साक्षी तूं अनुरागें ॥ १९ ॥ संकल्प विकल्प राहे होय निवांत मन । सर्वांगीं हा व्यान वायो व्यापुनी होय तल्लीन । त्वचा हात निवांत होय स्पर्श विषयो ग्रासून । हे तरी तं नव्हेसी तूं वेगळा जाण ॥ २० ॥ ते वेळीं निश्चयासी बुद्धि तुझी न स्फुरे । कंटस्थानीं उदान वायू गिळी उलटी वसरे । चक्षु पाद निवांत

होती रूप विषय तेजीं मुरे । याचा तूं साक्षीभूत तू या सहज वेगळा रे ॥ २१ ॥ जे वेळीं अनुसंधान धरूनि विसरे चित्त । अपान वायो हृदयस्थानीं मलमूत्रा कोंडित । जिव्हाशिस्न निवांत राहे । रसविषयो ग्रासित । हे तरी तूं नव्हसी तूं या वेगळा निश्चित ॥ २२ ॥ ते वेळीं अहंकार देहीं मीपण सांडी । अपान वायो गुदस्थानीं । नाशिक आकाशीं परवडी । घ्राणगुद निवांत राहे विसरे गंध विषय गोडी । ऐसे हे तीन देह । तुझा तूंचि बा निवडीं ॥ २३ ॥ ऐसें हें अज्ञान जाण तुझा तिसरा देह । कारण नाम याचें । हे तव भवदायक । जाणते जाणते रे, याचें भोगिताती दुःख । तुकाराम खास आला, हरियलें जन्मदुःख ॥ २४ ॥ आतां हा चौथा देह । महा कारण जाण तेथिचि स्थिति कैसी । ते तूं बुझे आपण । ही खूण विरळा जाणे । ब्रह्मास्मी होय स्फुरण । स्वानंद सोहळा जेथें गुरुखुणाचि प्रमाण ॥२५॥ स्थूलदेह जागृती तेथें विश्व अभिमानी । रजोगुण नेत्रस्थानीं । युक्त भोग ज्यालागुनी । षड्गुण अकार तंव ते तुज दृश्य म्हणवूनी । प्रणवाचा पाहिला चरण तूं तंव तेथींचा जाण ॥ २६ ॥ लिंगदेह स्वप्नावस्था । तेथें तेजस अभिमानी । सत्वगुण कंठस्थान । प्रयुक्त भोग त्यागुनी । षड्गुण उकारवंत तूं यावेगळा जाण । प्रणवाचा दुसरा चरण । राहें ऐसा ओळखून ॥ २७ ॥ आतां हा कारण देह याची सुषुप्ति अवस्था । अभिमानी प्राज्ञ जाण । तमोगुण हृदयस्थान । आनंद हा भोग जेथें षड्गुण विकार आपण । प्रणवाचा तिसरा चरण । तूं तरी तियेचा जाण ॥ २८ ॥ आतां हा कारण देह याचा सांगतां भाव । अनिर्वाच्य महिमा जेथें बोलावयासी नाहीं ठाव । बोलता राग येती संतप्त मानु भाव । म्हणवुनी गुप्त केले येथें गुरुचा अनुभव ॥ २९ ॥ प्रथम सरस स्वरूपीं जें बा सन्मुख स्फुरे । तेचि रे जीवनकळा निजस्वरूप तुझी रे । निमाल्या पांचही अवस्था तेचि स्वरूप तूं रे । हे स्थिती लागो तुज । जेविं सरिता सागरीं विरे ॥३०॥ ऐसा हा पाळणा रे । निज मायेचा उपाये । हलवी सोहं दोरी । तत्वमसी गीती गाये । निज रे निज बाळा सद्गुरुवचनीं पाहें । तुकारामें निजविलें बहिणी प्रेमें डोलताहे ॥ ३१ ॥

---

# २३ ( पाळणा ) जोगी



५८८ निज रे निज तान्ह्या बाळा । निज रे जीवींच्या जिव्हाळा । निज रे निज कान्हा वेल्हाळा । निज रे निज त्रैलोक्यपाळा ॥धृ०॥ करीं धरूनी दोरू। हे तिसेह ( ? ) लोळू। हलविती हळु हळू । यशोदा वेल्हाळा ॥ १ ॥ जो जो जो जो करि त्यातें । हा हा हा हा आला येथे । जोगी सांगे बाळकातें । यशोदा वेल्हाळा ॥ २ ॥ निजासी नीज म्हणे । कोण तें स्वरूप येणें । मायेच्या भुललेपणें । निजवी गोपाळा ॥ ३ ॥ हळु हळू पैं करी मुखें । हलविती तेणें सुखें । रुदना करी तूं देखें । गोविंद सावळा ॥४॥ म्हणे माता अवधारीं । जोगी आला बाहेरीं त्रिशूळ डमरू करीं दिसतो विशाळा ॥ ५ ॥ विभूतीचें विलेपन । मस्तकीं जटा जाण । मेघा तिसरा नयन । पाहें गोपाळा ॥ ६ ॥ रुंड माळा गळां । व्याघ्रांबर मेखला मस्तकीं झुळझुळ । वहातसे बाळा ॥७॥ कपाळीं अर्ध चंद्र । कानीं मुद्रा सुंदर । न कळे तयाचा पार । ब्रह्मादिकाला ॥ ८ ॥ इतुकें ऐकोनी कानीं । बाळ बैसे उठोनी । म्हणे माते नयनीं । दाखवीं त्याला ॥ ९ ॥ काळाचा जो काळ । व्यापक त्रैलोक्यपाळ । जोग्याचे दावोनी खुळ । नवल गोपाळा ॥ १० ॥ बहिणी गायी चक्रपाणी । करुनी नाटक वाणी । रामकृष्ण स्मरणीं । घेती सोहळा ॥ ११ ॥

---

# २४ फुगडी.



५८९ फुगडी घालितां नव्हे तुझा संग । जोंवरी आहे देहीं तुझ्या विषयांचा पांग । कामक्रोध लोभ यांचा नाहीं जंव त्याग । तोंवरी वायां अवघें फुगडीचें सोंग । फुगडी घे विवेक धरीं गे । पाहें परतोनी मागें । मग तूंची हरी गे ॥धृ०॥ अहंकार दंभ मान धरूं नको बाई । लोक लाज भीड यासी देसवटा देईं । काया वाचामनबुद्धि एकवट होई । फुगडी घालितां मग देव तूंचि पाहीं ॥ २ ॥ परनिंदा द्वेष याचा नको करूं साठा । धन विद्या पुत्र यांचा धरूं नको ताठा । अवघें मोडूनि धरीं एकभाव निष्ठा । बहिणी म्हणे तरिच तुज भेटी भगवंता ॥३॥

२

५९० फुगडी फू । उघडी हो । न होसी उघडी । तरी मग धगडी तूं ॥ धृ० ॥ भूमिवरी झाडीं । अंतरींचा काम क्रोध काढीं । सांडीं माया ओढीं । मग होय भावा गडी । या वासनेचे ओंचे । खोंवि आधीं साचें । निरोध इंद्रियांतें । मग हरिरंगीं नाचें ॥ ३ ॥ दोहीं पदावरी । एक भाव करीं । अशिपदीवरी । मग तूंच पाहें हरी ॥ ४ ॥ बद्ध सबळ भुजा । आधीं सारीं ओजा । जाण निजगुजा । मग फुगडी घाली ओजा ॥५॥ दृश्य भाव सांडीं । एक भाव जोडीं । प्रेमें घालीं फुगडी । स्वानंदाची गोडी ॥ ६ ॥ ऐसी बहिणी फुगडी घाली । अवघ्या आणियल्या हारी-पांगविल्या पोरी । न येतीं बरोबरी ॥ ७ ॥

---

# २५ पिंगा.



५९१ आपली मांडी उघाडितां लाज । शिकावितां राग काय तुज । न धरिसी सोय कांहीं विवेकाचें गुज । न लाजसी तूं होता भावा बापाची भाज ॥ १ ॥ घाल पिंगा ऐसा सांगतसें तैसा । कायावाचा मनें शरण रिघें जगदीशा ॥ धृ० ॥ इच्छे-चिया संगें नको फिरूं रानोरान । सांडिं सांडिं अभिमान नको वायां करूं शीण । इंद्रियांच्या वृत्ती अवघ्या धरीं सावरून । परंपरा हेचि गेले संत आचरून ॥ २ ॥ वासना कुरण इचा नको करूं पांग । आशा मोह तृष्णा यांचा आधीं सांडीं संग । काम क्रोध लोभ । यांचा करीं मनोभंग । गुणातीत स्वामी माझा ध्याईं पांडु-रंग ॥ ३ ॥ भक्ति आणि ज्ञान येथें धरीं शुद्धभाव । दया क्षमा शांति हाचि जाण पूर्ण देव । अनुताप बरवा मनीं असो सावयव । मिथ्या द्वेष त्यजुनी पाहें देहीं देव ॥४॥ ठेवुनियां हात कटीं नीट उभा राहें । सारूनियां दृश्य बाई एकाएकीं पाहें । जन-वाद लोक बाई सांडिं याचें भय । प्रेमें अंतरंगीं नाचें । सुखाचिया सोये ॥ ५ ॥ जाणिवेचा पिंगा । वायां नको धरूं देहीं । सोंग संपादणी । यासी वानिसी तूं कायी ॥६॥ स्तुति वाद भेद याचा नाम नको देहीं । सर्व निरंतर समभाव धरीं बाई । बहिणी म्हणे पिंगा याची जाण कला ऐसी । साधुनी या वेळीं पुढें सिद्ध-मुनी ऋषी । ज्ञानाचें अंग हेंचि जाण सर्वांविषीं । तुकारामकृपे सुखें नांदों अहर्निशीं ॥ ७ ॥

## २६ झिंपा.

५९२ पिटूनियां बाहें गे । नीट उभी राहें । बेडकीचे परी तोंड हालविसी काये ॥ १ ॥ झिंपा गे झिंपा रामचरण झिंपा । विषयाचे गोडी वायां नको करूं खेपा ॥ ध्रु० ॥ करुणेचे बोल माझे नको करूं फोल । धरीं भक्तिभाव जेणें वसे ज्ञान-बोल । नाच संतसंगें सखये अति प्रेमरंगें । जेणें तुज कृपा कीजे प्रीति पांडुरंगे ॥ ३ ॥ पंढरीचे पेठे सखये सुख आहे मोठें । धाउनीयां जाय बाई सर्व पांग फिटे ॥ ४ ॥ नका करूं फेरे बाई चौऱ्यांशिचे घेरे । धरा एकभाव जेणें भव सोडवी रे । ॥ ५ ॥ मुखीं नाम बोले बाई प्रेमभक्ति डोलें । सुखानंद रसे बाई स्वानुभवें बोलें ॥ ६ ॥ मध्यमेचे पारीं सखये मेळवोनी पोरी । सदा अंतरंग खेळा उन्मनींच्या भरीं ॥ ७ ॥ बहिणी घाली झिंपा । करुनी सद्गुरुकृपा । संतचरणीं विनटली मिळुनी ज्ञानदीपा ॥ ८ ॥

## २७ हमामा

५९३ तुज मज वार । येथें कोण म्हणे किर । ऐके सोसे सरसे मागें कां बोलसी फार ॥ १ ॥ हमामा रे पोरा हुंबरी रे । ऐसे करितां किती पांगली रे ॥ ध्रु० ॥ अहं सोहं स्वर सारुनी मिळूं एक घाई । स्वानुभवाचें सुख तेथें सांगूं आतां काई ॥२॥ क्षरनाक्षर वाजे अनुहात ध्वनी । पडिला विसरू झाली तन्मयता ध्यानीं ॥ ३ ॥ बहिणी घाली वार । अवस्था म्हणविले किर । परतली वृत्ती झाली निजानंदीं स्थिर ॥ ४ ॥

२

५९४ हमामा पोरा हमामा वाजे सवाई दमामा । दमाम्याची थोर बाई पोरा मेली तुझी आई । सांडीं ईचा चाळा पोरा लावीं ऊर्ध्वं डोळा । रडोन आतां काई । मी सर्वे तुझी आई । बार धरी नेटें । समान करीं बोटे । नाम हुंबरी-छंदें उडवूं नको बेंडे । बाई घेई पोरा । बांधून हातीं दोरा । हुंबरी घाली नेटें । त्रेवून हातीं कांटे खेळ मल्हे फुका । चुकवीं जन-थुंका । हुंबरी उतरी घाई । विवसी ठांई ठाई । हुंबरी घालितां सोसें मग पाहें तें सुख कैसें । बहिणी सुखें घाली । अनुपम हुंबरी घाली ।

## २८ हुंबरी.



५९५ ऐका यमुने घोषा । उडाला पेंद्या कैसा ॥ १ ॥ भरलें अंगीं वारें । हसतीं कैसीं पोरें ॥ २ ॥ ठेवुनि तीरीं झारी । आली न म्हणे पोरी ॥ ३ ॥ बाहे पिटी मांडी । वरी सोस धरी तोंडीं ॥ ४ ॥ घेवुनि हातीं कांटे । हुंबरी घाली मेटें ॥ ५ ॥ मज पेंद्याचा वार । येथें कोण धरी धीर ॥ ५ ॥ आली म्हणे पोरी । करीन तुज नवरी ॥ ६ ॥ लाविला मज चाळा । फोडीन तुझा डोळा ॥ ७ ॥ घाली पेंद्या वार । यमुना नव्हे स्थिर ॥ ८ ॥ उडत कसा फोडी । खरेसी आली जोडी ॥ ९ ॥ सोस कंठीं राहे । हुंकार न सांडी पाहे ॥ १० ॥ यमुना नव्हे स्थिर । पाडिला धरणीवर ॥ ११ ॥ धांवोनी आला हरी । पेंद्या धरिला दों करीं ॥ १२ ॥ यमुना केली स्थिर । म्हणम्हणे आतां कीर ॥ १३ ॥ घेतली आळी मोठी । यमुना झाली खोटी ॥ १४ ॥ राहिला यमुनेचा घोष । सोडिला पेंद्यानें सोस ॥ १५ ॥ आली म्हणे पोरी । थोपटी कैसा टिरी ॥ १६ ॥ बहिणी हुंबरा गाय । नाचत पंढरीराय ॥ १७ ॥

---

## २९ वासुदेव.



५९६ हरीं वासुदेव द्वारासीं आला । कोणी तरी भिक्षा त्यासी घाला गा ॥ ध्रु० ॥ कर्म करूनि फळ अल्प वी । अहंभावासी येवूनी द्यावें । मूळ नासता ते ऋणी त्याचे । सर्व संचित पायीं लावा गा ॥ २ ॥ फावे लक्षअलक्ष याही वेगळे । ध्याये ध्यानाहुनी निराळे । दृश्य द्रष्टा दर्शन येथें गेलें । तेचि दाता दिले पाहिजे गा ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सरलें द्वैत । सच्चिद्धन आनंद भरित । जेथें वेदाचा न कळे प्रांत । तया दानाचे आम्ही अंकित गा ॥ ४ ॥

---

# ३० खेळिया



५९७ एका खांबावरी दुखांबाची माडी । तयावरी तीखण आहे । तया पांच-उभविलीं घरें । तया नव द्वारें पाहे रे ॥१॥ सांग रे खेळिया याचें नांव काय़ी । हें कोणि रचिलें माझा भाई । कोठून झालें कोण यासी व्यालें । याचा धनी आहे कवण्या ठाईं रे ॥ ध्रु० ॥ पंचवीस खांब त्यासी बहात्तर कोठड्या । बावन्न खिळे पाहीं । पंधराजण त्यामधीं निध निध करिती । चौघे राखिती ठाईं ठाईं रे ॥ २ ॥ सातही बाजारीं दिसती हरी । तेथें घडामोड होतें नानापरीं । साधूनियां चौक चावडी । त्याचे सहा कारभारी । अठरा कोतवाल फिरती दिनराती । अहं ब्रह्मास्मी ऐसे जागविती । बहिणी म्हणे तेथें ओंकार ध्वनी । उठोनी कोठें सामावतें ॥ ३ ॥

५९८ मेरूचे शिखरीं पडियेली खाण । तेथें लोभ्यानें काढिली धावण । एकी बोंबें त्रिभुवन गाजलें । तेणें डगमगिलें शेषासन ॥ १ ॥ सांग रे खेळिया अनुभव याचा । हा तुझा तुजपासीं आहे न कळे तरी हा तिचे गुरुमुखें बा रे पाहे ॥ ध्रु० ॥ अंधे थोटे पांगळे बहिरे । येणें काढिलें धावणें । एका पुढें एक घेताती लाग । ते पायाविण चालती गगन ॥ २ ॥ आंधळा मार्ग काढीत चालला । त्याचा पांगुळें घेतला लाग थोटयानें हता शस्त्र । ते चोरासी मारीती कैसा गा ॥३॥ वेद पंडित महानुभावी योगी । हा तयाचा अनुभव आहे । बहिणी म्हणे हा अगम्य सर्वां । गुरुकृपेविणें न कळे पाहे ॥ ४ ॥

---

# ३१ दादल्या



५९९ त्रिकुटशिखरीं नांदे एक नारी । त्रिभुवन तिचे उदरीं । नातू पणतू हरि-हर ब्रह्मादिक । ते पुरुषेविण नांदे घरीं ॥ १ ॥ नवल सांगतां नये । ते दादुल्यासी म्हणे बाप माये । शेखीं बापासीच माळ घालून तिनें । प्रपंच रचिला आहे ॥ ध्रु०॥ वांझीच ते व्याली बाळ । तियेपासून तिन्ही बाळ । उत्पत्तिस्थितीप्रळय-समर्थी । आपली आपण खाय बाळ ॥ २ ॥ पाहातां शेंडा ना मूळ । परि तिचेच

येवढे खेळ । एकाचे पंचवीस करून । तिनें रचिले ब्रम्हांड गोळ ॥ ३ ॥ बापाची लेकीच नवल व्याली कैसें जगीं । असें जाणून खळू खेळे । कैसा तोचि एक जाणिजे भोगी ॥ ४ ॥ ऐसी ते नारी वर्ते एक चराचरीं । कळे तियेची थोरी । बहिणी म्हणे तें अगम्य सर्वां । आहे तुम्हां आम्हां माझा हरी ॥ ५ ॥

---

# ३२ डोहो



६०० डोहो कान्हा डोहो । निजभाव धरी डोहो । भक्ती अंगीकारी डोहो । होई निर्विकारी डोहो । कल्पना वारी डोहो श्रवण करी डोहो । मन न धरी डोहो निजध्यानीं विवर डोहो । तोचि धरी हे साक्षात्कार डोहो । डोहो डोहो डोहो डोहो । डोहो घालितां जडला भावो । बहिणीसी फावला प्रेमभावें । तुकाराम स्मरणें हाचि लाहे ।

---

# ३३ सौरी.



—१—

६०१ काजळकुंकां भुलसी वेडया । सौरियाच्या वेशा । मुळीं कामा पडिला चिरा । म्हणोनी नाचों ऐशा ॥ १ ॥ निलाजिऱ्या जाय तूं बोलसी काये । लटिक्या मार्गें हिंडोनी तुज हातीं येत काये ॥ २ ॥ विषयाचा धुमस घेउनी हिंडसि आम्हा-मार्गें । मुळींचा तो ठाव रिता विनोद कुणासंगें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सौरीपुढें झांकणें तें काये । खरें खोटें अवघें तुझें कळे अंतर्बाह्य ॥ ४ ॥

—२—

६०२ पुरुष व्याली कन्या झाली नवल सांगूं काये । कन्ये बापू गरव्हार केला तो घे आपुली माये ॥ १ ॥ उगवा माझें कोडें सवरी नाचे पुढें । पहा वेदशास्त्रीं याचें गुज आहे थोडें ॥ २ ॥ नर नव्हे नारी नव्हे कांहींच ते फेरी । ऐसें तैसें ना हें बाई दौर आला करीं ॥ ३ ॥ बहिणी घाली साद अवघा । तोडुनि वेवाद । सौरीयाच्या वेशें नाचे । सारुनि भेदाभेद ॥ ४ ॥

—३—

६०३ मुळींच कांहीं व्यसन नाहीं कैंचा संसार। लटिकी भ्रांती पडली होती कैंचा भवसार ॥ १ ॥ चाल माझ्या रामा गाइन तुझिया नामा। मनें मुळीं घेतली धांव म्हणोनि नाचें प्रेमा ॥ २ ॥ सोडुनि लाज झालें निर्लज्ज डौर घेत हातीं। प्रेमभरें नाचत पुढतीं अविद्या करुनी परती ॥ ३ ॥ अविद्याविधी सारुनी सिद्ध झालें निःसंग सौरी। स्वरूपाचें जन्मस्थान दावीं घरोघरीं ॥ ४ ॥ विधी-निषेध कैंचा आम्हां सौरीयाची याती। बहिणी भावें घेउनि डौर ऊर्ध्व मुखें गाती ॥ ५ ॥

---

# ३४ डौर.



—१—

६०४ कुडापियला देस आतां नका करूं बळ। झालें रामराज्य तुमचे वोसरले बोल ॥ ध्रु० ॥ धरा बाई लाज कांहीं म्हणा रामराम। साहेबाचें देणें तेणें झालें पूर्णकाम ॥ १ ॥ साहेबाचें देणें तेणें मोकळें केलें आम्हां। गुरुकृपा जाणति संत काय कळे तुम्हां ॥ २ ॥ रुक्यासाठीं फोडूं डोई। हिजडी नाम आम्हां। निज-भावाचा घेउनि डौर हिंडूं चारी धाम ॥ ३ ॥ जातिकर्म कूळ नाहीं सौरियेच्या वेषा। बहिणी म्हणे निःशकपणें हिंडों दाही दिशा ॥ ४ ॥

—२—

६०५ काजळकुंकू धरा तेलफणी करा। उगवला दिनराज बाण आले चौबारा ॥ ध्रु० ॥ चला झडकरीं नाचूं प्रेमभरीं ॥ बुडेल दिनराज मग मरों येरझारीं ॥ १ ॥ नर नव्हे नारी नारी नव्हे सौरी। असें नव्हे तसें नव्हे डौर आम्हा करीं ॥ २ ॥ एकावरी एक पुढें त्याही वरी एक। भरले दिवाण टक्कासाहेब माझा देख ॥ ३ ॥ बहिणी घाली साद अवघा तोडुनि वेवाद सौरीयाच्या वेषें नाचे सारुनि भेदाभेद ॥ ४ ॥

—३—

६०६ देव आठवा संसार आटवा। पांग फिटवा तेव्हां सद्गुरुकृपा ॥ १ ॥ ज्ञान करावें वैराग्य धरावें। स्वरूपा वरावें तेव्हां सद्गुरुकृपा ॥ २ ॥ वृत्ति सोडावी

निजवृत्ति जडावी । अखंडता घडावी तेव्हां सद्‌गुरुकृपा ॥ ३ ॥ मनासी दंडावें मायेसी भंडावें । द्वैतासी खंडावें तेव्हां सद्‌गुरुकृपा ॥ ४ ॥ भक्ति करावी समता धरावी । जाणीव सारावी तेव्हां सद्‌गुरुकृपा ॥ ५ ॥ असत्य त्यजावें सत्यासी भजावें । संतासी पुजावें तेव्हां सद्‌गुरुकृपा ॥६॥ बहिणी म्हणे ऐशा निर्धारा करणें । तरीच वरणें सद्‌गुरुकृपा ॥ ७ ॥

---

# ३५ मुंढा.



—१—

६०७ मुढा तोची मुंढा अवघा लुंढा करी इंद्रियाचा । मन जिंकोन करील त्याग अवघा वासनेचा ॥ १ ॥ तरीच बरोबरी होईल समसरी । नाहीं तरी जाय अधोमुख करीं ॥ २ ॥ मनपणीं मना कोठें घेऊनीयां वाव । पूर्णपणीं पाहीं अवघा आत्मदेव ॥ ३ ॥ सुखस्थिती अनुभवविज्ञानेसी लाहे । बहिणी तोची मुंढा अंतर्बाह्य पाहे ॥ ४ ॥

—२—

६०८ बडा भेक शिर मुंडाया कफणी गळामा है वस्तादकी खूण पाया तोवरीकीया क्या है ॥ ध्रु० ॥ आपकूं पछान । देख दाई मकान । पकड रहिमान । क्यौं हुवा है हैराण ॥ १ ॥ पटपटकर क्या किया । जिकीर नहीं प्यारी । वस्ताद तुजे क्या करे । किये पेटकी कामगिरी ॥ २ ॥ पांच बखत निमाज करत है । किसे पुकारता है । कंहा अल्ला किधर गया । उपर देखता क्या ॥ ३ ॥ बहिणी म्हणे नहीं करार । दिलमे पडी चुकी । वस्ताद तूतें क्या करे । पेटमे वासना भूकी ॥ ४ ॥

—३—

६०९ मुंडा मुंडा सब कहते दिलका नही कोयी । उपर तलखी चौधी भूजे। आप पछाने ओही ॥ध्रु०॥ कायकूं लीया भेक। अल्लाकू फिर देख । मनसा मुंढी न फिरे तों गांडमे मारू मेख ॥ १ ॥ बगलम्याने तबल लेकर । फिरते दारोदार । पेटके खातर काटते मास। । दिलकी नही खबर ॥ २ ॥ झुटी माया तेरी काहेकू पकडे उसके साथ । ढुंगसे ढुंग घसतां मुंडे क्या कीया शाहामत ॥ ३ ॥ बहिणी कहे मर बे मुंडे झुटा तेरा सोंग । वासना मुंडी नही काफीर तो काहेकू नाडते जग ॥ ४ ॥

---

# ३६ श्रोता ( गाणें ).



६१० श्रोत्याविण जें गायन । गात्याविण श्रोता जाण । त्याची सांगेन तें खूण । आयकावी ॥ १ ॥ अन्न सुरस निपजलें । नेऊनी रोग्या वोगरिलें । तैसें व्यर्थ गाणें केलें । श्रोत्याविणें ॥२॥ गाणें होतसे सुस्वर । श्रुती लावून मधुर । राजा श्रवणीं बधिर । तरी तें व्यर्थ ॥ ३ ॥ अति सुंदर पद्मिनी । रंभा वेश्या मृगनयनी । पती नपुंसक गौणी । तरी तें व्यर्थ ॥ ४ ॥ अश्व सुंदर नाचत । नाना कलाही दावित । बैसणार नाहीं तेथ । तरी तें व्यर्थ ॥ ५ ॥ देह सुंदर चांगलें । परी प्राणची ओसरले । जीव स्वर्गग्रामीं गेले । तरी तें व्यर्थ ॥ ६ ॥ विप्र सुंदर नेटका । परी कोड मुखीं देखा । तरी तो जाणावा अवांका । सर्व व्यर्थ ॥ ७ ॥ कर्म करी द्विज सांग । परी गायत्रीचें नेणें अंग । तरी तें सर्व सांगोपांग । अवघेंचि व्यर्थ ॥ ८ ॥ भागीरथी गंगाजळ । उत्तम हें सुशीतल । परी तें अमंगळ स्थळ । तरी तें व्यर्थ ॥ ९ ॥ तैसें श्रोतेविण गाणें । तें तंव लाजिरवाणें । म्हणून सावध ऐकणें । हरिकथा ॥ १० ॥ तुम्ही श्रोते आम्हां कैसे । राया परीक्षितीऐसे । बहिणी म्हणे त्या मानेसें । नाम गावें ॥ ११ ॥

---

# ३७ डफगाणें.



६११ अरे गलबला करूं नका । नाम उगेंचि ऐका । तुम्ही आम्ही जावूं लोका । देवाचिया ॥ १ ॥ तुम्ही भावें जरी ऐकाना । तरी मी पद गायीना । मज पडे हें मौना । कथेमध्यें ॥ २ ॥ तुम्ही श्रोते सावधान । ऐका बोबडें भाषण । तुम्ही कृपा जी करून । परिसावें ॥३ ॥ मी तरी शिवरीचा गाण । तुम्ही येथीलचि जाण । तुम्हां आम्हां आजि लगन । लागलें असे ॥ ४ ॥ जैसा पडिला कशाळीं । तोचि पुजावा त्रिकाळीं । म्हणवुनी तुम्हांजवळी । मागतसें ॥ ५ ॥ जरी ऐकाल सादरें । तरी स्मरती उत्तरें । नाहीं तरी व्यर्थ कां रे । पीडा आम्हां ॥ ६ ॥ मन तुमचें गुडगुडी । येथें हरदास बडबडी । तरी झाली घरबुडी । श्रोत्यावक्त्यां ॥७॥ तुम्ही घेत असां विडे । माझेमागें कुणीकडे । जैसें प्रेतापुढें रडें । तैशापरी ॥ ८ ॥ मन तुमचें दोघरीं । क्रीडतसे बाजेवरी । गळासीये घरी । देह येथें ॥ ९ तुम्हां चढलासे उबागीं

हरिदास गाय रंगीं । द्योधा नागवण वेगीं । घरां आली ॥ १० ॥ यांचें चित्त मोच्या-पाशीं । कथा नयेचि मनासी । तरी कासया कथेसी । अडचणी ॥ ११ ॥ ऐसे उदंड बोलतां । व्यर्थ चावटी सर्वथा । अवघे ऐका जी कथा । मनोभावें ॥ १२ ॥ असो सिद्ध महामुनी । संन्यासीही असो कोणी । ऐका सादरें श्रवणीं । हरिकथा ॥ १३ ॥ जपी तपी असो सापी । असो अश्रमीनींपापी । परी देवाचे स्वरूपीं । चित्त दीजे ॥ १४ ॥ असो पंडित वेदांती । मीमांसादि हे व्युत्पत्ती । परी कथा अति-प्रीती । ऐकावी ॥ १५ ॥ असो सिद्ध वा साधक । असो राजा अथवा रंक । कथा आधीं आवश्यक । परिसावी ॥ १६ ॥ असो ब्रह्मज्ञानी थोर । अतिव्युत्पत्ति चतुर । परि कथेसि तत्पर । चित्त दीजे ॥१७॥ ऐसीं नामें मज घेतां । फार वाढेल पैं कथा । पुढें हरिकीर्तिकथा । आहे गाणी ॥ १८ ॥ हेंचि सकलां प्रार्थना । करितसें भावें जाणा । कथा ऐकोनियां मना । विवंचिजे ॥ १९ ॥ जरी इतुकें न ऐका । तरि घरासी जाना का ? नाहीं वाटे कांहीं धोका । अंधारींचा ॥ २० ॥ बहिणी म्हणे स्वानुभव । ऐका धरूनियां भाव । तेणें भावें तुम्हां देव । जवळी होय ॥ २१ ॥

---

## ३८ नवल.



६१२ नवल नवल नवल ऐक देखिलें साजणी । जेथें अनुहात वाजतो ध्वनी । तो बाईगे आनंदु जीवासी जाला । परमात्मा हरी देखिला ॥ १ ॥ नानापरिचे दशनाद उठती घेउनि छंद । गीतीं गाती हरि गोविंद गे ॥ २ ॥ बहिणी म्हणे शेवटींचा नाद तो निःशब्द साचा । आळवितो नंद नंदाचा गे ॥ ३ ॥

---

## ३९ संचित.



६१३ संचितें आणिलें भागा । यासी काय करूं सांगा । आत्मा आत्मिं नुरोनी जागा । ब्रह्मचि जालें ॥ १ ॥ यासी यासी काय करणें । शिकावितां न घे मनें । देखोनी अखंड चिद्घने । स्वरूप डोळां ॥ २ ॥ तेथें न देखे जातकूळ । वर्णावर्ण

भ्रमजाळ । स्वरूपीं राहिलें आढळ । मन हें माझें ॥ ३ ॥ आतां हें न चले कांहीं । उपाव सांगतां देही । उपदेश महावाक्य पाहीं । सर्वत्र जालें ॥ ४ ॥ बहिणीसी भेटला तुका । महावाक्य जाहलें फुका । ऐकती घोकती ते परलोका । धावंत जाती ॥ ५ ॥

---

# ४० सोंग.



—१—

६१४ सांडावें तें काय आतां सर्वही सर्वेची आहे । जावें आत्मा कोठें सारें मायावेष्टित दिसे । वैराग्य घेउनी त्यजूं भवासी । तें तंव पुढेंची भासे । यासी यासी काय करणें मन स्थिर नसे ॥१॥ठायींच्या ठायीं बरे रे असे मोकळ्या वृत्ति । विटंबूनी कायास्थिति आतां हिंडावें किती । घरींच्या घरीं बरवा पाहे विवेकबुद्धी । येणेंच जोडेल तुज आत्माराम त्रिशुद्धी ॥ २ ॥ घर जरी त्यजूं पाहसी तरी तुझें शरीर सर्वें । भोजनीं क्रूरता धरिसी तरी कल्पना सवें । कन्यापुत्र त्यजिसी जरी तरी इंद्रियें सवें । शरीरसंबंध तुझा ज्ञानें करूं तुटे स्वभावें ॥ ३ ॥ सांडावें जें आतां काय नव्हे वासनात्याग । सांगावें तें सर्व दिसे जिव्हा उपस्थ सांग । जयासाठीं केला विटंबू तें तव न खंडी पाठी । बहिणी म्हणे मिथ्या सोंग तुमच्या फोल या गोष्टी ॥ ४ ॥

—२—

६१५ सोंगसंपादणी केली आश्रयाची । नाहीं स्वरूपाची खूण मुद्रा ॥ १ ॥ ठकवूनी जना भरितसे पोट । मनीं नाहीं विट वासनेचा ॥ २ ॥ बहिणी म्हणे कैसे केले जन वेडे । दावी सोंग कुडे पोट भरी ॥ ३ ॥

---

# ४१ संन्यास.



६१६ ज्या नांव संन्यास षड् ऊर्मी जिंकी । स्वानुभवें सुखी निर्विकार ॥ १ ॥ मानूं आम्ही तया संन्यासी केवळ । येर ते खळ पोटासाठीं ॥ २ ॥ तीही आश्र-मींची क्रिया ठसावेल । शांति ही लोळेल सर्व देहीं ॥ ३ ॥ त्रिकाळाचें ज्ञान ॥ विधीचें पालन । व्यास नारायण चित्तामाजीं ॥ ४ ॥ निर्वैर अंतरीं नुरे ज्या अहंता संन्यासी तरवतां बहिणी म्हणे ॥ ५ ॥

# ४२ भाट.



—१—

६१७ नंदजी आसीस भाट भट भाटको आसीस है । चिरकाल सुत तेरो । सत्य जाण बात है । गजदासी घोडे । वस्त्र शस्त्र दान देत है । कृष्णको प्रताप भाट । बहिणी मूसे गात है ॥ १ ॥

—२—

६१८ जसोदाको पुण्य फलो । नंदजी तेरो भलो । कृष्णजीकी आस डारो मायामांह नंदजी ॥ १ ॥ योही ससर ब्रह्म निर्गुणहि वाको नाम कृष्णजी । स्वरूप-धाम वैकुंठको जाणजी ॥ २ ॥ कूर्म नारसिंव्हरूप । फरश वामनरूप । मत्स्यही वराहरूप । योही कृष्ण सत्यजी ॥ ३ ॥ छोडा मायापूत वैसी यो यो सत्यहृषी-केशी । उसको दरशन दोसी । पाप जावे बहिणीका जी ॥

---

# ४३ भूत.



६१९ कैसें एक नवल वर्तलें । सांगतां भये ऐसें देखिलें । मन माझें शंकावलें । विवेकासी । गूढ वो पाडिलें ॥ध्रु०॥ बुद्धीचा पैनिश्चयो राहिला । चित्ताचा हेतुचि तुटला । अहंकार हा समूळ निमाला । नवलावो सखिये जहाला ॥ १॥ जागृतीच्या जागृतीमाजी वो । जागताचि देखिलें चोज वो । मेणों कैंची आली दूती वो । खुणावोनी खूण हे दावी वो । शब्देंविण लक्ष तें लागलें । लक्षीं लक्ष लागतां भेदलें तेणें देह व्याकूळ पडियेलें । अंतर्बाह्य स्वरूप कोंदलें ॥ २ ॥ रूप त्याचें सांगतां अपार । षड्वर्णारहित सुंदर । नयेचि शोभा कोटी दिनकर । वार्णितां भागला देख फणिवर । ऐसें रूप न देखें मी डोळा । तिन्ही लोक धुंडितां भोंगुळा । देखोनी अंतरीं कळवळा । बोलतां हे कुंठित रसाला ॥ ३ ॥ एकाएकीं पडियेली गांठीं । देखोनियां मन वो घे तुटी । अखंडतां वेधली हे दृष्टी । परमानंदीं पडियेली मिठी । निमाल्या वैखरी आदिवाचा । जाला न्यासचतुष्टय देहाचा । प्रकाश हा थोर

---

१ भूगोल (?)

उन्मनीचा । काय सांगो महिमा तियेचा ॥ ४ ॥ अवस्था हे लागतां उन्मनी । ब्रह्मरूप दिसे जनीं वनीं । झाडितां हा न झडेचि कैसा । पहातां हा गे सर्व देहीं ठसा । पृथ्वी आप तेज या आकाशा । व्यापक हा दिसे दाही दिशा ॥ ५ ॥ आतां काय करूं गे साजणी । कैसी याची जाली झडपणी । भेटे वो ऐसा कोणी गुणी । दैवत हें काढील क्षणीं । सहा चारी अठरा भागले । कांहीं केल्या कदा न उखळे । बहिणी म्हणे तें अधिकाचि जडलें । कोण भूत मज न कळे लागलें ॥ ६ ॥

---

# ४४ भैरव. [ जोगी ]



६२० विवेक जालारे बहिरव ( भैरव ) । हातीं घेउनी डौर भाव ॥ १ ॥ फेरा घालितो या नगरा । क्षेत्रकाया-कासी पुरा ॥ २ ॥ माय सोनारीचा राजा । जय, अनंत पादभुजा ॥ ३ ॥ महा स्मशानींचा वास । अखंड उन्मनीचा ध्यास ॥ ४॥ हातीं ' डमरू ' निजबोधाचा । त्रिशूळ भक्तिवैराग्याचा ॥ ५ ॥ शांतिविभूतीचें लेणें । बरवें दावी सुदर्शनें ॥ ६॥ कानीं योग तेची मुद्रा । भाळीं शोभे अर्धचंद्रा ॥ ७ ॥ माथां केयूराचा भार । निजवृत्ति निर्विकार ॥ ८ ॥ अनुहात शिंगी वाजे । तेणें विधिगोळ हा गाजे ॥ ९ ॥ नकळे योगीयाची लीला । कटीं नवखंड मेखला ॥ १० ॥ कांखें ब्रह्मांडाची झोळी । पृथ्वीपात्र करतळीं ॥ ११ ॥ अष्टभैरवांचा राव । देहीं आत्मा सदाशिव ॥ १२ ॥ डमरू बोध करी जनां । त्रिशूळें गुण छेदी जाणा ॥ १३ ॥ ऐसा योगी भक्तराव । पुसे अभक्तीचा ठाव ॥ १४ जिकडे घाली भावें फेरा । मोडी पातकाचा थारा ॥ १५ ॥ नाम जग जोगी गाये । हिंडोनीयां जनीं पाहे ॥ १६ ॥ जेथें दुसे भाव मनीं । तेथें करी सिंगी ध्वनी ॥ १७ ॥ शिंगी महावाक्य जाणा । तेणें सावध करी जना ॥ १८ ॥ मी तंव सांगें जगजोगी । देव आहे तुमचे संगीं ॥ १९ ॥ कां रे ओळखाना देवा । देहीं आत्मा सदाशिवा ॥ २० ॥ नका घालूं येरझारा । हा तो शेवटींचा फेरा ॥ २१ ॥ कांहीं करा कोणी दान । उभें केलें कां अजून ॥ २२ ॥ लक्ष चौऱ्यांशीचे फेरे । कां रे घालीतसां घेरे ॥ २३ ॥ नका घेऊं भार माथां । भावें अर्पा भगवंता ॥ २४ ॥ विवेक बहिणी सांगे लोकां । सद्गुरु स्वामी माझा ' तुका ' ॥ २५ ॥ जगा जागविलें तेणें । आतां नाहीं येणें जाणें ॥ २६ ॥ बहिणी गाई जग जोगी । निजसुख अखंडित भोगी ॥ २७ ॥

---

# ४५ आरत्या.



## १ आरती श्रीरामाची.

६२१ आरती रामराजा ॥ दशरथ-आत्मजा ॥ जानकी वाम अंगीं ॥ जय लक्ष्मणा-ग्रजा ॥ ध्रु० ॥ सन्मुख मारुती तो ॥ पायीं अखंड दृष्टी ॥ चामरें छत्रधारी ॥ उभा-भरत पृष्टीं ॥ १ ॥ टाकूनी देव येती ॥ तेहेतीस कोटी । श्रीरामनाम शब्द होई गर्जना मोठी ॥ २ ॥ अंबरीं पुष्पवृष्टि । होत आनंद मोठा ॥ धन्य हा मृत्युलोक ॥ उणें केलें वैकुंठा ॥३॥ ब्रह्मादि देव तिन्ही ॥ सुख पाहाताती डोळां । घोटीती लाळ तेहीं ॥ ऐसी चुकलों वेळा ॥ ४ ॥ तेहेतीस कोटी देव ॥ पुढें तिष्टताती ऊभे । श्रीरामनाम शब्द नाद दाटला नभीं ॥ ५ ॥ सुस्वरशंखभेरी । गाई नाम नारद । तुंबर नाच-ताती ॥ देवा जाणविती भेद ॥६॥ वाजती दिव्यवाद्यें ॥ शंखभेरी अनेका । बहिणी तिष्टत आहे ॥ हातीं घेउनि पादुका ॥ ७ ॥

## २ आरती सूर्याची.

६२२ नाकळसी वेदां विबुधा शास्त्रा श्रवणानें । न पडसी ठाई अनेक परिच्या-मननानें । मेणति योगी जन ते इंद्रियदमनानें । ऐसें तव रूप बोधत सद्गुरुवच-नानें॥१॥जयदेव जयदेव जय चित्सूर्या । प्रकाशघन हृद्भुवनीं निजसाक्षी तुर्या ॥ध्रु०॥ शेषही श्रमला स्तावितां जिव्हा हे चिरली । ब्रह्मा वदतां वाणी बुद्धि ओसरली । ध्यानें शंकर श्रमला मग गंगा धरिली । अपार महिमा न कळे ही किर्ति उरली । ॥ ज० ॥ २ ॥ शब्दें न पडसी ठायीं लक्षातीत लक्ष्रू । हेंही न घडे अतीत वर्तसि निजचक्षू । उत्तम पुरुषा लक्षुनि टाकियला मुमुक्षु । बहिणी अद्वय चरणीं उत्तम हा पक्षू ॥ ज० ॥ ३ ॥

## ३ आरती आत्मारामाची.

६२३ हृत्काशित पद्मीं तूं विलससि सर्वेशा । रविशशि लोपति तेजें अज तूं अमरेशा । सर्वांतर साक्षीत्वें निरखुनी तूर्येशा । अचला. अमला. अरुपा. अगुणा गगनेशा ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय अंतरसाक्षी । दीपवद् विश्वीं वर्तसी जीव शिव दो पक्षी ॥ ध्रु० ॥ जय० ॥ षड्विध चक्रें शोधुनि रोधुनियां चित्ता । बोधु-नियां कर्णा । त्यागुनि तनुची ममता । नवही नाद अनुभवी अनुभव त्या परतां ।

भेदुनि कोका सुख जें देहीं ये सुमता ॥ ज० ॥ २ ॥ अकार उकार मकार निमती ते तुर्या । बिंदुस्थानीं उन्मनी अनुभावि जे चर्या । अक्षरही सक्षर तूं उत्तम गुणवर्या । बहिणी म्हणतां वाणी न धरी मम धैर्या ॥ ३ जय० ॥

## ४ आरती सद्गुरूची.

—१—

६२४ सद्भावाचें आसन हृदयीं अभेद बुद्धीनें । आनंदाच्या उदकें केलें चरण क्षालन । दृश्यद्रष्टादर्शन यांचें दिधलें आचमन । निर्हेतुक मन केलें भालीं चर्चित चंदन॥ १ ॥ जयदेव जयदेव जय सद्गुरु माहेरा । आरति ओवाळीं अभयकर वरदातारा ॥ ध्रु० ॥ बोधाच्या अक्षता रंगाविल्या श्रवणें । समर्पिलीं उत्तम अष्टही भावाचीं सुमनें । अहं निरसूंया धूप जाळुनियां करणें । ज्ञानाच्या प्रकाशें बुद्धिर्दीप उजळणें ॥२॥ अनुभवाचे ताटीं वाढियला नैवेद्य । सद्गुरु जाणती भोजन सुस्वाद । सत्रावीचें तोय मध्यें पान तें शुद्ध । करोद्वर्तन तेंचि सारूनि विषय पंचविध ॥३॥ पूगीफल फोडुनियां फल-इच्छा निजत्याग । रंगलीं इंद्रियें रसनें रंगविला रंग । दक्षिणा त्वंपदीं तत्पद दोहींचा भंग । मंत्रपुष्प सोहं याचा ज्ञानीं विनियोग ॥ ४ ॥ निरांजन निर्धारें मानस साधनें सरलीं । अभेद प्रदक्षिणा तेथें वाचा निवर्तली । ऐसी या हृद्भुवनीं पूजा सद्गुरुची केली । बहिणी आनंदानें शेष सेवुनियां धाली ॥ ५ जय० ॥

—२—

६२५ सकळहि तीर्थें मज्जन करिती तव पायीं । हरिहर ब्रह्मादिक तेही ध्याती लवलाहीं । निगमागम गुण स्तवितां न कळसी शेषाही । पाहातां श्रुति उपरमल्या वर्णूं मी कांई ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय सद्गुरुराया । पंचप्राणें आरति कुरवंडिन काया । जय० ॥ ध्रु० ॥ उपमारहिता अद्वयसुखसागरभरिता । दृश्यद्रष्टादर्शन यांही तूं परता । सच्चिदानंदरूप याही तूं वरता । मोक्षादिक तव वचनें वर्तति सादरता ॥ २ ॥ निर्गुण सगुणा अगुणा असिपद ज्ञानाब्धी । तुझिया वचनें घडती अणिमादिक सिद्धी । अपांगपात स्वरूपीं राहे स्थिर बुद्धी । बहिणी अद्वयबोधें चरणद्वय वंदी ॥ ३ ॥

## ६ आरती श्रीविठ्ठलाची.

६२६ विश्वव्यापक होसी विश्वीं विश्वात्मक विरहिता । विविधाकारा धरुनी रूप तूं विधिगौरव पाळिता । विकार सांडुनी सर्वही विपरीत भावनेविरहिता । विधि

अणु मेणे महिमा काय जाणवेल प्राकृता ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय श्रीविठ्ठला । तुझिये चरणीं अद्वय हेत हा गुंफियला ॥ ध्रु० ॥ थकली बुद्धि जनांची म्हणुनी संसारीं गोविसी । तें सेचिना निज हृदयीं निश्चित गुंतती यमदूतपाशीं । ठकारलेंसें ब्रह्म सर्वही बघतां बिठ्ठलवेषीं । ठमकत गर्जत गोपी दुसरें नाहीं या उपमेसी ॥ जय० ॥ २ ॥ लक्षालक्ष निमालें अद्वय म्हणुनी हें खुंटलें । लय साही दर्शना ओंकारा अतीत केलें । लाजुनियां श्रुति फिरल्या तेथें वर्णू कवण्या बोलें । विठ्ठल विठ्ठल म्हणतां बहिणीपण वोसरलें ॥ ३ ॥

## ७ आरती तुळसीची.

६२७ वृंदावनभुवनीं तुळसीचें वन । तेथें क्रीडा करी स्वयें श्रीकृष्ण । रात्रंदिस तुळसीचें ध्यान । सत्यभामा नारी करिते पुजन ॥१॥ जयदेवी जयदेवी जय तुळसी सुंदरी । अखंड विष्णु तुज निजमस्तकीं धरी ॥ध्रु०॥ सहज सांवळा कृष्ण हा बरवा । कंठीं शोभती तुळसीच्या माळा । वृंदावनभुवनीं गोपिका सकळा । तुळसीपूजन करिती बाळा वेल्हाळा ॥२॥ कार्तिक मासीं तुळसीची भाक्ति । राधादामोदर वृंदावनीं येती । शंख चक्र गदा पद्में काढिती । लावुनि उत्तम दीप पंचारति करिती ॥ ३ ॥ उठोनियां प्रातःकाळीं करिती स्मरण । श्रीकृष्णहृदयीं तुळसीचें ध्यान । त्याची भाक्ति करी बहिणी आपण । द्यावें प्रेमभावें मज मूढा ज्ञान ॥ ४ ॥

## ८ आरती श्रीभगवद्गीतेची.

६२८ गीता गीता ऐसें वदतां पैं वाणी । विश्वंभर निजरूप तो होइल पैं प्राणी । संग्रह करिता गीताजन्मांतर खाणी । नाहीं ऐसें वदला व्यासहि निर्वाणीं ॥ १ ॥ जयदेवी जयदेवी जय भगवत्गीते । ऐसें वदतां रसने भगवद्रुपजीविते ॥ध्रु० ॥ श्रवणें गीता अथवा पाठांतर गीता । झाली तरी साची हरि विकित निजभक्ता । विवेश अर्थान्वय जरी सांगे मुखें वक्ता । तोचि हरीरूप जाणा देहचारी असतां ॥ज. २॥ जन्मांतरीं अतिदोषी गीता म्हणतां ते । तरले अगणित मेणो झाले हरिरूपी ते । गीता तारक कलियुगीं जाणती अनुभवी ते । गीता पाठक मोती हरीरूप जाणा ते ॥ जय० ॥ ३ ॥ गंगा म्हणतां गीता गंगा सरी न पावे । अवले पोहतां बुडती म्हणवुनी सरी न सामावे । गीता गीता म्हणतां मूर्खही तरती स्वभावें । म्हणवुनि गीता तारक केली हे देवें ॥ जय० ॥ ४ ॥ उदार गंभीर गीता सकलां फलदाती । माता उपमा नपवे उदार अति कीर्ती । पठणें श्रवणें सकलां एकाचि फलप्राप्ती । बहिणी अनुदिन हृदयीं ध्याते निजभाक्ति ॥ जय० ॥ ५ ॥

## ९ श्रीराम शेजारती.

६२९ हनुमंत जांबुवंत पुढें उभे राहाती । ओडूनी पाणी दोन्ही रामस्तुति

करिती । श्रीराम शेजीं पहुडले सीता मंचक सावरी । उभी ते जनकबाळा आरती घेवुनी करीं ॥ ध्रु० ॥ १ ॥ कर्पूर उजळती रत्न दीप शोभती । आणिक दीपावली सुगंधी लाविती । सुगंध बहू फार दशांग लाविला । भरत शत्रुघ्न पुढें लक्ष्मण उभा राहिला ॥ २ ॥ उधरण रंगीं आणि द्राक्ष फलें बहुता प्रकारें । रामापुढें ठेविताती सकळिक पक्कानें सारें ॥ ३ ॥ सीतादेवी दे तांबूल त्रयोदश गुणी । उपचार किती वानूं शिणली व्यासवाणी । राघवें निद्रा केली आज्ञा सकलांसी दिधली । सीतादेवी चरणीं स्थिरली । पाहुनि बहिणी आनंदली ॥ ४ ॥

## १० श्रीकृष्णाची.

६३० जयदेव जयदेव जय राजिवनेत्रा । देवकीसुत नामोचित यादवकुलगात्रा ॥ ध्रु० ॥ लौकिक वचनें वदती श्रीपति हा येउनी । द्वारें जन्मत अच्युत देखियला नयनीं । परि तो अयोनिसंभव अनुभवज्ञानी । जाणति सज्जन विरहित जन्मांतर योनी । अंबरुषिच्या गर्भालागुनि अवतारी । बळिरामचि हा झाला रोहिणिच्या उदरीं । तूं तंव योनीसंभव न होसी निर्धारीं । धन्य तव रूप महिमा गोवर्धनधारी ॥ २ ॥ अद्भुत बालक देवकी देखुनी ती वंदी । आनंदती पैं दोघे नाचति निज मंदीं । युग परिमित पैं भुजा दिसती गोविंदीं । दशअवतारातित हरि हा देखियला बंदीं ॥ ३ ॥ कर सर्वां वहिले हरि संकट जनसे ( अपूर्ण )

## ११ चंद्राची.

६३१ प्रकाश निर्मल कोमल कमलोद्भव । देखुनि रमला तेथें भ्रमराचा भाव । ऐसा प्रेमळ सीतळ तारापति देव । अनुभव सिद्धा देतो मुक्तीचा ठाव ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय रजनीकांता । दर्शनमात्रें निवाविसि भवतापव्यथा ॥ ध्रु० ॥ प्रतिमासा अंतीं द्वितिया येती जन्माची । राका येता प्रतिमा पूर्ण बिंबाची । चतुर्थीची पूजा भाविक भक्ताची । गोपाळातें छाया करिसी कृपेची ॥ जय० ॥ २ ॥ नव रत्नाहूनी रत्न शास्त्राचा विवेक । उपमे तुजसी तुळिता तुझा तूंचि एक । शिवमौळीचें भूषण लुब्ध चातक । भक्ती भजता सिद्ध साधी पद पहिला पदक ॥ ३ ॥ ( अपूर्ण )

## १२ आरती ज्ञानेश्वरीची.

६३२ जय माये ज्ञानदेवी । शब्दरत्नजान्हवी । प्राशितां तोय तुझें । सुख होतसे जीवीं ॥ १ ॥ अनर्घ्य साररत्नें सिंधु मंथुनी गीता । काढिली भूषणासी । वैराग्य-भाग्यवंता ॥ जय० ॥ २ ॥ अमृतसार ओवीं । शुद्ध सेविता जीवीं । जीवच ब्रह्म होती । अर्थ ऐकतां तेही ॥ जय०३॥ नव्हती अक्षर हे । निजनिर्गुणभूजा । बहिणी क्षेम देती अर्थ ऐकतां वोजा ॥ जय० ॥ ४ ॥

## १३ आरती सद्गुरुची.

६३३ जय सद्गुरुराया माझी निरसीं माया । ठेवितसें तव मस्तक चरणीं नश्वर सपंत्ति जाया ॥ ध्रु० ॥ नसते मीपण घेउनीयां । देहें केलें सर्वही जाया । द्रव्य पदार्थ अमित अमात्तव । अंतरले गुण गाया ॥ १ ॥ जन्मजराभय दुस्तर वारूनी । सांग, तूं मोक्ष-उपाया । पुत्रकलत्र विचित्र मनीं सुख । जाइल सर्वही वायां ॥ २ ॥ बहिणी म्हणे गुरुपदांबुज इच्छितसे वर धाया । जय सद्गुरुराया । माझी निरसीं माया ॥ ३ ॥

## १४ आरती सद्गुरुची.

६३४ जयजय सद्गुरुराया । भजला उत्तम देवराया ॥ ध्रु० ॥ बुद्धि अखंडित आत्मरुपस्थित भेद ज्यांतुनी गमाया ॥ १ ॥ शांति सदा समभाव दयानिधे । नेमक देव भजाया ॥ २ ॥ धैर्य कदापि न सोडुनियां मन । चिन्मयचरणीं जडाया ॥ ३ ॥ निश्चळ जाण विरक्तिसी भक्ती सर्व त्यागुनियां माया ॥ ४ ॥ बहिणी म्हणे मन निश्चळ होउनी । चिद्रूपीं ध्यान जडाया ॥ ५ ॥

## १५ आरती कृष्णाची.

६३५ जय जय कृष्ण कृपाला मोहनमानस दीनदयाळा ॥ ध्रु० ॥ मंजुळ वेणु सुस्वर वाजत । मोहियल्या व्रजबाला ॥ १ ॥ यमुनाजळ अति निर्मळ वाहत । तन्मय गोधनमेळा ॥ २ ॥ रविशशि मृग अहि जीवतरुतृण भूली पडे सकळांला ॥ ३ ॥ नेणती देह ध्वनी श्रवणीं नयनीं । पहाती हो हरिलीला ॥ ४ ॥ बहिणी म्हणे श्रुती नेणती हे याती । जातनती । भेद तयाला ॥ ५ ॥

## १६ आरती कृष्णाची.

६३६ जय जय परमानंदा । राजीवलोचन मुकुंदा ॥ ध्रु० ॥ रत्नखचित शिरीं मुगुट विराजित । कंठीं माला सुगंधा ॥ १ ॥ पीतवसन पीतगंधविलेपन । मानस भूलत धंदा ॥ २ ॥ चंदनचर्चित अंगविलेपन देखुनियां सुखमंदा ॥ ३ ॥ पांचही जाण आयुधें शोभती । गायन करि निजछंदा ॥ ४ ॥ बहिणी म्हणे मन तोषत देखुनि तें रूप मस्तकीं वंदा ॥ ५ ॥

## १७ आरती आत्मारामाची.

६३७ सर्वांठायीं देव एकचि अनेक । विस्तारिले नाना सुंदर कौतुक । सर्व क्षेत्रें तीर्थें अंतीं गतिदायक । भिन्न बघतां पिंडीं ब्रह्मांडीं एक । जयदेव जयदेव जय चित्सुखधामा । जय आत्मारामा । आरती ओवाळित निजहित विश्रामा ॥ध्रु०॥ हरि-

हर ब्रह्मादिक चिन्मात्रें तूंचि । अगमानिगमा सीमा न कळे गणणेची । पूर्वापूर्व आत्मारामा मूळरूप तूं हेंच । तुजविण बघतां दुसरें अन्यहि नाहींच ॥ जय० ॥२॥ तारक नाम तुझें ब्रह्म हें गाजे । अर्धचंद्र उदयो होउनि विराजे । तेणें आत्मज्योती विश्व हें साजे । तो तूं गुरु भवहारक वंदित बहिणी गर्जे ॥ जय० ॥ ३ ॥

## १८ आरत्या बहिणाबाईच्या (सं. विठ्ठल[1] कृत.)

६३८ त्वंपद तूं तत्पद तूं असिपद जगदंबे । स्थूळ तूं सूक्ष्मकारण तूं सकळारंभे । हरि तूं हर तूं ब्रह्मादिक तूं गुणस्तंभे । महत् तूं महादादिक तूं सर्वांतरगर्भे । जयदेव जयदेव जय माये तुर्ये । बहिणाबाई पंचाक्षर गुणचातुर्ये ।। ध्रु० ॥१॥ रवि शशि ताराग्रह तूं गण तूं गुणवंते । मन तूं मानस तूं जनविजनसमशांते । क्षिति तूं जल तूं नल तूं अनिलें नभवंते । सुख तूं सुखदायक तूं अद्वय एकांते ॥ज० २ ॥ शम तूं दम तूं यम तूं साधन तूं जननी । जनिता जननी गुरु तूं मज तारक तूं भजनीं । मीपण तूंपण जीवभावांतक करणी । द्वय तूं अद्वय तूं जडला 'विठ्ठल' निजचरणीं ।। ३ जय० ॥

६३९ सांगसी सकळां मृत्यु पांचा दिवसांचा । प्रायश्चित विधि सारुनि द्विज पूजिले हरि वाचा । सकळांसीं आशिर्वाद देउनि गीतेचा । स्मरणीं तत्पर होउनि अष्टादशा वाचा । जयदेव जयदेव जय बहिणाबाई । अंतीं आरति उजळुनि ठेवीं मानस तव पायीं ॥ ध्रु० ।। १ ज्ञानेश्वरिचें करिसी पारायण अंतीं । निशिदिन सावध करिशी लावुनि निजपक्षीं । नामस्मरणीं तत्पर वाचा रूपवंती । नकळे तंव रूपमहिमा जणियला संतीं । जय० ॥ २ ।। वैष्णव जयजयकारें तुलसीच्या माळा । आलें हरिहर ब्रह्मादिक मुनिवरा ऋषिमेळा । नकळे पामर जन या भगवत्पथलीला ॥ जय० ॥ ३ धन्य शत षोडशवरि द्वाविंशत काळीं । धन्य अश्विन शुद्ध प्रतिपदा बुध मेळीं । सद्गुरु भजनीं सावध राहुनि ते काळीं । देहा त्यागुनि चरणा पावसि वनमाळीं ॥ जय० ४ ॥ धन्य घटिका धन्य पळ लव तें जाणा । धन्य धन्य जन ते देखति तव निधना । धन्य प्रणितातीर्थे शिवपुर निजस्थाना । तेथें राहुनि स्थिर तूं करिसी गुरुध्याना ॥ ५ ॥ ।। जय० ।। आरत्यांची थाटें गायन जन करिती । रामस्मरणें सर्वहि आनंदें वदती नेणो स्वर्गाहुनि त्या देवांच्या पंक्ती । आल्या मज्जनवेळीं त्या प्रणितातीर्थी ।। जय०-६ ।। मृदंगवाद्य नानापरिच्या गजरानें । तुलसी बुक्का उधळुनि मिरवत मशारानें । गर्जत हरिनामाच्या श्रेणी अधरानें । प्रणितातीर्थीं मज्जन केलें मग ध्यानें । जय० ॥ ७ ।। पूर्वेसी शोभे हनुमंत सहित अश्वत्थें । पश्चिम भागीं सुस्थळ रामेश्वर

---

[1] संत:—विठ्ठल हें ह. भ. प. संत बहिणाबाईचे एकुलते एक चिरंजीव होत ! ( दासविठूकृत चरित्र पहा. )

जेथें । दक्षिण भागीं भगवति दुर्गा माता ते ।। जय० ॥८॥ ऐसें स्थळ अति उत्तम ‘ शिवपुर ’ ते स्थानीं । समाधि घेउनि बससी तूं देहावसानीं । त्रिकाळ आरती पूजन इच्छित फलदानीं । पावति तव कर वरदे सुत विठ्ठल चरणीं ।। जय० ९ ॥

## २० आरती-बहिणाबाईची ! ( संत ‘ निळोबाकृत )

६४० स्त्री वेश अग्रवर्णी । बाळदशा क्रमियेली । जालीया पाणिग्रहण । पतिव्रता आचरणीं । जय माय बहिणाबाई । मूळ ब्रह्मरूपिणी । आरती वोवाळीन । भक्तिप्रेम अंतरीं । जय० ॥ १ ॥ संचित पूर्वपुण्य । तुकारामदर्शन । मस्तकीं ठेवुनि कर । सांगे भक्ति निर्विकार । जय० ॥ २॥ प्रसाद लक्ष चौपन । यज्ञपूर्ति करि पूर्ण । वर्षवी अमृत वाणी । करि त्रैलोक्य पावन ॥ जय० ॥३॥ अखंड देहीं स्मरण । निजवृत्ति निमग्न । चरणीं निळा जाण । आला भावें शरण ॥ जय० ४ ॥

---

## ४६ श्लोक.



६४१ पुजोनी गणेशा बहूधा विधीनें । प्रवर्तला सृष्टि कर्माविधीनें । यालागिंमी वंदिं श्रीमोरयासी । छेदीन मी मीपणसंशयासी ॥ १ ॥

६४२ वंदोनियां जाण सरस्वतीला । देईल ते सिद्धि महामतीला । तेणें गुणें वर्णिन देवराया । बुद्धीसि जो बोधक दे. वरा या ॥ २ ॥

६४३ या नंतरीं सद्गुरुराज वंदूं । जो हा स्वबोधें निजज्ञानसिंधू । पूजीन मी मानस पूजनातें । त्रैलोक्यची अर्थ करो मनातें ॥ ३

६४४ या नंतरें संत महंत साधू । साजोनियां वर्तति जे विषादू । तया नमो अद्वय निश्चयानें । ज्याच्या वरें जोडति मोक्षयानें ॥ ४

६४५ आतां नमो जाण कुलांबिकेला । जीच्या वरें सन्मतिला भुकेला । अखंड हें हृद्गत होय मातें । वंदोनियां श्रीकुलअंबिकेतें ॥ ५ ॥

६४६ आतां नमो सज्जन श्रोतयांसी । ऐसा तुम्ही सावध मी जयासी । पावेन मी तें तुम्हांसमानें । यालागिं मी प्रार्थितसें क्रमानें ॥ ६ ॥

६४७ डोलेल जैं मस्तक श्रोतयाचा । पावेन तैं भाव महाजनाचा । बहीणी म्हणे प्रार्थित याचिलागीं । अखंडता ध्यावुनियां प्रसंगीं ॥ ७ ॥

६४८ नमो लक्ष लक्ष्यातिता वेदवेद्या । नमो ध्येयध्यानातिता नित्यानित्या । नमो सर्वसाक्षी नमो सर्वकुक्षी । नमो बहिणि गंगाधरा मोक्षपक्षी ॥ ८ ॥

६४९ नमो भेदभेदातिता वेदगर्भे । नमो अंबिके अंब माते स्वयंभे । नमो व्यंजने शांतिरूपे अमूपे । नमो बहिणि गंगाधरा शांतिरूपे ॥ ९ ॥

६५० ( आर्या ) बहिणीनें अवलंबुनि श्रीरामस्मरण मानसीं धरिलें । गंगाधर वंशींच्या एकोत्तरशत कुळासि उद्धरिलें ॥ १० ॥

६५१ वांयां कां भ्रमसी उपास करिसी कंदामुळां सेविशी । भस्मा उद्धरिसी कपाटिं रिघसी पंचाग्नि पैं साधिसी ॥ भूमीसी निजसी वनीं विहरसी मिथ्या तनू आटिसी । आत्मा नोळखिसी म्हणे बहिणि रे मोक्षासि कैं पावसी ॥ ११ ॥

६५२ गुरुकृपा जरि पूर्ण असे जया । श्रवण हें श्रुतिशास्त्रकथा तया । हरिहरादिक किंकर दास हे । म्हणतसे बहिणी कुतुकेंचि हें ॥ १२ ॥

६५३ असे सद्गुरू ते मना ओळखावे । अशांचें बरें दास्य भावें करावें । जयें ज्ञान तत्त्वार्थ साधे स्वभावें । बहीणी म्हणे सद्गुरूसी भजावें ॥ १३ ॥

६५४ गुरू जो खरा तो बरा ज्ञाननिष्ठ । स्वधर्मे क्रिया पाळि जो वेदनिष्ठ । जया ज्ञान तत्त्वार्थ शुद्ध प्रकाशें । बहीणी म्हणे ज्या ब्रह्म सर्वत्र भासे ॥ १४ ॥

६५५ गुरुगुरू करिताति कलीवरें । विषयसंभरणा बहु आस रे । उकिरडा फिरती जशि सूकरें । म्हणतसे बहिणी तिमिरा भरें ॥ १५ ॥

६५६ जयें ज्ञानवैराग्य भक्ती ठसावे । क्षमा शांति देहीं दया हे विसावे । दिसे ब्रह्मचर्य स्वांगासि यावें । म्हणे सद्गुरू तो बहीणी स्वभावें ॥ १६ ॥

६५७ निजगुरु निजदाता भेटतां कोण चिंता । भवतमशमकर्ता शोकसंतापहर्ता । त्रिभुवनिं सुखदानी भक्त दासाभिमानी । बहिणि म्हणतसे तो रामतूका निदानीं ॥ १७ ॥

६५८ सांडा सांडा विसंडा रजतम भजनें भेद पाखांड सांडा । भंडा भंडा विभंडा अति कुटिळ जगीं वासना हे विभंडा । दंडा दंडा उदंडा अतिचपळ मना वृत्ति एकाग्र मांडा । देवा दंडा उदंडा शरण म्हणत जा बहिणि संसार खंडा ॥१८॥

६५९ गृहस्थाश्रमीं तूं सुखें नांद बा रे । स्वरूपास्थितीसी बरें पाहिं पा रे ॥ असें ज्ञानवैराग्य तें आंदणीं रे । तें वर्म बहिणीप्रति फावलें रे ॥१९॥

६६० शेषाचे शिखरीं विराट नगरी नांदे मही सुंदरी । तद्गर्भी मकरी सुधामृत झरी चंद्रावती दूसरी । तीच्या पैलतिरीं विटेवर करी ब्रह्मांडसंस्था हरी । ऐसी पुण्यपुरी नसेल दुसरी ती पंढरी भूवरी ॥ २० ॥

६६१ श्रुतिपथ पडलें हो पाहसी सर्व काळीं । विविध भजन मार्गी कासया देह जाळी । गुरुपदभजनाचा हेत हा हो जयासी । म्हणत बहिणि नेत्रीं देखसी आत्मयासी ॥ २१ ॥

६६२ सकळ विषय जैसे वाटती वीष तैसे । परधनपरदारात्याग त्यांचा विशेषें । श्रवणमनन साधुसंगतीं नित्य कीजे । म्हणत बहिणि येणें आत्मयासी वरीजे ॥ २२ ॥

६६३ वेदार्थ हा पाहुनि वर्तती जे । वर्णाश्रमीं आश्रम त्यांसि साजे । मोक्षासि हा कारण प्राणियासी । बहीणी म्हणे वेद मना उपासीं ॥ २३ ॥

६६४ वेदाचा अर्थ घेई तदुपरि दुसरें त्याच मार्गप्रवाहीं । जाणे वस्तूसि देहीं निरखुनि धरणी हिंड तूं सर्व पाहीं । भावार्थे नाम गाई गुरुपद हृदयीं सर्वदा त्यासि ध्याई । नाहीं तें वस्तुठायीं बहिणि म्हणतसे पौरुषें तेथ जाई ॥ २४ ॥

६६५ रविमि उदय होतां वर्तती लोक कर्मे । करिति सकळ लोकीं पुण्यपापें कुकर्मे । न लगति परि सूर्या जाण कर्मे तयांचीं । म्हणत बहिणि तैसी रीति या आत्मयाची ॥ २५ ॥

६६६ (शा. वि. वृ.) या रे पंढरिसारखें क्षितिवरी आणीक सांगा दुजें । मुक्तीमोक्षमुमुक्षुतीर्थगण हें संसृत्य ज्याचें निजे । वाजे सार सदा कसा यम शिरीं आनंद वाटे जनां । ऐसें क्षेत्र तपोबळी अकल हें ये ना कदा वर्णना ॥ २६॥

६६७ अशी चंद्रभागा अशी भीमगंगा । असा गरुड उभा पुढें पांडुरंगा । विटीं नीट ऐसा उभा देवराणा । दुजें क्षेत्र ऐसें जगीं मान्य जाणा ॥ २७ ॥

६६८ असा पुंडलीक असा वाळवंट । असें पद्मतीर्थ महामुक्तिपंथ । सदा गर्जना नाचती प्रेमछंदें । बहीणी वदे देव कोटी विनोदें ॥ २८ ॥

६६९ काळासी दपटी भवासि निवटी मृत्यूसि धाकें पिटी । शत्रूच्या कपटी अघासि तगटी जन्मासि पाडी तुटी । टेला पैल तटीं पहा कर कटीं कांती दिसे गोमटी । बहिणीचा किरिटी स्मरा हृदघटीं तारील तो संकटीं ॥ २९ ॥

६७० कली पापरूपी कळोनी हरीसी । म्हणोनी धरी वास या पंढरीसी । अनाथें दिनें पापभारें बुडालीं । तयांकारणें मुर्ति निर्माण झाली ॥ ३० ॥

६७१ निराकार हें रूप साकारलेंसें । पहा कोंदणीं रत्न जैसें प्रकाशे । कशी दिव्य शोभा रवीकोटि भासे । दिशा व्यापुनी अंबरीं कोंदलासे ॥ ३१ ॥

६७२ उभा नीट वीटीं तटीं चंद्रभागा । कटीं हात ठेवूनियां दिव्य भागा । पहा पुंडलीकीं कशी एक दृष्टी । असा देखतां ही सुखी होय सृष्टी ॥ ३२ ॥

६७३ गुणातीत हें रूप ज्याचें विराजे । असे पंढरीं आजि तें रूप साजे । विठो नाम हें धाम वैकुंठवासी । बहीणीसखा अंतरात्मानिवासी ॥ ३३ ॥

६७४ कळेना कसा कोण हा वेषधारी । गमेना मना वर्णितां वेद चारी । पहातां जया नेत्र तटस्थ होती । प्रभा दिव्य ऐसी असे कोण मूर्ती ॥ ३४ ॥

६७५ न हाले न चाले न बोले न पाहे । नेघे नेदी उभा तिष्ठताहे । दिसे योगमुद्रा महा दिव्यराशी । मना नेणवें भ्रांति वाटे मनासी ॥ ३५ ॥

६७६ लिलाविग्रही रूप हें जाणवेना । मना आणिकां सर्वथा चोजवेना । असें रूप हें वेगळें कोण आहे । सखे सांग गे कोण आतां उपायें ॥ ३६ ॥

६७७ रुपाची मना लागली खंति भारी । असा कोण आहे कुशंका निवारीं । करूं काय आतां जिवा राहवेना । पुसावें जनां तत्त्व तें सांगवेना ॥ ३७ ॥

६७८ उभा नीट वीटीं कटीं हात दोन्ही । हिरे साजती कुंडलें दोंहि कर्णीं । समे पाहिलें दृष्टि पैं नाशिकाग्रीं । असा ना दिसे पाहतां वेदशास्त्रीं ॥ ३८ ॥

६७९ गुणातीत क्रीया विराजे शरीरीं । करोनी अकर्तेपणाची उभारीं । दिसे ज्ञानवैराग्यभक्तीसमेत । मनीं बैसला सांडिना त्यासि चित्त ॥ ३९ ॥

६८० सूर्याचें निज तेज सार श्रुतिचें जें गुढ या सृष्टिचें । ज्ञानी पंडित मानभाव तपसी तत्त्वार्थ त्या जीविंचे । ब्रह्मा शंकर आदि ध्यान करिती सारैक या राशिचें । ती ही मूर्ति भिमातिरीं प्रगटली जें बीज वेदांतिचें ॥ ४० ॥

६८१ निरखित कशि बाला दृष्टि लावोनि भाला । उलटुनि नयनातें लक्षि त्या विश्वपाला । वदनिं स्तवित वाचा मौन आलें श्रुतीला । अनुपम बहिणीसी लाधला सौख्यगोळा ॥ ४१ ॥

६८२ गुरूनें मुजे ग्यानप्याला पिलाया । हुवा मस्त बंदा उन्याकू जलाया । किया एकतारा दिनानाथ जीसूं । रहे खेलता दील राजी उसीसूं ॥ ४२ ॥

६८३ ज्याचा कंठ निळा त्रिपुंड्र पिंवळा रुंडादि माळा गळां । भस्माचा उधळा कडोसि अचला व्याघ्रांबरीं मेखळा । बाले हा ढवळा शिरीं शशिकळा माथां जटा सोज्वळा । बहिणी त्या अचला स्मरे अवलिला ब्रह्मांड ज्याची कळा ॥ ४३ ॥

६८४ त्रिशुळडमरुधारी भूतप्रेतासि वारी । अरिकुलदल मारी विश्वलोकांसि तारी । भवतम परिहारी शंभु हा योगधारी । अभिनव निजज्ञानें बहिणिचा अंगिकारी ॥ ४४ ॥

६८५ शिव शिव शिव काशी नाम हें पापनाशी । हृदयकमलकोशीं सांठवा रे प्रितीसी । अळस दुरि करा रे शिव ऐसें म्हणावें । अभिनव सुख त्यांतें शेष बहिणीस द्यावें ॥ ४५ ॥

६८६ मुक्तीची नगरी नसेल दुसरी या ऐसि पृथ्वीवरी । सेवायासि बरी अपाय न करी काशीच पावे सरी । पावे सर्व हरी पतीत उतरी रक्षोनि नानापरी । अंतीं मुक्त करी म्हणोनि बहिणी सेवा म्हणे पंढरी ॥ ४६ ॥

६८७ सांगा कां सोमयागादि मख करितसां व्यर्थ जातां प्रयागा। ब्रह्मारी तेचि गंगा अधिक कलियुगीं आजि ही चंद्रभागा। येथें येतां न भागा त्वरितहर अगा तर्थि आलें उपेगा। वंदाया पांडुरंगा म्हणतहि बहिणी मुक्तिभोगार्थ मागा ॥ ४७ ॥

६८८ परब्रह्म हें लक्षितां लक्षवेना। स्वसंवेद्य हें शास्त्र श्रुती साहवेना। कईं काय हो अर्थ कैसेनि साधे। बहीणी म्हणे भाव हा त्यासि बाधे ॥ ४८ ॥

६८९ मौन्येंचि जाण स्तवितां तयासी। मसोनियां सन्निध सिद्ध पासीं। दावील मंत्रेंच न रूप डोळां। बहीणी म्हणे येथिला हाचि भोळा ॥ ४९ ॥

## पद

६९० भाव शुद्ध रे शुद्ध बरवा धरावा। ब्रह्मनिष्ठ रे निष्ठ गुरु तो करावा। मायामळ रे मळ सांडोनि द्यावा। स्वस्वरूपिं रे स्वरूपिं रे व्यास असों खावा॥५०

६९१ ऐक ऐक रे तूं मना माझिया जीवना। चुकवीं चुकवीं रे या जन्मीं चौऱ्या-यसी यातना। ऊर्ध्व ऊर्ध्व हा सौर सूसारी भव वेदना। म्हणुनि करितसें जोडुनी कर दोन्ही प्रार्थना ॥

६९२ संतसंग रे संग रे निःसंग असावा। अंतरंग रे रंग रे प्रेमा तो धरावा शांति क्षमेसी क्षमेसी ठाव देहीं रहावा। विवेक विचार विचार या मनाकीं करावा ॥

६९३ स्थूळ धरावें धरावें क्षेत्रकीं क्षेत्रज्ञ। भावें भजावें भजावें सगुण कीं निर्गुण। निष्टें रहावें रहावें एकीं अनेकपण। डोळां पहावें पहावें ब्रह्म परिपूर्ण ॥

६९४ ग्रंथ पहाव पहावे गीता कीं भागवत। मार्ग धरावे कर्मब्रह्मनिष्ठायुक्त। मनें सांडावा सांडावा जाणिवेचा तंत। बहिणी म्हणे रे म्हणे रे बरवा ऐसा संत संग ॥ ५४ ॥

६९५ पहा किरीट झकमके जसि विद्युल्लता गगनीं चमके। दिसतसे चिमणी रमणी कसि चालत हंसगती उभि ठाके। मोहित नेत्र हे आस्य वक्र विचित्र चरित्र अगम्य जियेचें। विठ्ठलीं लाघव लावुनियां प्रीति बोलत बहिणी सुख मनिचें ॥ ५५ ॥

## ४७ प्रार्थना.

६९६ ऊठ सत्वर विठ्ठला। भेट देईं रे आम्हांला। वाट पाहाती सकळा। सखिया तटस्थ नयनीं ॥१॥ वाटसी नयनीं पाहावा। जन्मोजन्मीं विठ्ठल व्हावा। म्हणोनी वाट पाहाती भावा। भेटी दे रे विठ्ठला ॥ २ ॥ नयना आस थोर आहे। कैं भेटेल विठ्ठल माये। काया बहु इच्छित पाहें। क्षेम दे रे झडकरीं ॥३॥ हात ठेवोनियां कटीं।

हें हा देखेन विठ्ठल दिठीं । डोळे भरी जगजेठी । हृदयपेटीं सांठवीन । विठ्ठल जपतां मानसीं ॥ ——( अपूर्ण )

## ४८ शेवटचें मागणें.

६९७ त्रिकाळ आरती करूं देवाधिदेवा । गाऊं नाचूं करूं कथा नित्य केशवा ॥ १ ॥ दिनरातीं छंद लागो हाचि मानसीं । रामा रामा कृष्णा गाऊं गीतेसी ॥२॥ सारासार विचार करूं नित्य विवेक । तत्त्वमसी गुरुमुख पाहूं सकळीक ॥३॥ संतसंग करूं आम्ही भावार्थबळें । बहिणी म्हणे येणें तुटती जन्ममरणमुळें ॥ ४ ॥

---

# परिशिष्ट 'अ'



## करुणापर ! ( देवाशीं भांडण )

६९८ कोणें तुम्हीं संबोधिलें । काय पुरलें त्याचें केलें ॥ १ ॥ म्हणितलें तुजला देवा । कृपासिंधू कृपार्णवा ॥ २ ॥ काय केली कृपा तुम्ही । सांगा क्षणीं उच्चारोनी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे कळला कावा । तुझा देवा आम्हातें ॥ ४ ॥

६९९ कैसा झाला कृपावंत । भक्त-अंत पाहोनी ॥१॥ काय केली कृपा फुकी । सांगा एकीं कोणावरी ॥ २ ॥ न देसी वोतिल्याविना । कैसी करुणा ऐसी तरी ॥३॥ बहिणी म्हणे वृथा देवा । करुणार्णव झालासी ॥ ४ ॥

७०० कोणें दिला उदारपणा । नारायणा तुजलागीं ॥१॥ कृपणा तुम्ही तूं कृपण । कृपण पूर्ण करणीचा ॥ २ ॥ काय दिधलें भक्तालागीं । सांगा वेगीं भगवंता ॥३॥ बहिणी म्हणे भक्तआर्त । नाहीं पूर्त केलें तुवां ॥ ४ ॥

७०१ तुज ऐसा देव लुब्धा । नाहीं सच्चा पाहियेला ॥१॥ निवृत्ति ज्ञानदेवा । बहुत तुवां शिणविलें ॥ २ ॥ गोऱ्या कुंभाराचे हात । तोडिसी भगवंत करणी ऐसी ॥ ३ ॥ भोळा भक्त चोखा-मेळा । पाहासी सुळा देऊं तया ॥ ४ ॥ बहिणी म्हणे ऐसी करणी । चक्रपाणी उदारांची ॥ ५ ॥

७०२ म्हणती तुला दयाघना । दयाघना परि कोरडी ॥१॥ हरिश्चंद्र तारामती । केली माती संसाराची ॥ २ ॥ गोपीचंद राजा भोळा । वोस केला गांव त्याचा ॥ ३ ॥ एकनिष्ठ भक्त बळी । तुवां घातिला पाताळीं ॥ ४ ॥ बहिणी म्हणे बरें केलें । नाहीं आलें अनुभवा ॥ ५ ॥

७०३ काय दिलें यांचा ऐसें । कोणा कैसें कळेना ॥१॥ संत थोर तुकारामा । घेतां नामा छळिलें तुवां ॥ २ ॥ ऐसी कैसी तुझी थोरी । न पुरे बोरी भिल्लीची ॥ ३ ॥ कैसा तुझा बडिवार । ध्रुवा केलें निराधार ॥ ४ ॥ बहिणी म्हणे येऊं जाणें । देऊं जाणें नेणसि तूं ॥ ५ ॥

७०४ तुज ऐसा नाहीं देखिला उदार । श्रुतिशास्त्रीं फार वर्णियेला ॥ १ ॥ तोचि कां हा देव विटेवरी उभा । चैतन्याचा गाभा पूर्ण दिसे ॥ २ ॥ मिटोनी लोचन कर कटेवरी । दृष्टि हितावरी ठेवोनियां ॥ ३ ॥ बहिणी म्हणे देवा ओळखीलें पूर्ण । अंतरींचा वर्ण हाचि असे ॥ ४ ॥

७०५ आलासी कोठोनी अरे मुशाफरा । कोणीं तुज थारा दिला येथें ॥ १ ॥ चावोनी चपाट केले भक्त भोळे । अव्यक्त ठेविलें निजप्रेम॥२॥मोठें घर परी पोकळचि वांसा । तैसी हृषिकेशा करणी तुझी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे लुच्चा धरिला वैकुंठींचा । आतां कैशी वाचा बंद झाली ॥ ४ ॥

७०६ धरिला भोरपियाचा वेश । माया लेशभर नाहीं ॥ १ ॥ त्यागिलेंही लक्ष्मिसी । परी म्हणवीसी कृपावंत ॥ २ ॥ म्हणविशी कृपाघन । अंगीं अभिमान दाटला ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सोडा देवा । घ्यावी सेवा भावशुद्ध ॥ ४ ॥

७०७ कोठें गुंतलासी कोठें लपालासी । कपटकृती ऐसी तुझी देवा ॥ १ ॥ काय शेषशेजें सुख-निद्रा घेसी । अथवा खेळसी रास-क्रिडा ॥ २ ॥ काय गोपाळांच्या मेळीं विहरसी । वेणू वाजविसी वृंदावनीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तुझ्या बापाचें गांठाडें । वेंचे का रोकडें भेटी देतां ॥ ४ ॥

७०८ सांडियली लाज लौकिक व्यवहार । नाहीं लेशभर तुज देवा ॥ १ ॥ तुला देवपणा आला कोण काजा । बरें केशिराजा बोल आतां ॥ २ ॥ नाहीं चाड तुला संत सज्जनाची । थोरवी कुकार्चा मिरवीशी ॥ ३ ॥ बडिवार कोण येणें तुझा वाणीं । पडतील वाणीं अभक्तांच्या ॥ ४ ॥ बहिणी म्हणे उगं केलें आम्हां वेडे । आपुले पोंवाडे गांवयातें ॥ ५ ॥

७०९ गणिकेच्या काय देखिलें अधिकारा । निजपायीं थारा दिला तिशी ॥१॥ जन्मजन्मांतरींचा अजामेळ पापी । तयासी स्वरूपीं मेळवीलें ॥ २ ॥ चांडाळ घातकी वाल्ह्या कोळी चोरा । यशाचा डांगोरा केला त्याच्या ॥ ३ ॥ गजेंद्रें आक्रांतीं काय केला धांवा । तेथें तूं केशवा धांवलासी ॥ ४ ॥ बहिणी म्हणे तुझ्या जरी आलें मना । पहासी न गुणा तया दोषा ॥ ५ ॥

७१० तुज ऐसा देव नाहीं तिन्ही सृष्टीं । तेहतीस कोटी देवांमाजीं ॥ १ ॥ भोळ्या भाविकांसी दिससी भावीक । जैसा योगी बक जळामाजीं ॥ २ ॥ काय थोरपण जगा नागवण । काय हें भूषण तुज साजे ॥ ३ ॥ तुझें थोरपण तुजलाचि

माजे । येरीं अनवुजे होय देवा ॥ ४ ॥ बहिणी म्हणे बोंब तुझ्या करणीची । वृथा भूषणाची मनीं कांक्षा ॥ ५ ॥

७११ अनंत नयनें म्हणताती तुला । आतां का आंधळा जाहलासी ॥ १ ॥ काय माझे हाल न दिसे तव डोळां । होसी का आंधळा देखोनीयां ॥ २ ॥ द्रौपदीची लज्जा जातां देखोनीयां । वस्त्रें नेसवाया धांवलासी ॥ ३ ॥ तुकारामवह्या बुडतां जों देखसी । जलीं ठाकलासी देखोनीयां ॥ ४ ॥ बहिणी म्हणे तेव्हां डोळस होतासी । आतां सहस्राक्षी दिसेना का ॥ ५ ॥

७१२ तुज असतां अनंत कर्णे । नये गाऱ्हाणें कानीं कैसें ॥ १ ॥ काय झाला परिसूनी बधीर । द्रौपदीचा आर्तस्वर ॥ २ ॥ गजेंद्रधांवा ऐकूं आला । बहिरे झाला काय आजी ॥ ३ ॥ कान्होपात्रेची विनवणी । कैसी कानीं पडीयेली ॥ ४ ॥ बहिणी म्हण घेतां सोंग । निद्राभंग नोहे कधीं ॥ ५ ॥

७१३ कसीं घातीयली उडी । हाक ऐकुनि स्तंभ फोडी ॥ १ ॥ हाक फोडोनी सैराट । दुष्टपोट विदारिलें ॥ २ ॥ कैसी करुणा आली तेव्हां । नये देवा कांहो आतां ॥ ३ ॥ काय वाटे जडभारी । तुम्हां हरी भेटावया ॥ ४ ॥ बहिणी म्हणे वनमाळी । करीं न रळी भेटीसाठीं ॥ ५ ॥

७१४ थोरली हे तुझी सखी मेहुणी ती । असोनि लक्ष्मपती दरिद्री कां ॥१॥ शंख मेहुणा तो अक्षयीं कोरडा । भूषण तव गाढा काय काज ॥ २ ॥ राजाचे सोयीरे भीक मागताती । लज्जा कोणांप्रती सांग त्यांची ॥ ३ ॥ बहिणी म्हणे कांहीं असो नसो स्वतां । परी परचिंता थोर तोचि ॥ ४ ॥

७१५ तयासीच आम्ही म्हणो थोर जाणा । जयासी करुणा पराविया ॥ १ ॥ छत्रपती राजा स्वयें म्हणवितो । सोयरा मागतो भीक त्याचा ॥ २ ॥ जाळावें तें काय त्याचें थोरपण । कृपणासमान कृती ज्याची ॥ ३ ॥ बाईल उघडी फिरतसे घरीं । भूषण बाहेरीं काय त्याचें ॥ ४ ॥ बहिणी म्हणे कुक्का म्हणविसी उदार । परी अनुदार वृत्ति तुझी ॥ ५ ॥

७१६ मागणीचें माझ्या तुज कां सांकडें । पडलें येवढें सांग देवा ॥ १ ॥ मागीतलें तरी कायसें अघोर । म्हणोनीया थोर चिंता तुज ॥२॥ भेटी देतां भीती तुज काय वाटे । तेणें भयें कोठें लपालासी ॥३॥ बहिणी म्हणे भ्याडा अगा पुरुषोत्तमा । काय ही उपमा तुज साजे ॥ ४ ॥

७१७ काय वेंचे सांग भेटी देतां तुझें । म्हणोनीया ओझें तुज वाटे ॥ १ ॥ काय तुझें रूप नेईन चोरोनी । भयें चक्रपाणि लपालासी ॥ २ ॥ काय तुज सोटा येईल बोलतां । अगा दीनानाथा पांडुरंगा ॥ ३ ॥ काय काज आम्हां तुझीये

वैभवा । आस ही केशवा भेटीची गा ॥ ४ ॥ बहिणी म्हणे आम्हां नलगे तुझें कांहीं । भेटीवीण पाहीं दीनबंधो ॥ ५ ॥

७१८ कोणें संबोधीलें तुम्हां । पतीतपावन नारायणा ॥१॥ पावनास्तव आलें येथ ॥ न करसी सत्य जातें घरीं ॥२॥ कोणें बांधिला सादर । पायीं ब्रीदाचा तोडर ॥ ३ ॥ तुज ऐसा त्रिभुवनीं । कृपण नाहीं चक्रपाणी ॥ ४ ॥ बहिणी म्हणे खळां केला । बोध कोणा कामा आला ॥ ५ ॥

७१९ तुज ऐसें करणें होतें । तरि कां मातें जन्म दिला ॥ १ ॥ तुझ्या भेटीची मज आस । होती निरास केलें कां वा ? ॥ २ ॥ काय म्हूण आडलासी । दयावंता हृषिकेशी ॥ ३ ॥ देई चरणसेवा नुपेक्षीं । सर्वसाक्षी नारायणा ॥ ४ ॥ बहिणी म्हणे जन्म व्यर्थ । पंढरीनाथ न भेटतां ॥ ५ ॥

७२० ऐसें वाटे जाळों काया । कोण उपायां देव भेटे ॥ १ ॥ गृहा सोडुनी जावूं वना । मंदराणा पहावया ॥ २ ॥ करूं काय न धरवे धीर । शारङ्गधर भेटे न हा ॥ ३ ॥ लागे आयुष्या ओहोटी । जगजेठी भेटसी कें ॥ ४ ॥ बहिणी म्हणे कांहीं मनीं । गुप्त कानीं सांगा देवा ॥ ५ ॥

७२१ काय करूं आटाआटी । भेटीसाठीं तुझे देवा ॥ १ ॥ बैसलासी कोणे देशीं । सांगा मशीं येई तेथें ॥ २ ॥ करूं कठिण यत्न सोपा । जेणें कृपा करिसी तूं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे खंती । वाटे चित्तीं निर्दय झाला ॥ ४

७२२ वास तुझा कोठें नाहीं । विश्वीं कांहीं ऐसें नसे ॥ १ ॥ बोलूं गेलें साधु संत । सर्वा आंत असशी तूं ॥ २ ॥ भाव ऐसा धरूनियां । शरण पायां आलें असें ॥ ३ ॥ दासीलागीं भेटूं कैसा । विचार ऐसा करूं नका ॥ ४ ॥ बहिणी म्हणे तुझे पायां । जीव काया कुरवंडीन ॥ ५ ॥

७२३ काय तुज वाटे मज भेटी देतां । कोण भय चिंता सांग उपजे ॥ १ ॥ काय तुझे स्वरूपा पडे माझी दृष्टी । लपसी जगजेठी तया भेणें ॥ २ ॥ तुझीया गोंवळ्या करंट्या कपाळा । सांग माझा डोळा केविं लागे ॥ ३ ॥ काळ्या काजळाच्या काळाही सरता । पांढऱ्या परिसा दृष्टि कैंहो ॥ ४ ॥ बहिणी म्हणे नको प्रसंग निर्वाणी । बऱ्या बोलां क्षणीं भेटी देई ॥ ५ ॥

७२४ रत्नजडित तव कौस्तुभ । नलगे लाभ मज त्याचा ॥ १ ॥ नलगे तुझी वैजयंती । भेटी चिंती चित्त तुझी ॥ २ ॥ नलगे माणीक मुक्तामाळा । भेटी डोळां तुझी पुरे ॥ ३ ॥ नलगे मुगुट हार कंठी । सुख वैकुंठींचें नको ॥४॥ बहिणी म्हणे कृपावंता । आस चित्ता भेटीची ॥ ५ ॥

७२५ नलगे तुझी चंदन-उटी । व्हावी भेटी एकी हेळां ॥ १ ॥ नलगे वंशी

---

१ क्षण.

रंची शेला । तुझे बोला इच्छिलसें ॥ २ ॥ नलगे तुझे शंख चक्र । छत्र चामर नको तुझे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे सौख्य गाढें । भेटीपुढें तुच्छ तुझ्या ॥ ४ ॥

७२६ सुखें घाली तूं वैजयंती । मज खंती नसे त्याची ॥ १ ॥ माणिक मोती घाली गळां । तुळसीमाळा पुरे आम्हां ॥ २ ॥ केशरकस्तुरीचा तुला टिळा । आम्हां भाळा नाम मुद्रा ॥ ३ ॥ थोर आयुधें तुझे हातीं । आम्हां हातीं टाळ दिंडी ॥ ४ ॥ बहिणी म्हणे पूर्ण आम्हां । सौख्यप्रेमा वाढतसे ॥ ५ ॥

७२७ शिरापुरी तूं खा लाडू । भेटी गोडू आम्हांसी ॥ १॥ नलगे कांहीं तुमचें आन । भेटीवीण विठो एका ॥ २ ॥ पुरवा भेटीची गा आस । दुजें तुम्हांस न मागें कांहीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे लवलाहें । भेटी द्या हे दासीसी ॥ ४ ॥

७२८ भेटी देतां मज समाधान होये । तुझें काय जाये तयामाजीं ॥ १ ॥ देखवे न कां तुज माझें समाधान । न देसी म्हणोन भेटी मज ॥ २ ॥ भेटीची ही आस नये पुरवितां । ऐसा कैसा दाता विठ्ठला तूं ॥ ३ ॥ रीति उदाराची ऐसीच का असे । कल्याण जगाचें देखवेना ॥ ४ ॥ बहिणी म्हणे तोंड कृपणाचे पुढें वेंगाडितां कांहीं पुरे काय ॥ ५ ॥

७२९ पुंड्यालागीं कैसा आलासी धांवोनी । काय भक्ति पाहुनी भुललासी ॥ १ ॥ काय केली ऐसी तयें थोर भक्ती । माउली श्रीपती तुम्हालागीं ॥ २ ॥ ब्रह्मरूप तया दाखविलें डोळां । ऐसा काय भोळा होतां पुंड्या ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तुझ्या पाहोन ब्रह्मरूपा । विटेवरी देखा उभें केलें ॥ ४ ॥

७३० केली संसाराची माती । भेटीसाठीं तुझ्या देवा ॥ १ ॥ हिंडलगें रानीं वनीं । नये ध्यानीं हें का तुझे ॥ २ ॥ तव रूपीं लागली गोडी । भाव-जोडी मेक विकी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे झालें वेडे । माझें कोडें पुरवीं गा ॥ ४ ॥

७३१ तुझें यश गातां शेष स्तब्ध झाला । परी नाहीं कळला पार तया ॥१॥ तेथें माझा पाड काय वर्णीं गुण । अवघाचि शीण होईल पैं ॥ २ ॥ इंद्रादि सुर-गण वंदिती जयाला । तो हरी सांपडला पुंडलीका ॥ ३ ॥ बहिणी म्हणे रूप तें देखालिया डोळां । धाक कळिकाळादिकां पडे ॥ ४ ॥

७३२ अजुनी कां नये तुमचीय ध्यानीं । किती विनवणी करूं देवा ॥ १ ॥ कृपाळूपणाची मेळविली ख्याती । म्हणोन कां श्रीपती कंटाळला ॥ २ ॥ भक्त झाले फार आला कां कंटाळा । द्रौपदीवेल्हाळा सांगा तरी ॥ ३ ॥ बहिणी म्हणे कीर्ति आयकीयेली कानीं । चालत चरणीं आलें येथें ॥ ४ ॥

७३३ गोपगोपींसंगें खेळलासी भारी । थकलासी हरी काय आतां ॥ १ ॥ स्वर्गीय देवाशीं केलें कां भांडण । पुंडलीकालागून आला येथें ॥ २ ॥ काय असें

याचें वर्म सांगा आम्हां । वारंवार तुम्हां विनवीतसें ।।३।। बहिणी म्हणे जरी सत्य ना सांगाल । तरी मग बोल तुम्हांवरी ॥ ४ ॥

७३४ तुमचे गुण गातां नावडती तुम्हां । काय ठावें आम्हां ऐसें आहे ॥ १ ॥ गोडी स्वरूपाची लागलीसे फार । वरी प्रेमभर पडीयेला ।। २ ॥ म्हणोनी जाहालें मन आजी वेडें । तुम्हांसी सांकडें घातीयेलें ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तरी न करा उपेक्षा । पुरवा अपेक्षा भेटीची गा ।। ४ ।।

७३५ मूर्खपणें तुम्हां छाळियेलें भारी । तरि तूं श्रीहरी माय माझी ॥ १ ॥ लेंकुरें बोलीलें काय त्याचा खेद । जननी आल्हाद मानी त्याचा ॥ २ ॥ अपराधाची क्षमा मागतां मातेसी । प्रेम पान्हा तिजसी काय नुपजे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे ऐसी गोठी नायकीली । विठाई माउली तैसी मज तूं ॥ ४ ॥

७३६ कल्पतरूखालीं बैसला भुकेला । तरी नाहीं धाला काय ऐसें ॥ १ ॥ सांपडला किंवा परीस जयाला । दारिद्र्याची त्याला पीडा उरे ॥ २ ॥ वरीं कामधेनु असतांही बाधी । पोटाची उपाधी जयालागीं ॥ ३ ॥ होय परी ऐसी माझीया मना- तें । लाज आणिका ते काय देवा ॥ ४ ॥ बहिणी म्हणे येथें बोलावें तें कोणा । तुज नारायणा वांचोनिया ॥ ५ ॥

७३७ धरियेले तुझे पाय । आतां सोय करीं बापा ॥ १ ॥ नको लावूं लोटो- नीयां । पंढरीराया कृपावंता ॥ २ ॥ लोखंड लागतां परिसा । सुवर्ण कैसा न होय बा ॥ ३ ॥ जरी झालें ऐसें तरी । उरे केवीं थोरी परिसाची ॥ ४ ॥ बहिणी म्हणे कोण थोर । तुजहुनी पामर हा उद्धराया ॥ ५ ॥

७३८ सर्व देवांचा तूं देव । तुजहुनी देव थोर कोण ॥१॥ तुज सांगुनि नारा- यणा । वंदूं चरणा कोणाचिये ॥ २ ॥ निवारील माझी चिंता । ऐसा कोण दाता तुजवीण ॥ ३ ॥ तुझी होता अवकृपा । कोण कृपा करूं धजे ॥ ४ ॥ बहिणी म्हणे पायीं राखा । माझे न देखा गुणदोषां ॥ ५ ॥

# परिशिष्ट 'आ'

## संतमहात्म्यपर.

७३९ संत तेचि होती खरे । विश्वंभरें आवडले जे ॥ १ ॥ नित्य वसे शांति अंगीं । प्रेमरंगीं रंगलें ॥ २ ॥ कृपादृष्टी जगावरी । विषयांवरी भर नाहीं ॥ ३ ॥ बहिणी म्हणे तया ध्यातां । आलें हातां परब्रह्म ॥ ४ ॥

७४० संताचा तो संग जाहालियावरी । उणा केविं हरी होय तेथें ॥१॥ देवही इच्छितो संग त्यांचा घडा । देह कायीं पडो संताचिये ॥ २ ॥ न वर्णवे तो संतांचा महिमा । किती ही उपमा न देतां पुरे ॥ ३ ॥ बहिणी म्हणे जैसी प्रारब्धाची रेषा । तैसें जगदीशा करणें भाग ॥ ४ ॥

समाप्त